# नारायणराव आणि गोदावरी.



दुःखपरिणामी कल्पित कादंबरी.

ही

कै० महादेव व्यंकटेश रहाळकर

यांनीं तयार केली,

तिची ही

दुसरी आवृत्ति.



पुणें येथे

" ज्ञानप्रकाश " छापखान्यांत छापिली.



सन १८९०.

किंमत १॥ रुपया

1614

## प्रस्तावना.

ईश्वर कृपेनें आपल्या देशांत दिवसानुदिवस शास्त्रीय व इतर मनोरंजक ग्रंथांची बरीच वृद्धि होत चालली आहे. शास्त्रीय विषयांचा व्यासंग करितांना किंवा इतर मानसिक श्रमांची कामे करितांना मन थकलें, म्हणजे त्याला हुशारी येऊन तें ताजे-तवानें होण्याकरितां त्याचें रंजन केलें पाहिजे. तें करण्याचे अनेक मार्ग आहेत; परंतु त्या सर्वांत मनोरंजक ग्रंथ वाचन, हा उत्तम व सुलभ मार्ग आहे. ह्या गोष्टीकडे लक्ष देऊनच आ-पल्या भाषेंत कित्येकांनीं, नाटकें, कादंबऱ्या इत्यादि लहान मोठे थोडे बहुत ग्रंथ रचिले आहेत. तीच गोष्ट मनांत धरून मी ही लहानशी कादंबरी रचण्याचा प्रयत्न केला आहे.

आजपर्यंत आपल्या भाषेंत ज्या कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या आहेत, त्यांहून प्रस्तुत कादंबरी कांहीं अंशीं निराळ्या प्रकारची आहे. ह्या करितां हींत जो कांहीं निराळेपणा आहे त्याविषयीं येथें दिग्दर्शन करणें आवश्यक आहे.

आपल्या भाषेंत ज्या कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या आहेत, त्यां-पैकीं कांहीं थोड्याशा वर्ज्य करून; बाकीच्यांत संविधानका-च्या, स्थळांच्या व त्यांतील पात्रांच्या रीतीस्थितीच्या वर्णनाचा घाट बहुत अंशीं एकसारखाच आहे. त्यांतील नायक आणि नायिका म्हटलीं म्हणजे बहुत करून राजपुत्र व राजकन्या; किंवा एकाद्या मोठ्या श्रीमंताचा पुत्र आणि तशाच प्रकारच्या श्रीमंताची कन्या. असावयाचीं ! त्यांची संपत्ति म्हटली म्हणजे कुबेराच्या संपत्तीजवळ जवळ ! त्यांचें सौंदर्य मदनरतिप्रमाणें, किंबहुना त्यांच्याहून ज्यास्ती ! त्यांचीं नगरें म्हटलीं म्हणजे, इंद्रभुवनाच्या तोडीचीं ! त्यांच्या बागा म्हणजे नंदनवनेंच !

त्यांची प्रीति म्हटली म्हणजे तिजपुढें राम आणि सीता ह्यांची प्रीति कांहींच नाहीं ! त्याचप्रमाणें ! त्यांचे सद्गुण वगैरे सर्व कांहीं—जितकी ग्रंथकाराची कल्पना चालेल तितकें—उत्तम असावयाचें ! तसेंच त्यांजवर दुःखें व संकटेंही अनिर्वाच्य आलेलीं असावयाचीं ! आतां ही रचनेची व वर्णन करण्याची रीति चांगली किंवा वाईट ह्या विषयीं माझ्यासारख्या अल्पज्ञानें मत देणें म्हणजे 'लहाना तोंडीं मोठा घांस घेणें' असें होईल असें मी समजतों. ह्याकरितां त्याविषयीं माझ्यानें कांहींच मत देववत नाहीं. ते ग्रंथ सुज्ञ जनापुढें आहेतच. ते त्यांच्या बऱ्या वाईटपणाविषयीं निर्णय करतीलच.

आपल्या भाषेंतील बहुतेक कादंबऱ्यांतील मुख्य पात्रें फार उंच प्रतीचीं असल्यामुळें त्या पात्रांच्या रीतिरियति फार उंच प्रतीच्याच आहेत, व त्याप्रमाणेंच त्या संबंधाचीं वर्णनेंही उंच प्रतीचींच आहेत. त्यांत सामान्य स्थितींतील पात्रे व त्यांच्या रीतिरियतींचीं वर्णनें क्वचित्च आहेत. आणि जगांत तर सामान्य स्थितींतील लोकांचा भरणा फार आहे. त्यांच्यांतही संसारांत घडणारे अनेक चमत्कारिक प्रसंग घडून येतात. त्यांचें वर्णन कादंबरीच्या द्वारें करावें हाही प्रस्तुत कादंबरीचा एक हेतु आहे.

काल्पत कादंबरीच्या वाचनापासून लोकांचें मनोरंजन होऊन त्यांचीं मनें अनीतीच्या मार्गाकडून परावृत्त होऊन नीतीच्या मार्गाकडे वळावीं, या हेतूनें आपल्यांतील बहुतेक कादंबऱ्यांत शेवटीं सदाचारी मनुष्यांचा उत्कर्ष, व दुराचाऱ्यांचा अपकर्ष झाला असें दाखविलें असतें. तें गैर आहे असें माझें बिलकूल म्हणणें नाहीं; परंतु जगांतील व्यवहारांत सर्वकाळ असें घडून येतेंच असा नियम नाहीं. दुराचारी मनुष्याचा उत्कर्ष, व त्याच्या दुराचरणापासून सदाचारी मनुष्याचा अपकर्ष व नाश झाला, किंवा दुराचारी मनुष्यापासून सदाचारास फार दुःखें भोगावीं

म्हणून, शेवटीं सदाचारी व दुराचारी ह्यांचा बरोबरच नाश झाला, अशा गोष्टी शेंकडों वेळां घडून आल्या आहेत. तेव्हां जगांतील व्यवहारांत घडणाऱ्या गोष्टींचें चित्र जर कादंबरीच्या रूपानें लोकांस दाखविणें आहे, तर त्यात जशा गोष्टी घडल्या असतील तशाच आणिल्या पाहिजेत. त्यांत दुष्टांच्या कपट-युक्ति, त्यांच्या योगानें सज्जनांवर कसे खोटे आरोप येऊन कसे भयंकर प्रसंग गुदरतात, व त्यांपासून त्यांचा नाश कसा होतो इत्यादि गोष्टींचेंही वर्णन समयविशेषीं केले पाहिजे. ह्या गोष्टीकडे लक्ष देऊन, प्रस्तुत कादंबरीची रचना केली आहे. हिच्यातील प्रत्येक पात्राच्या आचरणापासून, मानवी स्वभावाचा चांगला किंवा वाईट असा खुबीदार मासला दिसून यावा अशी आशा आहे.

इंग्रजी भाषेतील ' पाप्युलरटेल्स ह्या गोष्टीच्या धर्तीवर प्रस्तुत कादंबरांतील गोष्ट आहे, व त्याचप्रमाणें हींतील नायक, नायिका व इतर पात्रें, हीं साधारण गरीब स्थितींतील आहेत. त्यामुळे मागे सांगितलेल्या कादंबऱ्यांप्रमाणें हींत उंच रीती-स्थितीचे वर्णन यावयाचें नाहीं हे उघड आहे. आणखी आप ल्यातील नाटके व कादंबऱ्या यांतील गोष्टींचा शेवट आनंदांत करावयाचा असा पाठ आहे. त्याच्या विरुद्ध ह्या कादंबरीचा शेवट शोकांत झाला आहे. इंग्रजी भाषेत अशा प्रकारचीं म्हणजे दुःखपरिणामी नाटकें व कादंबऱ्या पुष्कळ आहेत. परंतु आपल्या भाषेंत बहुधा अशा प्रकारची ही पहिलीच कल्पित कादंबरी असावी, असें वाटतें.

मानवी कृतींत दोष असावयाचेच. ह्या न्यायानें मोठमोठ्या ग्रंथकारांच्या ग्रंथांतही दोष असतात. शिवाय निरनिराळ्या लोकांची रुचिही भिन्नभिन्न असते. ह्या गोष्टीचा विचार केला असतां माझ्यासारख्या अल्पज्ञ पुस्तक कर्त्याच्या कृतींत पुष्कळ दोष असण्याचा संभव आहे. परंतु माझी स्थिति, विद्वत्ता,

इंग्रजी भाषेचें—( जींत अशा प्रकारचे पुष्कळ ग्रंथ रचलेले आहेत. ) बहुतकरून अज्ञान, कल्पित कादंबरी रचण्याचा हा माझा पहिलाच प्रयत्न, व अशा प्रकारची ही आपल्या भाषेंत पहिलीच कादंबरी, ह्या गोष्टींकडे लक्ष देऊन, विद्वान, परोत्कर्षेच्छु, प्रांजळ अंतःकरणाचे सज्जन ह्या माझ्या लहानशा पुस्तकाकडे दयार्द्र दृष्टीने पाहतील अशी पूर्ण आशा आहे.

कल्याण, तारीख १ माहे जानेवारी सन १८७९.

ग्रंथकर्ता.



# नारायणराव आणि गोदावरी.

## भाग १ ला.

**राधाबाई**—अजून ही बंडी किती दिवस ठेवावयाची! तिला पंचवीस ठिकाणीं तर ठिगळें मारिलीं आहेत, शिवाय कितीएक ठिकाणीं फाटलेली आहेच! जसे पोतेरें झाले आहे! तिच्या वाती देखील चांगल्याशा होणार नाहीत! आतां जा ऊद्या परती ती, टाकून द्यावी!

**त्र्यंबकभट**—( राधाबाईचा नवरा ) अग त्या बंडीला इतक्यांत काय झालें आहे! अजून एक वर्ष जाण्याला कांहीं हरकत नाहीं. वारंवार असे नवे कपडे करून दिवाळें काढावयाचें आहे वाटतें! खाशी जाड खादीची बंडी ती! तिजवर निदान पांच वर्षें तर गेलीं पाहिजेत!

**राधा**—पांच वर्षें अगदींच थोडीं, निदान दहा वर्षें म्हटलें असतें तर बरें शोभतें! दिवसभर काय मेलें अशा फाटक्या तुटक्या मळक्या चिरगुटांनीं असावें! माणसाच्या आंगावर चिरगूट पांघरूण जरा झुळझुळीत असलें म्हणजे तें बरें दिसतें, आहे जिवांत जीव तों घ्यावी चार दिवस हौस पुरवून. माझ्या मनांत एक छपरी पलंग, कांहीं वासाचें तेल घ्यावें असें वाटतें, पण येथें काय! पैशाची गोष्ट काढिली कीं जसें पित्तच चढतें! तरण्या बायकांना म्हटलें म्हणजे त्यांचे नवरे कांहीं कमी पडूं देत नाहींत; त्यांची हौस पुरवीत असतात. ह्या वयांत ल्यालें बिलें नाहीं तर मग कधीं करावयाचें! बरें, कांहीं वस्तू विकत घेण्यासवरण्याचें सामर्थ्यच नसतें तर मग ठीकच होतें; पण तसें तर नाहींना! मग कां ती मेली

सगळ्या गोष्टींची ददात! आपल्या जवळ पैसे आहेत, पण नुस्ते पैसे असून काय उपयोग! ते कांहीं चाटावयाचे नाहींत, किंवा पेटींत ठेऊन ते कांहीं दूध देत नाहींत. अखेरीस कोणी बरोबर बांधून देत नाहीं. मग त्यांचा आपल्या सुखाला जर नाहीं, तर कशाला उपयोग करावयाचा!

त्र्यंबक—ठीक, चार पैसे आहेत ते अशा चैनी करून एकदा खर्चिले म्हणजे झालें. मग पुढें पोरांबाळांला भिकंभट फडक्याचे घर पाहिलें पाहिजे! तूं म्हणतेस तशा थाटानें राहून कोठें पैसे जमतात? तो हरभट पहा. त्याचे वीस हजार रुपये सुर्ती, व्याजीं लावलेले आहेत, पण राजश्रीच्या कबरेला दीड हाती पंचावर धोतर नाहीं लागलें! आमचे आजोबा होते, त्यांचा हजारो रुपयांचा व्यापार होता, पण कधीं टांचपर्यंत धोतरजोडा, कीं आंगात बनातीचा आगरखा, कीं आंगावर नागपुरी रेशिमकाठी उपर्ण, की कधीं डोकीला मोठ्या लग्नाचे टोपली एवढें पागोटें, कधीं नाहीं डोकीला लहानसे चाळीस हात खादीवजा पागोटे, नेसावयास पावणेदोन हाती धोतर, आंगात एक लहानशी भक्कम बोटाची बंडी, आणि आंगावर एक आंगवस्त्र, म्हणजे झालें. हा सगळा पोषाख. ह्या पोषाखानें ते कचेरींत देखील जात असत. तेच जर थाटामाटाचा पोषाख करून वागते व त्याप्रमाणेंच इतर गोष्टींकडे खर्च करते, तर कधींच रंक होऊन बसले असते! तेच आमचे वडील पहा; ते निघाले चैनी. त्यानीं आजोबांच्या माग चार पाच वर्षांत बहुतेक पैशाची धूळ उडवून दिली. पण लवकरच त्यांचा अवतार संपला म्हणून बरें, नाहीं तर आज आमच्या हातांत चोपदरीच आली असती! तुला तें कांहीं समजते! तू कालची पोर! नव्या तरण्या बायकांना पुढचा कांहीं पोंच नसतो, त्यामुळें त्यांना पैशाचें कांहीं वाटत नसतें, म्हणून लताकपडा छानदार करून थाटामाटानें वागावें

असें त्यांना वाटत असतें. तरी मी तुला नाहींना कांहीं कमी करीत! इतर बायकांप्रमाणें तुला दीड रुपयाचा बांड नाहींना नेसावा लागत! व तीन आण्याच्या खणाची चोळी नाहींना घालावी लागत! पांच रुपयांखालीं तर कधीं लुगडें नसतें व रुपयाखालीं कधीं चोळी नसते. मग कां उगाच पैसे खर्चीत नाहीं म्हणून ओरडतेस!

राधा—हो तर, मी दिवसभर वटवट करतें म्हणून लुगडीं आणि चोळ्या बऱ्या बऱ्याशा मिळतात. नाहीं तर दीड रुपयाचा बांड नेसण्याचें व तीन आण्याच्या खणाची चोळी घालण्याचेंच कपाळीं आले असतें. एक लुगडें किंवा खण घ्यावयाचा असला, म्हणजे जेव्हां चार दिवस हट्ट घेऊन बसावें आणि तोंड दुखेपर्यंत भांडावें, तेव्हां ते बरेंसे मिळतें. पण मला जरी चांगलीं चिरगुटें मिळालीं तरी स्वतःला तशीं घेत नाहीं, त्यामुळें कोठें चार बायकांत गेलें म्हणजे त्या माझी पट्टा करितात. कधीं सांख्याचें लुगडें नेसून व जरीकांठी चोळी घालून चार बायकांत गेलें, म्हणजे एखादी चारगट बायको मला म्हणते. "काय ग, हा का अमदाबादी चंद्रकळा! कवळ्याची ही? पचवीसांची असेल वाटतें. वाः खाशा आहे हो. तुला तर बाई चांगलीं लुगडीं व चोळ्या मिळतात. पण तुला पचवीसांचें आणि पन्नासांचें लुगडें असलें तरी तिकडे दीड हातीं पंचाच! तुझ्या आंगांत पांच रुपयाच्या खणाची चोळी असली तरी तिकडे पन्नास ठिगळें लाविलेली काळी बंडीच!" असें एक कीं दोन. हजार उत्तरें बोलून मला चिडवितात. शेवटीं मला तर रडूं देखील येतें. मग मी आपली खालीं मान घालून मुकाट्यानें बसते किंवा घरीं येतें. अशी माझी ज्या त्या ठिकाणीं मानखंडना होते. म्हणून म्हणतें कीं, आतां माझ्याकरितां तरी बरा कुळकुळीतपणानें वागावें (डोळ्यांत पाणी आणिते.)

त्र्यंबक—ओ हो, हो! हें काय बरें. असें काय बरें लाडके! रडावें काय! माझ्या कपड्यांमुळें का तुझी मानखंडना होते? बरें तर, आतां पुढें मार्गशीर्ष महिना आलाच आहे; त्यांत कोठें तरी लग्नकार्यें होतीलच. तेव्हां दक्षणेचे पैसे जमले म्हणजे एकदां तुझ्या मनाप्रमाणें पोषाख बनवावयाचा. मग तर नाहींना तुझें काहीं बोलणें राहणार? उगी रहा. रडावें काय वेड्यासारखें! तूं म्हणतेस तेंही खरेंच आहे. तुझ्या वयाच्या बायकांना चांगलीं वस्त्रें व दागिने वगैरे अंगावर घालण्याची हौस असते, आणि त्यांच्या नवऱ्यांना तशी हौस नसली म्हणजे त्यांना वाईट वाटतें, हे खरें आहे.

राधा—( डोळे पुसून ) आपणच म्हणावयाचें म्हणून बरें! मी म्हणते तर रागच आला असता. ते असो, पण दक्षणेच्याच पैशांनीं का कपडे करावयाचे? ते मेले पैसे ते कितीसे जमणार आहेत! घरांतून पांच दहा रुपये खर्च केले तर नाहींत का चालणार? करावेंच एकदां खर्च कसें तरी करून! हो बरी आठवण झाली. गोदीच्या लग्नाचें नाहीं का या मार्गशीर्षांत जमावयाचें? ते जमलें म्हणजे ठीक झालें असतें. मी म्हणतें आले परस्पर चार पांचशें रुपये तर त्यांतून मला एक चांगलीशी नथ तरी करतां येईल. नाकांत आहे ही आतां अगदीं जुनी झाली आहे. ती वाईट दिसते. गोदी आतां लग्नाला मोठी नाहीं का झाली? अजून अशीच किती दिवस ठेवावयाची? तिला कितवें वर्ष आहे?

त्र्यंबक—पहा हो, आमच्या पहिल्या कुटुंबास मरून सात वर्षें येत्या माघांत होतील, आणि तेव्हां गोदू सहा वर्षांची होती. आतां तिला तेरावें वर्ष संपत आलें आहे. दोन चार वर्षांमागेंच तिचें लग्न व्हावयाचें पण तिला मावशीचा फार लळा असल्यामुळें ती इकडे येईना. आमची पहिली ती वारल्यापासून ती आपल्या मावशीकडेच आहे. तिकडेच

तिचें लग्न करावें, तर तिची मावशी पैसे घेऊं देईना, व आम्ही स्थळें योजिलीं तीं तिच्या मनास येतना. मागें एक दोन स्थळें काय उत्तम आली होतीं! ते वर घरचे खाऊन पिऊन चांगले सुखी होते. शिवाय आम्हाला खर्चाला पांच पांचशे रुपये देत होते. परंतु तिच्या मावशीने—ते म्हातारेच आहेत. ते बाहेरख्यालीच आहेत, ते रोगीच आहेत, ते अमुकच आहेत, ते तमुकच आहेत—अशी परवड लाविली. त्या नवऱ्यामुलांतील एक तर अगदीं चाळीस वर्षांचा होता. आंगापिंडानें कसा तसा धष्टपुष्ट. मिशा देखील फारशा पिकल्या नव्हत्या. त्याला ती थेरडा साठ वर्षांचा ह्मणूं लागली. दुसरा त्या **चिंतामणराव** सराफाचा मुलगा होता. तो वयानें तर अगदीं पंचविशीच्या आंतबाहेर होता. त्याच्या घरीं खाशी दहावीस हजारांची दौलत होती. पण ती म्हणूं लागली कीं, तो फारच बाहेरख्याली व [illegible] हे. तेव्हां मी तिची पुष्कळ प्रकारांनीं समजूत केली; पण ती कांहीं ऐकेना. ह्या कारणांनीं त्या पोरीचें लग्न आजपर्यंत व्हावयाचें राहिलें. आतां मी तिच्या नादीं लागतच नाहीं. **गोदूला** इकडेच आणतों, म्हणजे झालें. तिला इकडे आणल्यावर कोणी तरी चांगला, आपल्यांना पाहिजे तसा, मुलगा पण मिळेल. ती मुळींही सुरेख आहे, चांगली शिकलेली आहे, बुकं काय वाचते, कशीदा काय काढते, शिवणकाम काय करते, कांहीं बोलण्याची सोय नाहीं. शिवाय ती आतां नहाण यावयास झाली आहे. त्यामुळें कोणी हौशी नवरा मिळाला तर पायां पडून तिचा स्वीकार करील व आम्हालाही पांच सातशें रुपये देईल.

**राधा**–मी तेंच म्हणणार होतें. रुपये आले तर माझी दागिन्यांची तरी कांहीं तजवीज निघेल. मग तिला इकडे आणावयाची तर लवकरच आणावी. येथें आपल्या बेताप्रमाणें

त्यांची प्रीति म्हटली म्हणजे तिजपुढें राम आणि सीता ह्यांची प्रीति कांहींच नाहीं ! त्याचप्रमाणे ! त्यांचे सद्गुण वगैरे सर्व कांहीं—जितकी ग्रंथकाराची कल्पना चालेल तितके—उत्तम असावयाचे ! तसेंच त्यांजवर दुःखें व संकटेंही अनिर्वाच्य आलेलीं असावयाचीं ! आतां ही रचनेची व वर्णन करण्याची रीति चांगली किंवा वाईट ह्या विषयीं माझ्यासारख्या अल्पज्ञाने मत देणें म्हणजे 'लहाना तोंडीं मोठा घांस घेणें' असे होईल असें मी समजतो. ह्याकरितां त्याविषयीं माझ्यानें कांहींच मत दववत नाहीं. ते ग्रंथ सूज्ञ जनापुढे आहेतच. ते त्यांच्या बऱ्या वाईटपणाविषयीं निर्णय करतीलच.

आपल्या भाषेंतील बहुतेक कादंबऱ्यांतील मुख्य पात्रे फार उंच प्रतीचीं असल्यामुळें त्या पात्रांच्या रीतिस्थिति फार उंच प्रतीच्याच आहेत, व त्याप्रमाणेंच त्या संबंधाचीं वर्णनेही उंच प्रतीचीच आहेत. त्यांत सामान्य स्थितींतील पात्रे व त्यांच्या रीतिस्थितीचीं वर्णनें क्वचित्च आहेत. आणि जगांत तर सामान्य स्थितींतील लोकांचा भरणा फार आहे. त्यांच्यांतही संसारांत घडणारे अनेक चमत्कारिक प्रसंग घडून येतात. त्याचें वर्णन कादंबरीच्या द्वारे करावें हाही प्रस्तुत कादंबरीचा एक हेतु आहे.

काल्पनिक कादंबरीच्या वाचनापासून लोकाचे मनोरंजन होऊन त्यांचीं मने अनीतीच्या मार्गाकडून परावृत्त होऊन नीतीच्या मार्गाकडे वळावीं, या हेतूनें आपल्यांतील बहुतेक कादंबऱ्यांत शेवटीं सदाचारी मनुष्यांचा उत्कर्ष, व दुराचाऱ्याचा अपकर्ष झाला असे दाखविलें असतें. ते गैर आहे असे माझे बिलकूल म्हणणे नाहीं; परंतु जगांतील व्यवहारांत सर्वकाळ असे घडून येतेंच असा नियम नाहीं. दुराचारी मनुष्याचा उत्कर्ष, व त्याच्या दुराचरणापासून सदाचारी मनुष्याचा अपकर्ष व नाश झाला, किंवा दुराचारी मनुष्यापासून सदाचारास फार दुःखे भोगावीं

लागून, शेवटीं सदाचारी व दुराचारी ह्यांचा बरोबरच नाश झाला, अशा गोष्टी शेंकडों वेळां घडून आल्या आहेत. तेव्हां जगांतील व्यवहारांत घडणाऱ्या गोष्टींचें चित्र जर कादंबरीच्या रूपानें लोकांस दाखविणें आहे, तर त्यांत जशा गोष्टी घडल्या असतील तशाच आणिल्या पाहिजेत. त्यांत दुष्टांच्या कपट-युक्ति, त्यांच्या योगानें सज्जनांवर कसे खोटे आरोप येऊन कसे भयंकर प्रसंग गुदरतात, व त्यांपासून त्यांचा नाश कसा होतो इत्यादि गोष्टींचेंही वर्णन समयविशेषीं केले पाहिजे. ह्या गोष्टीकडे लक्ष देऊन, प्रस्तुत कादंबरीची रचना केली आहे. हिच्यांतील प्रत्येक पात्राच्या आचरणापासून, मानवी स्वभावाचा चांगला किंवा वाईट असा खुबीदार मासला दिसून यावा अशी आशा आहे.

इंग्रजी भाषेतील ' पाप्युलरटेल्स ह्या गोष्टीच्या धर्तीवर प्रस्तुत कादंबरींतील गोष्ट आहे, व त्याचप्रमाणे हींतील नायक, नायिका व इतर पात्रें, हीं साधारण गरीब स्थितींतील आहेत. त्यामुळे मागे सांगितलेल्या कादंबऱ्यांप्रमाणें हींत उंच रीती-स्थितींचें वर्णन यावयाचें नाहीं हे उघड आहे. आपणांकडील आप ल्यातील नाटकें व कादंबऱ्या यांतील गोष्टींचा शेवट आनंदांत करावयाचा असा पाठ आहे. त्याच्या विरुद्ध ह्या कादंबरीचा शेवट शोकांत झाला आहे. इंग्रजी भाषेत अशा प्रकारचीं म्हणजे दुःखपरिणामी नाटकें व कादंबऱ्या पुष्कळ आहेत. परंतु आपल्या भाषेत बहुधा अशा प्रकारची ही पहिलीच कल्पित कादंबरी असावी, असे वाटतें.

मानवी कृतीत दोष असावयाचेच. ह्या न्यायानें मोठमोठ्या ग्रंथकारांच्या ग्रंथांतही दोष असतात. शिवाय निरनिराळ्या लोकांची रुचिही भिन्नभिन्न असते. ह्या गोष्टीचा विचार केला असतां माझ्यासारख्या अल्पज्ञ पुस्तक कर्त्याच्या कृतींत पुष्कळ दोष असण्याचा संभव आहे. परंतु माझी स्थिति, विद्वत्ता,

इंग्रजी भाषेचें—( जींत अशा प्रकारचे पुष्कळ ग्रंथ रचलेले आहेत. ) बहुतकरून अज्ञान, कल्पित कादंबरी रचण्याचा हा माझा पहिलाच प्रयत्न, व अशा प्रकारची ही आपल्या भाषेंत पहिलीच कादंबरी, ह्या गोष्टींकडे लक्ष देऊन, विद्वान, परोत्कर्षेच्छु, प्रांजळ अंत:करणाचे सज्जन ह्या माझ्या लहानशा पुस्तकाकडे दयार्द्र दृष्टीने पाहतील अशी पूर्ण आशा आहे.

कल्याण, तारीख १ माहे जानेवारी सन १८७९.

ग्रंथकर्ता.



# नारायणराव आणि गोदावरी.



## भाग १ ला.

**राधाबाई**—अजून ही बंडी किती दिवस ठेवावयाची! तिला पंचवीस ठिकाणीं तर ठिगळें मारिलीं आहेत, शिवाय कितीएक ठिकाणीं फाटलेली आहेच! जसें पोतेरें झालें आहे! तिच्या वाती देखील चांगल्याशा होणार नाहींत! आतां जाऊंद्या परती ती, टाकून द्यावी!

**त्र्यंबकभट**—( राधाबाईचा नवरा ) अग त्या बंडीला इतक्यांत काय झालें आहे! अजून एक वर्ष जाण्याला कांहीं हरकत नाहीं. वारंवार असे नवे कपडे करून दिवाळें काढावयानें आहे वाटतें! खाशी जाड खादीची बंडी ती! तिजवर निदान पांच वर्षें तर गेलीं पाहिजेत!

**राधा**—पांच वर्षें अगदींच थोडीं, निदान दहा वर्षें झटलें असतें तर बरें शोभतें! दिवसभर काय मेलें अशा फाटक्या तुटक्या मळक्या चिरगुटांनीं असावें! माणसाच्या आंगावर चिरगूट पांघरूण जरा झुळझुळीत असलें म्हणजे तें बरें दिसतें, आहे जिवांत जीव तों घ्यावा चार दिवस हौस पुरवून. माझ्या मनांत एक छपर पलंग, कांहीं वासाचीं तेलें घ्यावीं असें वाटतें, पण येथें काय! पैशाची गोष्ट काढिली कीं जसें पित्तच चढतें! तरण्या बायकांना म्हटलें म्हणजे त्यांचे नवरे कांहीं कमी पडूं देत नाहीत; त्यांची हौस पुरवीत असतात. ह्या वयांत ल्यालें बिलें नाहीं तर मग कधीं करावयाचें! बरें, कांहीं वस्तू विकत घेण्यासंबरण्यास सामर्थ्यच नसतें तर मग ठीकच होतें; पण तसें तर नाहींना? मग कां ती मेली

सगळ्या गोष्टींची ददात! आपल्या जवळ पैसे आहेत, पण नुसते पैसे असून काय उपयोग! ते कांहीं चाटावयाचे नाहींत, किंवा पेटींत ठेऊन ते कांहीं दूध देत नाहींत. अखेरीस कोणी बरोबर बांधून देत नाहीं. मग त्यांचा आपल्या सुखाला भर नाहीं, तर कशाला उपयोग करावयाचा!

**त्र्यंबक**—ठीक, चार पैसे आहेत ते अशा चैनी करून एकदा खर्चिले म्हणजे झालें. मग पुढें पोरांबाळांला भिकंभट फडक्याचे घर पाहिलें पाहिजे! तूं म्हणतेस तशा थाटानें राहून कोठें पैसे जमतात? तो **हरभट** पहा. त्याचे वीस हजार रुपये सुर्ती, व्याजीं लावलेले आहेत, पण राजश्रीच्या कंबरेला दीड हाती पचावर धोतर नाहीं लागलें! आमचे आजोबा होते, त्यांचा हजारो रुपयांचा व्यापार होता, पण कधीं टांचेपर्यंत धोतरजोडा, कीं आंगात बनारसीचा आंगरखा, कीं आंगावर नागपुरी रेशीमकांठी उपर्णें, कीं कधीं डोकीला मोठ्या लग्नांत टोपल्यां एवढें पागोटें, कधीं नाहीं डोकीला लहानसें चार्ळीस हात खादीचें पागोटें, नेसावयास पावणेदोन हातीं धोतर, आंगात एक लहानशी भक्कम नोटाची बंडी, आणि आंगावर एक आंगवस्त्र, म्हणजे झालें. हा सगळा पोषाख. ह्या पोषाखानें ते कचेरींत देखील जात असत. तेच जर थाटामाटाचा पोषाख करून वागते व त्याप्रमाणेंच इतर गोष्टींकडे खर्च करते, तर कधींच रंक होऊन बसले असते! तेच आमचे वडील पहा; ते निघाले चैनी. त्यानीं आजोबांच्या मागें चार पांच वर्षांत बहुतेक पैशाची धूळ उडवून दिली. पण लवकरच त्यांचा अवतार संपला म्हणून बरें, नाहीं तर आज आमच्या हातांत चौपदरीच आली असती! तुला तें कांहीं समजतें! तूं कालची पोर! नव्या तरण्या बायकांना पुढचा कांहीं पोंच नसतो, त्यामुळें त्यांना पैशाचें कांहीं वाटत नसतें, म्हणून लत्ताकपडा छानदार करून थाटामाटानें वागावें

असें त्यांना वाटत असतें. तरी मी तुला नाहींना कांहीं कमी करीत! इतर बायकांप्रमाणें तुला दीड रुपयाचा बांड नाहींना नेसावा लागत! व तीन आण्याच्या खणाची चोळी नाहींना घालावी लागत! पांच रुपयांखालीं तर कधीं लुगडें नसतें व रुपयाखालीं कधीं चोळी नसते. मग कां उगाच पैसे खर्चीत नाहीं म्हणून ओरडतेस!

राधा—हो तर, मी दिवसभर वटवट करतें म्हणून लुगडीं आणि चोळ्या बऱ्या बऱ्याशा मिळतात. नाहीं तर दीड रुपयाचा बांड नेसण्याचें व तीन आण्याच्या खणाची चोळी घालण्याचेंच कपाळीं आलें असतें. एक लुगडें किंवा खण घ्यावयाचा असला, म्हणजे जेव्हां चार दिवस हट्ट घेऊन बसावें आणि तोंड दुखेपर्यंत भांडावें, तेव्हां तें बरेंसें मिळतें. पण मला जरी चांगलीं चिरगुटें मिळालीं तरी स्वतःला तशीं घेत नाहीं, त्यामुळें कोठें चार बायकांत गेलें म्हणजे त्या माझी थट्टा करितात. कधीं सांग्याचें लुगडें नेसून व जरीकांठी चोळी घालून चार बायकांत गेलें, म्हणजे एखादी चारगट बायको मला म्हणते. "काय ग, हीं का अमदाबादी चंद्रकळा! कवढ्याची ही? पंचवीसांची असेल वाटतें. वाः खाशी आहे हो. तुला तर बाई चांगलीं लुगडीं व चोळ्या मिळतात. पण तुला पंचवीसांचें आणि पन्नासांचें लुगडें असलें तरी तिकडे दीड हाती पंचाच! तुझ्या आंगांत पांच रुपयांच्या खणाची चोळी असली तरी तिकडे पन्नास ठिगळें लाविलेली काळी बंडीच!" असें एक कीं दोन. हजार उत्तरें बोलून मला चिडवितात. शेवटीं मला तर रडूं देखील येतें. मग मी आपली खालीं मान घालून मुकाट्यानें बसतें किंवा घरीं येतें. अशी माझी ज्या त्या ठिकाणीं मानखंडना होते. म्हणून म्हणते कीं, आतां माझ्याकरितां तरी जरा सुळसुळीतपणानें वागावें (डोळ्यांत पाणी आणिते.)

**त्र्यंबक**—ओ हो, हो ! हें काय बरें. असें काय बरें लाडके ! रडावें काय ? माझ्या कपड्यांमुळें का तुझी मानखंडना होते ? बरें तर, आतां पुढें मार्गशीर्ष महिना आलाच आहे; त्यांत कोठें तरी लग्नकार्यें होतीलच. तेव्हां दक्षणेचे पैसे जमले म्हणजे एकदां तुझ्या मनाप्रमाणें पोषाख बनवावयाचा. मग तर नाहींना तुझें कांहीं बोलणें राहणार ! उगी रहा. रडावें काय वेड्यासारखें ! तूं म्हणतेस तेंही खरेंच आहे. तुझ्या वयाच्या बायकांना चांगलीं वस्त्रें व दागिने वगैरे आंगावर घालण्याची हौस असते, आणि त्यांच्या नवऱ्यांना तशी हौस नसली म्हणजे त्यांना वाईट वाटते, हें खरें आहे.

**राधा**—( डोळे पुसून ) आपणच म्हणायाचें म्हणून बरें ! मी म्हणतें तर रागच आला असता. तें असो, पण दक्षणेच्याच पैशांनीं का कपडे करावयाचे ? ते मेले पैसे ते कितीसे जमणार आहेत ! घरांतून पांच दहा रुपये खर्च केले तर नाहींत का चालणार ? करावेच एकदां खर्च कसे तरी करून ! हो बरी आठवण झाली. **गोदी**च्या लग्नाचें नाहीं का या मार्गशीर्षांत जमावयाचें ! तें जमतें म्हणजे ठीक झालें असतें. मी म्हणतें आले परस्पर चार पांचशें रुपये तर त्यांतून मला एक चांगलीशी नथ तरी करतां येईल. नाकांत आहे ही आतां अगदीं जुनी झाली आहे. ती वाईट दिसते. **गोदी** आतां लग्नाला मोठी नाहीं का झाली ? अजून अशीच किती दिवस ठेवावयाची ! तिला कितवें वर्ष आहे ?

**त्र्यंबक**—पहा हो, आमच्या पहिल्या कुटुंबास मरून सात वर्षें येत्या माघांत होतील, आणि तेव्हां **गोदू** सहा वर्षांची होती. आतां तिला तेरावें वर्ष संपत आलें आहे. दोन चार वर्षांमागेंच तिचें लग्न व्हावयाचें पण तिला मावशीचा फार लळा असल्यामुळें ती इकडे येईना. आमची पहिली ती वारल्यापासून ती आपल्या मावशीकडेच आहे. तिकडेच

तिचें लग्न करावें, तर तिची मावशी पैसे घेऊं देईना, व आम्ही स्थळें योजिलीं तीं तिच्या मनास येतना. मागें एक दोन स्थळें काय उत्तम आलीं होतीं! ते वर घरचे खाऊन पिऊन चांगले सुखी होते. शिवाय आम्हाला खर्चास पांच पांचशें रुपये देत होते. परंतु तिच्या मावशीनें—ते म्हातारेच आहेत, ते बाहेरख्यालीच आहेत, ते रोगीच आहेत, ते अमुकच आहेत, ते तमुकच आहेत—अशी परवड लाविली. त्या नवऱ्यामुलांतील एक तर सगळा चाळीस वर्षांचा होता. आंगापिंडान कसा खासा धष्टपुष्ट, मिशा देखील फारशा पिकल्या नव्हत्या. त्याला ती थेरडा साठ वर्षांचा ह्मणूं लागली. दुसरा त्या **चिंतामणराव** सराफाचा मुलगा होता. तो वयानें तर सगळा पंचविशीच्या आंतबाहेर होता. त्याच्या घरीं खाशी दहावीस हजारांची दौलत होती. पण ती मावशी म्हणूं लागली कीं, तो फारच बाहेरख्याली व बिघडलेला आहे. तेव्हां मीं तिची पुष्कळ प्रकारांनीं समजूत केली; पण ती कांहीं ऐकेना. ह्या कारणांनीं त्या पोरीचें लग्न आजपर्यंत व्हावयाचें राहिलें. आतां मी तिच्या नादीं लागतच नाहीं. **गोदूला** इकडेच आणतों, म्हणजे झालें. तिला इकडे आणिल्यावर कोणी तरी चांगला, आपल्यांना पाहिजे तसा, मुलीला वर मिळेल. ती मुलगीही सुरेख आहे, चांगली शिकलेली आहे, बुकें काय वाचते, कशीदा काय काढते, शिवणकाम काय करते, कांहीं बोलण्याची सोय नाहीं. शिवाय ती आतां नहाण यावयास झाली आहे. त्यामुळें कोणी हौशी नवरा मिळाला तर पायां पडून तिचा स्वीकार करील व आम्हालाही पांच सातशें रुपये देईल.

**राधा**—मी तेंच म्हणणार होतें. रुपये आले तर माझी दागिन्यांची तरी कांहीं तजवीज निघेल. मग तिला इकडे आणावयाची तर लवकरच आणावी. येथें आपल्या बेताप्रमाणें

पाहिजेत तितकीं स्थळें मिळतील. आज त्या **केशवरावाची** सून **गोपाळरावाची** बायको म्हणतात मरावयास टेकली आहे. हजार वांट्यांनीं तिची जगण्याची आशा नाहींच असें मी ऐकिलें. कदाचित् तसें झालें तर तो एक नवरा रिकामा होईल; आणि तो तरणाताठा व श्रीमंत आहे तेव्हां लागलेच दुसरे लग्नही करीलच. श्रीमंत बिजवराला म्हटलें म्हणजे मोठी मुलगी हवीच. आणि मोठी मुलगी म्हटली म्हणजे गरीबाचीच मिळावयाची.

**त्र्यंबक**-तें संधान जमलें तर फार उत्तम होईल. त्याची काय आज लाखाची दौलत आहे! तो **गोपाळराव**ही गुलहौसी आहे. आमच्या **गोदू**सारखी सुरेख व मोठी मुलगी मिळाली तर तो हजार रुपये देखील देईल. आणखी तसें झालें तर आपल्यांनाही थोराचा आश्रय होईल. **ईश्वर** इच्छा असली तर सगळें ठीक होईल. उद्यां **गोदू**स आणण्याकरितां मुद्दाम गाडी पाठवितो. ती येथें आली म्हणजे सगळें ठीक होईल.

**राधा**-पण तिचा मावशी कां फावशी तिनें तिला पाठविलें पाहिजेना? नाहीं तर ती म्हणेल तेथेंच लग्न करा. मग कसें होईल!

**त्र्यंबक**-हो तर! मावशी हाक मारते! तसें म्हणू लागली तर मी स्वतः जाऊन आपल्या पोरीला हात धरून घेऊन येईन.

ह्या वरील संभाषणावरून **त्र्यंबकभट** हा कोणत्या प्रकारचा मनुष्य होता, व त्याचा व त्याच्या बायकोचा त्याच्या पहिल्या बायकोच्या मुलीच्या लग्नाविषयीं-कसा बेत होता हें सहज दिसून येईल. वर लिहिलेल्या बेताप्रमाणें **त्र्यंबक**भटानें दुसऱ्या दिवशीं मुलीस आणण्याकरितां मुद्दाम तिच्या मावशीकडे, **मुंबई**स गाडी व मनुष्य पाठविला. व त्याजबरोबर असें पत्र दिलें कीं, "ह्या ठिकाणीं तुमच्या-( मावशी-

च्या ) मनाप्रमाणें गोदूस एक स्थळ आलें आहे. तें सर्व प्रकारें फार उत्तम आहे. नवस केल्यानेंही असें दुसरें स्थळ मिळावयाचें नाहीं. ह्याकरितां हल्लीं पाठविलेल्या मनुष्याबराबर गोदूची रवानगी करून द्यावी. हा मनुष्य मुद्दाम तिला आणण्याकरितां गाडी बरोबर देऊन पाठविला आहे; तर तिला पाठविण्यास बिलकुल अनमान करूं नये. तिला घेतल्याशिवाय गेलेला मनुष्य परत येणार नाहीं. तिच्या लग्नाचा मूहूर्त निश्चय झाल्यावर तुम्हास आणावयास मनुष्य येईल."

हें अशा प्रकारचें पत्र पाहून त्या मावशीसही वाईट वाटलें परंतु दुसऱ्याच्या मुलीवर आपली सत्ता नाहीं, आणि ती लग्नाला ही मोठी झाली आहे, तेव्हां तिचें लग्नही लवकर झालेंच पाहिजे इत्यादि गोष्टींचा तिने विचार करून गोदावरीस तिच्या बापाकडे पाठविण्याची तयारी करूं लागली.

गोदावरीची मावशी ही घरची एकटीच होती. तिला मूलबाळ कांहीं नव्हतें. तिचा नवरा वारल्यावर तिला दरमहा तीस रुपये पेनशन मिळत असे; त्यावर तिचा चांगल्या रीतीनें निर्वाह होत असे. तिच्या घरांत, तिच्या दूरच्या नातलग अशा एक दोन बाया होत्या. एक देवपुजेकरितां ठेवलेला ब्राम्हण होता. यांशिवाय तिचें सखें असें कोणी नव्हतें. गोदावरीची आई वारली, तेव्हां ह्या पोरक्या मुलीचें आस्थेनें पालन करण्यास कोणी बायको माणूस नाहीं, म्हणून तिनें तिला आपल्या घरीं नेलें. ती स्वतः सुशिक्षित असल्यामुळे तिनें गोदावरीसही उत्तम शिक्षा लाविली होती; व तिला तेथें असलेल्या मुलींच्या शाळेतही घातलें होतें. गोदावरीही आपल्या मावशीच्या उत्तम शिक्षेनें सद्‍गुणी, हुशार, मर्यादशील व चतुर अशी झाली होती. मावशीला मूलबाळ वगैरे नसल्यामुळें तिची गोदावरीवर आपल्या एकुलत्या एक मुलीप्रमाणे ममता होती, व गोदावरीही लहानपणापासून तिजपाशींच अ-

सल्यामुळें तिचीही आपल्या मावशीवर आईप्रमाणेंच भक्ति होती. त्या मावशीस दुसरें कोणी वारस नसल्यामुळें अखेरीस ती आपली राहिलेली सर्व चीजवस्त हिलाच देणार होती, व तिनें हल्लींच कांहीं लहानसहान दागिने तिला दिलेही होते. गोदावरीस दुसरे दिवशीं घरीं पाठवावयाची त्याच्या आदल्या रात्रीं जेवणखाण आटोपल्यावर मावशी तिला जवळ घेऊन बसली असतां—तिच्या तोंडावरून हात फिरवून—म्हणाली माझी लाडकी गोदू उद्यां आपल्या घरीं जावयाची अं ! गोदू, तुला घरीं गेल्यावर माझी कधीं आठवण होईल का ?

**गोदावरी** ( तिच्या कंबरेस मिठी मारून ) मावशी, हे काय बरें असे तूं विचारतेस ? मी तुला आपल्या आईमाराखी समजते, ती मी तुझी आठवण कशी विसरेन बरें ! पण मावशी, तूं मला तिकडे पाठविणारच का ? पाठविलें नाहीं तर नाहीं का चालणार ! काय करावयाचें तें येथेच नाहीं का होणार.

**मावशी**-बेटा, पाठविल्याशिवाय कसें बरें चालेल ? तुझ्या बापानें तुला न्यावयास मुद्दाम गाडी आणि मनुष्य पाठविला आहेना ! तिकडे त्यानें मोठेसें चांगलें स्थळ पाहिलें आहे. तेव्हां इकडे बेत कसा जमेल ? आणि तो माणूसही तुला घेतल्याशिवाय जात नाहीं. त्याला तुझ्या बापाची साक्षीही तशीच आहे. तेव्हां तुला गेलें पाहिजेच, त्याशिवाय उपाय नाहीं. नाहीं तर मी होऊन का तुला तिकडे पाठविलें असतें !

**गोदावरी**-मागें एक दोन स्थळें पाहिलीं होतीं, तशांतलेंच हेही असेल ! मागें पांचशें रुपये मिळत होते, आतां सातशें मिळत असतील ; म्हणून हें स्थळ चांगलें ! आणि मला तिकडे पाठवून देण्याविषयीं एवढा आग्रह तरी त्याकरतांच असेल मला आतां कोठें ओपरण्याचा बेत केला आहे कोण

जाणें ! त्यांच्या बेताला आड येण्यासही माझ्या मायेचें असे तेथे कोणी नाहीं. तूं जरी तेथें असतीस तरी बाबाला चार गोष्टी समजून सांगतीस; पण तेंही नाहीं ईश्वर काय करील ते खरें !

मावशी–काय करावं लाडके ! आतां माझ्या हातांत काय आहे ! मागें एक दोन वेळां मी त्यांच्या बेतांत मोडा घातला होता. तो तेव्हां चालला. त्याचें कारण तेव्हां तुझी सावत्र आई जरा लहान होती. त्यामुळें तेव्हा तुझा बाप तिच्या ओंजळीने पाणी पिऊं लागला नव्हता. आतां तर तो तिच्या अगदीं मुठीत आला आहे. त्यामुळे तो हल्लीं माझें बोलणें ऐकणार नाहीं. आणि हे त्याच्या पत्रावरूनही दिसतच आहे. तुझें वय लग्नाचें झालेंच आहे, तेव्हा यदा कार्य तर केलेंच पाहिजे. पण तुला एकदां चांगलेंसें ठिकाण मिळतें म्हणजे माझें मन स्वस्थ झालें असतें. लग्न म्हटलें म्हणजे त्या जन्माच्या गांठी. ह्याकरिता त्या कामांत जर थोडें दुर्लक्ष केलें तर त्या नवरानायकोंस सगळा जन्म दुःखांत घालावा लागतो. ह्याकरितां ह्या गोष्टीचा पहिल्यानेच विचार केला पाहिजे. तिकडे घरीं तरी प्रत्यक्ष तुझा बापच आहे. त्याला आपल्या पोटच्या गोळ्याची काहीं तरी ममता असेलच. आता जरा पैशाकडे अधिक लक्ष आहे, आणि त्याला शिकविणारी ती तरी तुझी सावत्र आई त्यामुळें जरा काळजी लागली आहे. पण ती दूर करण्याला काहीं उपाय नाहीं. पाठवीत नाही म्हणून तर काहीं चालत नाहीं. आतां तूंही समंजस आहेस. भलत्याशा ठिकाणीं बाप तुला देऊं लागला तर जरा भीड सोडून लाडक्या व गोड शब्दांनीं बापाची समजूत घाल. तू त्याची एकुलती एक मुलगी आहेस, तेव्हां तुझें हिरमुसलें तोंड पाहून बापाचें मन कांहीं तरी वळल्याशिवाय राहणार नाहीं. तेथे गेल्यावर या आईजवळ फार गरीबीने व तिच्या मनाप्रमाणें वाग. म्ह-

म्हणजे तिचेंही मन तुझ्या कन्याकडे कांहीं वळलें तर वळेल. आतां बरीच रात्र झाली, नीज आतां. सकाळीं लवकर उठलें पाहिजे. गाडी लवकर निघेल तितकी चांगली. म्हणजे फार ऊन होण्याच्या पूर्वी बराच पल्ला येईल. गर्गाचार्यांच्या मुहूर्तानें निघावें.

असें बोलणें झाल्यावर मावशी गोदावरीस कुशींत घेऊन झोंपीं गेली. गोदावरीही सचिंत मनानें विचार करीत झोंपीं गेली. परंतु त्या रात्रीं दोघींसही चांगली झोंप आली नाहीं. पहाटेचे चार वाजतां मावशी उठली. तिनें गोदावरीची वेणीफणी करून तिला आंगधुणें घातलें, आणि तिला फराळास दिलें ती फराळ करावयास बसली, पण तिला एक घांसही जाईना. तिचा कंठ भरून आला होता. ती मावशीस म्हणाली:—

मला कांहीं खावयास नको. माझ्या गळ्याखालीं घांसच उतरत नाहीं.

तिच्या मनांत काय चाललें होतें तें मावशी समजली. आणि म्हणाली:—

बेटा, हें काय बरें ! आज तुला जेवण लवकर मिळावयाचें नाहीं. उशीर होईल. त्याकरितां आतां थोडकेंसें खालेलें असलें म्हणजे बरें. मी भरवतें तुला. भरवूं का माझ्या लाडकीला !

गोदावरीनें मानेनेंच भरव अशी खूण केली. तेव्हां मावशी जवळ बसून तिला लाडू व दहींपोहे भरवूं लागली.

गोदावरी-( गहिंवरून ) मावशी, आतां उद्यांपासून मला असें कोणी कधीं तरी भरवील कां ! मी जेवीत नाहींशी झालें तर-'तुला दूध घालूं काय, दहीं घालूं काय ! ' असें मला कोण विचारील ! मला मांडीवर घेऊन खाऊ कोण तोंडांत घालील ! ( स्फुंदस्फुंदून रडूं लागते )

**मावशी**-माझ्या बाळीला आतां लग्नांत नवरा घांस भर-वील ! मग आणखी तूं मोठीं झाल्यावर नवरा आणि तूं खोलींत बसून, मिठाई, फळफळावळ खाल, तेव्हां एकमेकां-च्या तोंडांत घांस द्याल ! मग तुला मावशीची आठवण दे-खील होणार नाहीं ! तूं आपल्या नवऱ्याची लाडकी झालीस, म्हणजे तो तुझे सगळे लाड पुरवील. ईश्वरानें तसें एकदां या कानांनीं ऐकावें म्हणजे झालें !

**गोदावरी**चा फराळ झाल्यावर तिच्या निघण्याची तयारी झाली. मावशीनें तिच्या साड्याचोळ्यांचें बोचकें बांधिलें. तिचे दागिने लहानशा करंड्यांत घालून तिजपाशीं दिले. **गोदावरीस** न्यावयास आलेल्या मनुष्यानें गाडी जुंपून रस्त्या-वर आणून उभी केली. **गोदावरीनें** मावशीच्या घरांतील मनुष्यांचा निरोप घेतला. ती स्वभावानें व गुणांनीं फारच उत्तम असल्यामुळें, तिच्या जाण्यानें मावशीच्या घरांतील सर्व मनुष्यांस फार वाईट वाटलें. मावशी तिला पोंचविण्यास आंगण्यांत आली. **गोदावरीनें** तिच्या कंबरेस कडकडून मिठी मारिली. मावशीनें तिच्या तोंडावरून व पाठीवरून हात फिरविला; परंतु तिचा कंठ दाटून आल्यामुळें तिच्यानें एक शब्दही बोलवेना. **गोदावरी**सही हुंदका आवरेना. ह्या स्थितींत त्या दोघींचाही कांहीं वेळ गेला. इतक्यांत **गो-दावरीस** न्यावयास आलेल्या मनुष्यानें "उशीर झाला, आ-टपा आतां. मग उन्हाचे बैल चालत नाहींत" असें सांगितलें. तेव्हां मावशीनें तिची मिठी सोडून 'बेटा आतां ये बरें !' तुला सांगावयाचें तें सर्व सांगितलेंच आहे. तूंही शहाणी आहेस, तेव्हां आतां तुला आणखी कांहीं सांगावयास नको, आणि मला आतां कांहीं सुचतही नाहीं, व सांगवतही नाहीं.

**गोदावरी**-( स्फुंदस्फुंदून ) म म मावशी ! तूं तूं येशील ल ल लग्नाला ! म मला इ इ इकडे कधीं आणशील !

**मावशी**-तुझ्या बापानें मला नुस्ता निरोप पाठविला तरी मी आपल्या लाडकीच्या लग्नाला येईन. अनमान करणार नाहीं. त्यानें बोलाविलेंच नाहीं तर मग उपाय नाहीं. तसें झालें तर तुझें लग्न होऊन तूं नवऱ्याकडे गेलीस म्हणजे मग तुम्हा दोघांसही इकडे आणावयास पाठवीन. आतां ये बरे उशीर झाला!

**गोदावरी** गाडींत बसल्यावर गाडी चालू झाली. मावशी व **गोदावरी** ह्या एकमेकींस दिसत नाहींशा होत पर्यंत एकमेकींकडे पहात होत्या. दिसत नाहींशा झाल्यावर मावशी आपल्या घरांत गेली, व **गोदावरी** आपले डोळे पुसून दुःखांत व सचिंत मनानें गाडींत बसून राहिली.

**गोदावरी** आपल्या घरीं येत असतां वाटेंत, कांहीं सांगण्यासारखी विशेष गोष्ट घडली नाहीं. ती दोन दिवसांनीं आपल्या घरीं पोहोंचली. ती घरांत शहाण्या व मर्यादशील मुलींनीं आपल्या आईबापांजवळ जसें वागावें, तशी वागत असे, व आपल्या सावत्र आई जवळ फार गरीबीनें व तिच्या आज्ञेंत वागत असे. आपल्या ह्या आईचा आपणावर राग होण्यास आपणाकडून कांहीं कारण होऊं नये म्हणून ती फार जपून वागे. **गोदावरीचें** सुंदर रूप, तिचें गोड बोलणें, तिच्या उठण्याबसण्याची ठाकठिकीची ढब, तिचा शिवण्याच्या व कशिदा काढण्याच्या कामांत नाजूक हात, तिचा गोड स्वभाव व सभ्य वागणूक, ह्यांच्या योगानें तिजपाशीं असणाऱ्या कोणाही मनुष्याचें मन तिजकडे लागावें व ती त्याची आवडती व्हावी, अशी ती होती. परंतु तिच्या सावत्र आईस तसें कांहीं न वाटतां त्याच्या उलट तिच्या रूपाचा व गुणाचा तिच्या मनांत मत्सर उत्पन्न झाला. आधीं अशिक्षित तरुण स्त्रियांस दुसऱ्या बायकोचें कांहीं चांगलें पाहिलें म्हणजे मत्सर उत्पन्न होतोच. त्यांतही **राधाबाई** मूळचीच वाईट स्व-

भावाची होती आणि त्यांत **गोदावरी** ही तिच्या सवतीची मुलगी! मग तिच्या मनांत तिच्याविषयीं किती मत्सर उत्पन्न व्हावा हें उघड दिसतच आहे! सारांश **राधाबाई**, **गोदावरी**चा फार द्वेष करूं लागली. त्यामुळें तिला **गोदावरी**चें तेवढें सगळें वाईट दिसूं लागलें, व तसें ती आपल्या बोलण्यांत व कृतींतही दर्शवूं लागली.

'**गोदावरी** सुरेख आहे' असें कोणी म्हटलें, म्हणजे हिनें म्हणावें 'काय मोठी रंभा लागून गेली आहे! आहे चार बायकांसारखी बायको' तिच्या गोड बोलण्याची कोणी स्तुति केली, म्हणजे ही म्हणे 'असलीं गोडबोलीं माणसें मोठीं मानकापी असतात! हीं जितकीं बाहेर गोड तितकीं आंत कडू! साखरेच्या सुया!' तिच्या बसण्या उठण्याच्या ठाकठिकीचें कोणी वर्णन केलें म्हणजे ही तो 'कसबिणीचा थाट' म्हणे. तिच्या शिवण्याविषयीं व कशिद्याविषयीं कोणीं बोलूं लागले, म्हणजे हिनें तिला 'शिंपीण' म्हणावें. ह्याप्रमाणें ती **गोदावरी**च्या ज्या त्या गोष्टीविषयीं निंदा करी. तिला दिवसभर फार जाचीत असे. हिनें उगीच कांहीं तरी खुसपट काढून तिला कठोर शब्दांनीं वारंवार बोलावे. बसाबसा आंगावर यावें. तिला चांगलें खाण्यापिण्यासही देऊं नये! असें असतांही **गोदावरी** आपल्या स्थितीकडे व मावशीच्या उपदेशाकडे लक्ष देऊन त्याविषयीं चकार शब्द बोलत नसे. **गोदावरी** कधीं बापाजवळ एकटीच असली म्हणजे ती त्याजपाशीं शहाणपणाच्या व गोड गोष्टी बोलूं लागे, व त्यांनीं त्याचें मनही आनंदित होण्याच्या रंगांत येई, परंतु इतक्यांत **राधाबाई** कांहीं तरी कामाचें निमित्त काढून तिला मोठ्याने जळफळून हाक मारी. आणि म्हणे कीं, आतां कांहीं लहान नाहीं घोडी! बसून लाडक्या गोष्टी सांगण्याला! घरांत काम करावयाचें तसेंच पडलें

आहे. 'काम करण्याला मावशीकडून एखादा चाकर नाहीं आणिला बरोबर! लिहितां, शिवतां आलें म्हणजे झालें, मग घरांतलें काम आपोआप होतें असें नाहीं कांहीं!' अशा प्रकारें नळफळून हाक मारी. त्यामुळें गोदावरीस लागलेंच बापाज-वळून उठून जावें लागे. बरें ह्या तिच्या जळफळण्याविषयीं तिच्या नवऱ्यानें तरी कांहीं बोलावें, परंतु तो पडला म्हातारा, बिजवर आणि शुंभ! आणि बायको राधाबाई सारखी!—अशा प्रकारच्या बायकांचा, अशा प्रकारच्या नवऱ्यांवर किती अंमल असतो हें सर्वांस ठाऊकच आहे—तेव्हां मुलीवर जळफळण्याब-द्दल त्र्यंबकभट बायकोला काय बोलणार! शिवाय ती राधा-बाई रोज रात्रीं, नवऱ्याजवळ गोदावरीविषयीं खोट्या नाट्या कागाळ्या सांगून त्याचें मन तिजविषयीं दूषित करीत असे. 'गोदू माझें ऐकत नाहीं. ती मला उलट उत्तर देते. घरांतलें काम करीत नाहीं. केलें तरी जळफळते. पाय हपटते. मला अखीण म्हणते. तूं माझा नाश करशील म्हणते. कसबिणी सारखी नटते. निर्लज्जपणें पुरुषांकडे पहात असते. असें तिचें रोज चऱ्हाट चालत असे. तें त्या म्हाताऱ्या नवऱ्यालाही बहुत करून खरें वाटे.' त्यामुळें तोही संतापून म्हणे कीं, 'ती पोर मावशीकडे राहिल्यामुळें असे वाईट गुण मात्र शिकली, दुसरें कांहीं नाहीं. आतां एकदां लग्न झालें म्हणजे तिच्या सास-ऱ्यांस पोहोंचवितों, ती पुनः इकडे आणावयाचीच नाहीं. म्हणजे तिची खोडकी जिरून ती ताळ्यावर येईल.

वर सांगितल्या प्रकारच्या आपल्या सावत्र आईच्या जा-चांत व पुढें आपलें कसें काय होईल ह्या चिंतेंत गोदावरी आपल्या घरीं दिवस काढीत राहिली.

---

## भाग २ रा.

त्र्यंबकभटानें ज्या दिवशीं गोदावरीस तिच्या मावशीकडून आणावयास मनुष्य पाठविला, त्याच दिवशीं गोपाळरावाची बायको अजारी होती ती गत झाली. ती बायको मरून दोन तीन दिवस झाले इतक्यांत त्या शहरांत जे गोपाळरावाचे स्नेही होते त्यांपैकीं रामभाऊ नांवाच्या एका मित्रानें गोदावरी ही देवदर्शनास गेली असतां तिला पाहिलें. तो रामभाऊही गोपाळरावासारखाच तरूण चैनी व दुर्व्यसनी होता. त्यानें तो गोदावरीचा सुरेख स्वच्छ चेहेरा नाक सरळ गुलाबी गाल, आरक्त ओष्ठ, डोळे काळेभोर पाणीदार व चंचल. आकर्ण ओढलेल्या धनुष्याप्रमाणें भुवया, भ्रमरासारखे काळे केश; सर्पासारखी वेणी, कंबर बारीक, बांधा सडपातळ, हातपाय गोंडस, लिंबासारखी कांति, व तिची एकंदर बाल्य आणि तारूण्य यांच्या मधील मुग्धावस्था, हीं जेव्हां पाहिलीं तेव्हां तो तर अगदीं दंग होऊन गेला, व त्याला ही बाला तर केवळ प्रति रंभाच आहे असें वाटलें. व ही आपणास मिळेल तरच आपलें जीवित सफळ, असेंही त्याच्या मनांत आलें. त्यामुळें त्यानें गोदावरी ही कोणाची मुलगी वगैरे सर्व शोध केला. परंतु जेव्हां ' सातशें रुपये मिळाल्याशिवाय ती द्यावयाची नाहीं ' असा तिच्या बापाचा निश्चय त्यास कळला. तेव्हां त्याचे हातपाय मोडले. कारण तो स्वतः कफल्लकच होता. श्रीमंत तरुण पुरुष व्यसनी व उडाऊ निघाला म्हणजे त्याच्या जवळ तशा प्रकारच्या फुकटखाऊ स्नेह्यांचा परिवार जमावयाचाच त्याप्रमाणेंच हा रामभाऊ गोपाळरावाची खुशामत करून व त्याला व्यसनांच्या कामांत सहाय करून त्याच्या चैनींतच आपण चैन मारणारा होता. त्याला गोदावरीची इच्छा उत्पन्न होऊन उपयोग काय ? त्याला जेव्हां तिच्या बापाचा निश्चय समजला तेव्हां ती आपणास तर मिळत नाहीं

अशी त्याची खातरी झाली. तथापि त्यानें विचार केला कीं, ही आपल्याला जरी मिळाली नाहीं तरी आपल्या स्नेही मंडळीपैकीं कोणाच्या तरी वांट्यास आली पाहिजे. म्हणजे निदान आपला तिचा केव्हां तरी योग घडून येईल. निदान या गांवांतून तरी तिला बाहेर जाऊं देतां उपयोगी नाहीं म्हणजे कोणताही प्रयत्न करण्यास ठीक पडेल.

एक दोन दिवसांपूर्वी **गोपाळरावा**ची बायको वारली होती हें मागें सांगण्यांत आलेंच आहे. ती गोष्ट **रामभाऊ**च्या मनांत लागलीच आली. तो म्हणाला आपल्या स्नेह्यांचें कुटुंब वारलें आहे. तर जसें तसें करून त्यालाच खंडेराव करून ही त्याच्या पदरांत पडे असें केलें पाहिजे. त्याला चण्याच्या झाडावर चढविण्यास आपल्यास कांहीं कठिण नाहींच ! व असें केलें म्हणजे एक तर आपल्या मित्राचें काम केलेंसें होईल. व तणेंकरून त्याला आनंद होऊन आपणावर त्याची अधिक मर्जी बसेल. दुसरें ती त्याच्या घरीं गेल्यावर सवडी सवडीनें तिच्याशीं आपलें सूत्र जुळवितां येऊन तें जुळविण्यासही कांहीं विशेष श्रम पडणार नाहींत. कारण **गोपाळराव** पडले पराकाष्ठेचे बाहेरख्याली त्यामुळें हिची आणि त्यांची कधीं सटीं सहामाशीं गांठ पडणार ! तेव्हां या तरुणीनें रोज घरांत काळ कसा घालवावा ? तिला पुरुषाशिवाय करमणार नाहींच. तसें करमेनासें झालें ह्मणजे आपण तिची प्रीति संपादण्याचा उद्योग झपाट्यानें सुरू करूं. हिकडे **गोपाळरावा**चेंही मन तिजकडे विशेष लागूं नये म्हणून त्यांना चालला आहे ह्याच नादांत अगदीं गुंतवून टाकण्याचा प्रयत्न करूं, म्हणजे ती झालीच वश ! आणखी **गोपाळरावाच्या** घरांत आपणास कोठेंही जाण्यास किंवा कोणाशीं बोलण्यास प्रतिबंध नाहींच. त्यामुळें तें संधान जमविण्यास विशेष कठिणही पडणार नाहीं. आणखी तिचें मन आपणावर लवकर प्रसन्न व्हावें याकरितां आपण तिला सांगूं कीं, तुला

गरीबाच्या मुलीला एवढ्या श्रीमंताचें घर मिळण्यास सर्व पक्षीं मी कारण झालों आहे. हे माझे तुजवर मोठे उपकार आहेत. ह्या उपकारांची फेड अमुक अमुक रीतीनें झाली पाहिजे. असें सांगितलें म्हणजे ती खचित कबूल होईल. कदाचित् कांहीं गमजा करूं लागलीच तर-" जा तूं असा गमजा करून आमचे ऐकणार नाहींस तर **गोपाळरावांचा** व माझा जिवश्चकंठश्च स्नेह आहे, तो तुला ठाऊक आहेच त्यांना 'तूं पापवासना धरून माझ्या गळीं पडत होतीस' असें सांगून ते तुझें नांव घेणार नाहींत व तुला हांकून देतील असें करीन" अशी तिला खरपूस समज द्यावी म्हणजे तर ती ताळ्यावर येईल कीं नाहीं ? आधीं इनक्यावर येणारच नाहीं, आणि आले तरी आपण युक्ति योजून ठेविलीच आहे.

हा विचार ठरल्यावर त्याच दिवशीं संध्याकाळीं **गोपाळराव** एकटाच बसला आहे असें पाहून **रामभाऊ** त्याचे घरीं गेला. बसल्यावर:—

**गोपाळराव—रामभाऊ,** आतांशीं शिनचा वेळ कांहीं कल्यान जात नाहीं. एक एक घटका वर्षासारखी जाते. दिवसास कोणी परके गृहस्थ बसावयास येतात. त्यांच्या बरोबर बोलतांना जसा तसा दिवस जातो. त्यांच्या जवळ बोलण्याचा तरी मला त्रासच येतो. कारण कोणी आला म्हणजे पहिल्यानें जरा वाईटसें तोंड करून-" काय झालें तुमच्या कुटुंबाला, किती दिवस अजारी होती, औषध कोणाचें चाललें होतें" असे प्रश्न विचारितात. त्यांचीं उत्तरें मला द्यावी लागतात. हें विचारणें झालें म्हणजे मग 'गरीब होती बिचारी फारच गरीब. पण आयुष्यच संपलें तेथें कोणाचा इलाज आहे ! अस्तु. ईश्वर ठेवील तसें राहिलें पाहिजे. त्याच्या सत्तेपुढें कोणाचें चालत नाहीं. मृत्युलोकची वस्ती अशीच क्षणभंगुर आहे.' असें बोलून जरा स्तब्ध राहून एक लांबसा श्वास

टाकितात. नंतर मग ' असो आतां, असें झालें त्याला काय करणार ! मनाला विवेक करून दुःख आवरिलें पाहिजे ' असें सांगतात. कोणी ' आतां हें उत्तर कार्य वगैरे आटपलें म्हणजे नवीन उद्योगास लागावें. अजून तुमचें वय कांहीं फार झालें नाहीं. पुढें सगळा जन्म घालवावयाचा आहे. संसार व्हावयाचा आहे. शिवाय ईश्वरकृपेनें तुम्हास अनुकूलताही आहे. तेव्हां लवकरच तजवीज पहावी. ' अशा गप्पा छाटतात. याखेरीज कोणा वैद्याची स्तुति कोणाची निंदा, कोणा मनुष्याच्या मरणाची किंवा मोठ्या दुखण्यांतून जगल्याची हकीकत, हा कारखाना दिवसभर चाललेला असतो. ते बोलत असले म्हणजे आपल्यासही जरासें वाईट तोंड करून बसावें लागतें. व मध्ये मध्यें हो नाहीं म्हणावें लागतें. आमच्या मित्रांपैकीं कोणी बसावयास येतें तर बरें झालें असतें. पण गांवांतील पोक्त पोक्त म्हातारे ह्मातारे ह्यांपैकीं दिवसभर कोणी नाहीं कोणी तरी येथें असतोच; त्यामुळें आमचे तरुण स्नेही त्यांच्या देखत येण्यास लाजतात. ह्या कटकटीनें माझें कपाळ उठलें आहे. मेली तर मेली बायको ! कांहीं जग नाहीं ओसाड पडलें ! आम्हाला करणेंच झाली तर तिच्या सात सवाईनें दुसरी करूं. रात्रीस बिछान्यावर पडावें, तर बहुतेक रात्र जागरण करण्याची संवय रोज असल्यामुळें झोपही लवकर येत नाहीं. दोन दोन तीन तीन वाजतां डोळा लागला तर लागतो. बरें कोठें बाहेर फिरावयास जाऊं म्हटलें, तर तसें उघडपणें जातां येत नाहीं. जरा वाईट दिसतें. बाकी लोकांच्या वाईट म्हणण्याची आपण फारशी पर्वा करीत नाहीं, पण उगीच म्हाताऱ्या म्हाताऱ्या भटांना बरें दिसतेंसें केलें पाहिजे. बायको मरून मेली, पण आम्हाला मागें दहा पंधरा दिवस हा त्रास उगीच दिला !

**रामभाऊ.**–अहो **रावसाहेब** बायकोचें सुतक तरी फिटूं द्या. त्या बायकोसाठीं कांहीं दुःख तरी करा ! सुतकाच्या दिव

सांत तरी विसावा घ्या. मग आहेच आपली रोजची गमत. आणि मग कोठें तरी लग्नाचेंही संधान जुळविलें पाहिजे. पण आतां बायको मात्र अगदीं मारू पहावयाची!

**गोपाळ.**-आतां आपल्यास लग्न करावयाचेंच नाहीं. उगीच लचांड पाहिजे कशाला! लग्नाशिवाय नाहीं कांहीं चालत! सर्व कांहीं यथास्थित चालतें कांहीं कमी पडत नाहीं. बायको असली म्हणजे उलटा आपल्या चैनींत मात्र थोडा व्यत्यय येतो.

**रामभाऊ.**-छेः हो, हें काय भलतेंच! बायको असली म्हणून आपल्या चैनींत कां व्यत्यय येतो! आजपर्यंत कोठें आला होता! आणि दैवयोगानें एखादी फांकडी मिळाली तर मग काय! लाट झाला! मग इतर चैनी वगैरे कांहीं नकोतशा होतील. आपल्या सारख्याला सुंदर बायको मिळण्याला कांहीं तोटा आहे! आपल्या तोंडांतून निघण्याचा मात्र अवकाश. कोण पाहिजे तो श्रीमंत गृहस्थ आपली मुलगी पायांवर आणून घालील. कदाचित् एकाद्या गरीब आणि कृपण मनुष्याची सुंदर मुलगी असली, आणि तिच्याकरितां हजार पांचशें रुपये द्यावयास लागत असले, तरी कांहीं हरकत आहे असें नाहीं. मिळून लग्न करण्यास किंवा होण्यास अडथळा कांहीं नाहीं. मी आज जी एक मुलगी पाहिली आहे, ती जर आपल्यास मिळेल आणि मिळण्याला कांहीं हरकतही नाहीं—तर मला वाटतें आपण आनंदसमुद्रांत बुचकळूं लागाल. आपल्या ह्या **वसई** शहरांत आज आधेकउण्या पाढरपेशांच्या बायका व वेश्या मिळून निदान हजार बाराशें तरी असतील. त्यांपैकीं तरुण अशा चार पांचशें तरी निघतील पण मी जी पाहिली म्हणतों तिच्या जोडीला अशी ह्यांत एक देखील मिळणार नाहीं तिचा चेहरा, तिचा बांधा, आंगाचा नाजुकपणा व गोंडसपणा,

चालण्याची ढब, ह्या प्रत्येकाचें वर्णन करावें तेवढें थोडें आहे! मला वाटतें कीं, तिला बनविण्याच्या कामांत ब्रम्हदेवानें आपलें संपूर्ण कौशल्य खर्च केलें असावें! मीं तिला पाहिलें तेव्हांच माझ्या मनांत आलें कीं, हें रत्न गोपाळरावजींच्या गळ्यांत पडेल तर फार उत्तम होईल. मीं तिला कालच पाहिलें.

**गोपाळराव**-खरेंच का हें. रामभाऊ! खरीच कां ती इतकी लावण्य संपन्न आहे! कीं उगीच माझें मन लग्न कर-ण्याकडे वळण्याकरितां तूं असें सांगतोस!

**रामभाऊ**-भलतेंच, मी आपणाजवळ असली गोष्ट खोटी सांगेन! शपथपूर्वक सांगतों कीं, ती मुलगी अत्यंत लावण्य संपन्न आहे.

**गोपाळ०**-तूं रसिकच आहेस. नीट पाहिल्याशिवाय उगीच एखादीचें असें वर्णन करणार नाहींस. हें खरें, पण ती जरी सुंदर असली, तरी लग्नाची मुलगीचना! अजून तिला बायको होण्याला पुष्कळ वर्षे लागतील. तों पर्यंत आम्ही कां माशा मारीत बसावें! "बिबीसाहेब येणार उमरींत तों मियासाहेब जाणार कबरींत" अशी अवस्था व्हाव-याची! असो. तरी तूं म्हणतोस तशी जर ती सुंदर अ-सली, तर ठेवूं करून. कधीं तरी उपयोगी पडेल. पण ती मुलगी कोणाची! आहे काय खटला!

**रामभाऊ**-रावसाहेब, जरा माझें ऐकून तर घ्या. आपणच बोलून संपवूं नका; मला बोलूं द्या. अहो तिचें लग्न व्हावयाचें आहे, तरी ती इतर मुली लग्नांत असतात तशी लहान नाहीं. कदाचित ऋतु प्राप्त झाला असेल, किंवा एक दोन महिन्यांत होईल. मग नाहींना तुम्हाला माशा मारीत बसावें लागणार! वरातीच्या दिवशींच पाहिजे तरी बिछाना खोलींत घालितां येईल! मीं जें म्हटलें कीं, ती तुम्हाला योग्य आहे तें उगीच विचार केल्याशिवाय म्हटलें नाहीं. कशी तरी आज चार वर्षे

तुमच्या सहवासांत घालविलीं आहेत. त्यामुळें तुमची प्रकृति थोडी बहुत तरी मला माहीत झाली आहे. आतां त्या मुलीची हकीकत ऐका. ती त्या मोडक्या बुरजाजवळील त्र्यंबकभटा-ची मुलगी. पहिल्या संबंधाची आहे तिची आई बारल्यापासून ती आपल्या मावशीकडे होती. त्यामुळें येथें कोठें आपल्या दृष्टीस पडली नाहीं तिचें लग्न चार वर्षांपूर्वीच व्हावयाचें, पण हा त्र्यंबकभट पडला कवडीचुंबक! त्याच्या मनांत त्या मुलीचें गिळंकृत कन्यादान करावयाचें! तें तिच्या मावशीच्या मनास येईना. म्हणून ती लग्नाची आजपर्यंत राहिली. आतां जेव्हां अगदीं अवधि राहिली नाहीं, तेव्हां मावशीकडून तिला इकडे आणिलें मुलगी मोठी आहे व सुंदर आहे. म्हाताऱ्या कोताऱ्या कशाही मनुष्याला देण्याला तो तयार आहे म्हणून त्यानें तिच्या गळ्यांत हजार रुपयांची चिटी बांधून ठेविली आहे. पण मला वाटतें कीं हजार रुपये तर तिच्या नखावरून ओंवाळून टाकावे. अशी ती सुंदरी आहे. म्हणून म्हणतों तें नमवावें एकदां, आणि घ्यावें उरकून.

गोपाळराव:-हजार रुपये घेणार अं! खाटीकच हा! ते खाटीक बकऱ्याचें मांस विकतात तें तरी बरें! हा तर प्रत्यक्ष आपल्या पोटच्या पोराचेंच मांस विकणार! ह्याची त्यांच्यावर कडी म्हटली पाहिजे. पण येथें कोण हजार रुपये देऊन त्याची मुलगी करण्याला लग्नाला सुजला आहे! आमच्या पहिल्या संबंधाच्या वेळेस हजार रुपये हुंडा नाहीं आम्हीं कबूल केला. मग आमच्या सासऱ्यानें बाराशें रुपये दिले, तेव्हां आमचें त्यांचें ठरलें. तें आतां म्हणजे हजार रुपये उलटे तिच्या बापाला द्या! बसेना तो आपली मुलगी घेऊन! रुपये भरून लग्न करण्यापेक्षां आमचें लग्न झालें नाहीं तरी चिंता नाहीं. आम्ही राहूं तसेंच लग्नावांचून. त्यावांचून आमचें काय आडतें आहे! आम्हाला काय कमी आहे!

**रामभाऊ.**–रावसाहेब, आपण हजार रुपये देऊन लग्न करा नाहीं तर नका करूं. पण मी म्हणतो कीं, तिला एकदां आपण नजरेखालीं तर घाला. मग पुढचा विचार पुढें.

**गोपाळराव**-चिंता नाहीं. नजरेखालीं घालूं. केव्हां, कोठें आणि कशी ती तूं माझ्या दृष्टीस पाडणार!

**रामभाऊ**:–मी तिला आज एक दोन दिवस **नारायणराव** मास्तरच्या बागेंत संध्याकाळचे चार साडेचार वाजतां फुलें तोडण्यास जातांना पाहतों. तेव्हां त्या बागेच्या आसपास त्या वेळेस आपण जाऊं म्हणजे झालें.

**गोपाळराव**:-ठीक आहे. उद्यां त्या वेळेस तिला पाहण्यास खचित जावयाचें. तूं मात्र त्या वेळेस येण्यास चुकूं नको.

**रामभाऊ.**–काय वेड आहे ! मी तर मुळीं ती तुम्हाला दाखविणार मग मी कसा येणार नाहीं ? बरें. आतां आठ वाजून गेले. जेवणाची वेळ झाली आहे, जातों आतां.

याप्रमाणें बेत ठरल्यावर **रामभाऊ** आपल्या घरीं गेला. **गोपाळरावानें गोदावरीस** पाहिलेंच नव्हतें त्यामुळें त्याच्या मनांत तिच्या प्राप्तिविषयीं वगैरे उत्कंठा उत्पन्न झाली नव्हती. त्याच्या योगानें त्याची ती रात्र रोजच्याप्रमाणें गेली. पण **रामभाऊला** त्या रात्रीस चैन पडलें नाहीं. कारण त्यानें तिला पाहिल्यापासून तिचा त्याला एकसारखा ध्यास लागला होता, व ती आपणास प्राप्त होण्याला तिचें **गोपाळरावाशीं** लग्न होणें, हाच काय तो सुलभ उपाय आहे असें त्याच्या मनानें ठरविलें होतें. त्यामुळें उद्यां तिला पाहिल्यावर **गोपाळरावाचें** मन तिजकडे वेधतें कीं नाहीं, व तो हजार रुपये देऊन तिचा अंगिकार करतो कीं नाहीं, ह्याची त्याला मोठी काळजी पडली होती.

दुसरे दिवशीं आदल्या रात्रीं ठरलेल्या संकेताप्रमाणें **राव॰**

भाऊ गोपाळरावाकडे आला. नंतर ते दोघे मिळून हळू हळू नारायणराव मास्तरच्या बागेपाशीं जाऊन पोहोंचले. ते बाहेर उभे राहून बागेंत इकडे तिकडे पहात आहेत इतक्यांत गोदावरी साडेचार वाजण्याच्या सुमारास आपल्या रोजच्या क्रमाप्रमाणें त्या बागेंत फुलें तोडण्यास आली तिला पाहून:—

**रामभाऊ**.—रावसाहेब, हेंच तें रत्न बरें का! आतां मी सांगितल्याप्रमाणें आहे कीं नाहीं तें पाहून घ्या!

संध्याकाळची वेळ होती, सूर्य मावळावयास जात होता त्याचे कोमल किरण त्या बागेंतील वृक्षवल्लींवर पडले होते, व बागेत वृक्षांची दाट छाया पडली होती, गोदावरी स्वच्छंदानें फुलें तोडण्याकरितां इकडे तिकडे फिरत होती, ती मेघांतून वीजच फिरत आहे कीं काय असें दिसत असे! गोपाळराव तिचें लावण्य पाहिल्याबरोबर अगदीं वेडा होऊन गेला व तिजकडे एकसारखा पहात स्तंभासारखा उभा राहिला. जणूं काय तो आपल्या हृदय फलकावर तिची तसबीरच काढीत आहे! व ती काढण्यांत वांकडया तिकडया रेघा नाऊं नयेत म्हणूनच जणूं काय तो हालत नाहीं! असें वाटलें.

कांहीं वेळ फुलें तोडल्यावर गोदावरी बागेच्या बाजूला जो बंगला होता तिकडे गेली. त्यामुळें व मध्यें वृक्ष आडवे आल्यामुळें ती गोपाळरावास दिसेनाशी झाली. ती दिसेनाशी झाल्यावर तो शुद्धीवर आल्यासारखा झाला, आणि रामभाऊ नवळच होता त्यास म्हणाला:—

**गोपाळराव**—रामभाऊ मी ती पाहिली न पाहिली, इतक्यांत तीच पटकन निघून गेली. डोळे भरून पाहिली देखील नाहीं. आतां कोठें बरें ती दिसेल? आहाहा! काय तें सौंदर्य मला वाटतें हिला ब्रम्हदेवानें बनविलें नसावें. कारण म्हातारा, खप्पड, वैदिक, अरसिक तो! तो काय असें सुकुमार

लावण्य निर्माण करणार आहे! ह्यावरून हिला रसिक, सुंदर व रंगेल जो कामदेव त्यानें आपल्या हातानें बनविलें असावें असें वाटतें! अरे ती चांगलीशी दिसली देखील नाहीं!

**रामभाऊ**–अहो घटका झालीना! एकसारखे तिजकडे पाहतांच आहां! तरी अजून म्हणतां 'चांगलीशी दिसली नाहीं' ह्याला काय म्हणावें! कां पण मी सांगितल्याप्रमाणें आहे कीं नाहीं! कीं मी उगीच गप्प मारिली! आतां हिच्या-करितां हजार रुपये खर्च करावेसें वाटतें कीं नाहीं! पण येथें रस्त्यांत बोलणें नको. अगोदर तुमच्या घरीं चला मग बोलूं (गोपाळरावाच्या घरीं जाऊन खालींत बसल्यावर).

**गोपाळराव**–रामभाऊ, मी इतके दिवस समजत होतों कीं, तूं एखाद्या माषुकाचें वर्णन करण्याच्या कामांत मोठा कुशल आहेस. पण तूं ह्या सुंदरीचें जें मजजवळ वर्णन केलेंस त्यांत फारच घसरलास असें वाटतें. तुला तिच्या वास्तविक सौंदर्याच्या दशांशाचें देखील वर्णन करितां आलें नाहीं. अरे हिच्या प्राप्तीसाठीं एक हजार तर काय पण दहा हजार, किंबहुना आपली सगळी दौलत देखील भरीस घालीन. फार तर काय, पण हिच्याकरितां हा प्राण जरी खर्च झाला तरी चिंता नाहीं. गड्या, कसें तरी करून तिचा माझा एकदां लवकर समागम होईल असें कर.

**रामभाऊ**–आतां हें सुतक फिटलें म्हणजे लागलेंच त्या तजविजीस लागावयाचें. तें जुळण्याला कांहीं उशीर नाहींच; कारण तिच्या बापाचा निश्चय मी काल तुम्हांला कळविलाच आहे, आणि तो आपल्यास आतां मान्यही आहे. मग आपला लग्न करण्याचा बेतच फिरला तर मात्र अडचण!

**गोपाळराव**–अरे उगीच कां आतां ठोसरे मारितोस! तिच्यासारखी स्त्री मिळाली असतां प्रत्यक्ष शुकयोगींद्र देखील लग्न करण्यास तयार होईल. मग मी तर काय पः

कश्चित् चैनी मनुष्यच आहे! हे सुतकाचें लचांड मोठें त्राय-दायक आहे बुवा! आमची पहिली बायको आमची वैरीण खरी. ती जर मेली नसती तर आज उद्यांव त्या सुं-दरीशीं लग्न लावन टाकिलें असतें पण ह्या पहिल्या बायकोनें घाण केली.

**रामभाऊ**–अहो एवढे चार पांच दिवस कसे तरी काढा तितक्या अवकाशात मीही तिच्या बापाकडे जाऊन ती खट-पट करून अगदीं ठरवून ठेवितों. मार्गशीर्षांतील पहिल्या मुहूर्तावर उरकून टाकावें म्हणजे झालें.

**गोपाळराव**–ठीक आहे. तूं तें जमव. पण जितकी जलदी होईल तितकी कर. मार्गशीर्षांत पहिलाच मुहूर्त कधीं आहे ते पहा.

**रामभाऊ**–( पंचांग पाहून ) मार्गशीर्ष शुद्ध पंचमी गुरु-वार गोरज मुहूर्त आहे. त्याच्या अगोदर मुहूर्त नाहीं. आज कार्तिक वद्य द्वादशी. तेव्हां आणखी आठ दिवस आपल्यास वाट पाहिली पाहिजे. पण हा मुहूर्त तरी आपणांस लाभेल कीं नाही ते पाहिलें पाहिजे. तिच्या व आपल्या गोत्राला तर पडतेंच. तिचे टिपण आणून गणमैत्री एकनाड हीं पाहिलीं पाहिजेत. कारण आपल्या सारख्यांस तसें पाहिल्याशिवाय लग्न करितां कामा नये.

**गोपाळराव**–त्यांच्या आमच्या गोत्राला पटतेंच आहे. रासकूट, गणमैत्री, एकनाड, हीं पाहण्याच्या भानगडींत आपण पडूंच नये. म्हणजे झालें. तिच्या बापाला त्याच्या म्हणण्याप्रमाणे आम्हाकडून रकम पोहोंचली म्हणजे तोही आपल्या म्हणण्यास आड येईल असें वाटत नाहीं. आतां आमचे उपाध्येबोवा वगैरे भटें कांहीं म्हणतील तर त्यांना जरा दक्षणा ज्यास्त दिली म्हणजे झालें. भटांचीं तोंडें बंद करण्याला किती उशीर! जरा आपल्या पिशवीचे तोंड

सईल केले म्हणजे त्यांचीं तोंडें बंद झालीं. मग रासकूट, गणमैत्री, एकनाड, गोत्र, प्रवर, मुहूर्त लाभणें हीं सर्व विरुद्ध असलीं तरी तीं सुरळीत होण्याला लागलाच शास्त्रार्थ निघतो तें सगळें होईल. पण आतां तूं त्या जमविण्याच्या खटपटी-कडे लाग. पाहिजे तर आपल्या स्नेह्यांपैकीं आणखी कोणी मदतीला घे.

ह्याप्रमाणें बोलणें झाल्यावर **रामभाऊ** आपल्या घरीं गेला. दुसरे दिवशीं त्र्यंबकभटाकडे जावयाचें, तेव्हां त्यानें मनांत असा विचार केला कीं, आपले **गोपाळराव** तर त्या भटाच्या मुलीला पाहून अगदीं मोहित झाले आहेत. ते तिजकरितां आपण ठरवूं ती रकम देण्यास तयार आहेत. तेव्हां ह्या खटपटींत आपणही पैशाच्या संबधानें कांहीं तरी फायदा करून घ्यावा. म्हणजे त्र्यंबकभटाला देण्याची जी रकम ठरेल, तिजपेक्षां त्याला कांहीं अधिक पैसे देऊन आपलासा करून घ्यावा आणि त्याला आपण सांगूं ती रकम मी घेणार असें बोलण्यास सांगावें. मग त्याला जी द्यावयाची ती देऊन बाकीची आपण गप्प करावी म्हणजे झालें. तो त्र्यंबकभट सातशें रुपये घ्यावयाचे म्हणत आहे. त्यांत जरी त्यानें कांहीं कमी केलें नाहीं तरी सातशेंच घेईल कीं नाहीं ? चिंता नाहीं. आपण त्याला आणखी पन्नास देऊन आपलासा करून घेऊन " बाराशें रुपये मी घेणार " असें बोलावयास सांगूं म्हणजे झालें. आपण गोपाळरावाजवळ ' त्र्यंबकभट हजार रुपये घेणार ' असें तर सांगितलेंच आहे. आतां ' तो बाराशें घेणार ' असें सांगूं म्हणजे झालें. गोपाळराव इतकेही रुपये देण्यास कबूल होईल. म्हणजे त्र्यंबकभटाला साडेसातशें देऊन आपल्यास साडेचारशें रुपये रहातील. हे पैसे राहिले म्हणजे आपल्यास थाटानें रहातां येईल. पुढें जें संधान जमवावयाचें आहे, त्याला अशा कफल्लकपणानें कदाचित् व्यत्यय

यावयाचा. त्याकरितां आपल्याजवळ चार पैसे असणं जरूर आहे.

असा निश्चय केल्यावर रामभाऊ दोन प्रहरीं जेवण झाल्यानंतर तीन वाजण्याचे सुमारास बरोबर एक निमित्ताला, अजागळसा स्नेही घेऊन त्र्यंबकभटाकडे गेला. नमस्कार चमत्कार, या बसा, झाल्यावर इकडच्या तिकडच्या गोष्टी चालल्या असतां:—

**रामभाऊ**–भटजी, यंदां तुमच्या घरीं एखादें कार्य व्हावयाचें असेल, नाहीं कां !

**त्र्यंबकभट**–हो, आमच्या बेताप्रमाणें कोठें जुळलें तर करून टाकावें असा हेतु आहे.

**रामभाऊ**–आमच्या एका स्नेहालाही यंदां लग्न कर्तव्य आहे. तुमचें त्यांचें जमलें तर तें स्थळ फार उत्तम आहे. शोधूं गेल्यासही तसें मिळावयाचें नाहीं बाकी त्यांच्या व तुमच्या गोत्रालाही पडत आहे.

**त्र्यंबकभट**–कोणतें तें स्थळ ! माझ्या मनांत आलेंच आहे, पण तुमच्या तोंडून ऐकूंद्या एकदां.

**रामभाऊ**–आमचे मित्र गोपाळरावजी ! त्यांचें कुटुंब आज दोन तीन महिने आजारी होतें. तें आज दहा दिवस झाले वारलें. गोपाळरावजींचें वय अजून लहान आहे. अजून पंचवीस देखील पुरतीं झालीं नाहींत. तेव्हां एवढें राहिलेलें आयुष्य लग्नावांचून तर घालवितां येत नाहीं ! त्यांत ते श्रीमंत ! त्यांना दुसरें लग्न करण्याला कांहीं अशक्य आहे असेंही नाहीं. पण द्वितीय संबंध म्हटला म्हणजे, मुलगी जितकी जाणती मिळेल तितकी उपयोगाची. म्हणून म्हटलें तुमचें त्यांचें जर जुळलें तर चांगलें आहे. तुमचा मानस काय आहे !

**त्र्यंबकभट**–आमचा मानस पुष्कळ आहे पण तो काय उपयोग ! कारण त्यांना पाहिजेत हुंडे, आणि आम्ही हुंडे देणार तर नाहींच पण उलटे घेणार ! तेव्हां तें कसें जमतें !

रामभाऊ-तें हुंड्याचें समजलें हो. सणंग चांगलें असलें, म्हणजे पैशाकडे लक्ष देऊन उपयोग नाहीं. पण तुमची धाव कोठपर्यंत आहे. तें समजलें म्हणजे त्याविषयीं कोणता एखादा विचार करितां येईल.

* त्र्यंबकभट-सणंगाविषयीं आमचे आम्हीच सांगून कांहीं उपयोग नाहीं. वेळ येईल तेव्हां खातरी होईलच. किंवा ती आपल्या कोठें नजरेस पडली असली तर कांहींबाहीं खातरी झालीच असेल. आतां पैशांविषयीं म्हणाल, तर मला पुढें मागें कांहीं बोलतां येत नाहीं. आधीं कडू मग गोड, तें बरें. मी आहें गरीब. मला नाहीं कोणाचा आधार. माझ्या संसाराला हातभार लावणारा कोणी नाहीं. कायती एवढी मुलगी. तेव्हां आमच्या मुलीशीं ज्याला शरीरसंबंध करणें असेल, त्यानें प्रथम सातशें रुपये सुर्तीं मोजले पाहिजेत. मग आम्ही देवदेवक ठेवूं. हवालाबिवाला कांहीं उपयोगी नाहीं.

रामभाऊ.-अबाबाबा!! या रकमेच्या ओझ्यानें तर एखाद्याची छाती दडपून जावयाची! त्र्यंबकभटजी, आतां पहिले दिवस गेले. आतां पैसा राहिला आहे कोणाजवळ! जो तो सरासरी जीव धरून अब्रूनें दिवस काढीत आहे. आंत कांहीं त्राण राहिलेलें नाहीं.

त्र्यंबकभट.-कोणाची छाती दडपो कीं फुटो! लोकांजवळ पैसे असोत कीं नसोत, आम्हाला काय त्याचें! आमचा निश्चय आहे, तो तुम्हाला सांगितला. ह्यांत एक कवडी कमी होणार नाहीं.

रामभाऊ.-होहो पण बोलून संपवूं नका. तुम्ही कमी नका घेऊं (त्र्यंबकभटाचा हात दाबून त्याला घरांत चालण्याविषयीं खूण करितो.) त्याप्रमाणें तो व रामभाऊ उठून आंत गेले.

रामभाऊ.-भटजी, तुमच्या ह्मणण्याप्रमाणेंच म्हटलें म्हणजे तुम्ही सांगतां ती रकम मोठी आहे, परंतु मी कसें तरी

करून ती रकम गोपाळराव देतील असें करितों. पण ह्या येवढ्या कामगिरीबद्दल तुम्हाकडून कांहीं पानसुपारी !

त्र्यंबकभट.–आधीं जमवा, मग पानसुपारीचें पहातां येईल. अजून कशालाच ठिकाण नाहीं. ते मुलगी पाहतील ती त्यांना पसंत पडेल, आमचें म्हणणें त्यांना कबूल होईल, रकम पदरांत पडेल, तेव्हां जमलें म्हणावयाचें.

रामभाऊ.–जमविण्याविषयीं कांहीं नाहीं. मी सांगितलें म्हणजे झालें. पण तुम्ही सातशें रुपये घेण्यास कबूल झालांना !

त्र्यंबकभट.–हो हो ! तेवढे मिळाले म्हणजे झालें.

रामभाऊ. ते मिळतील. मुलगा पहावयाचा आहे काय ! त्याची दौलत पहावयाची असली तरी पहा.

त्र्यंबकभट.–छे छे: मुलगा काय पहावयाचा आहे, आणि त्याच्या दौलतीचें तरी काय पहावयाचें आहे ! त्याच्या वडिलापासून त्याची मला माहिती आहे. दौलतीविषयीं तर कांहीं बोलावयासच नको. तो लहानसा राजा आहे म्हटलें तरी चालेल. वयही पंचविशीच्या आंत बाहेरच आहे. आतां जरा बाहेरचा नाद आहे. पण नवी बायको जरा मोठी झाली, म्हणजे तो नाद सुटेल.

रामभाऊ.–तें सर्व ठीक होईल. पण ह्या कामांत तुम्ही माझें एक काम केलें पाहिजे. करूं म्हणाल तर सांगतों. त्यांत कांहीं खटपट नाहीं किंवा तुमचा तोटाही नाहीं. उलटा थोडासा नफाच होईल.

त्र्यंबकभट.–खटपट नाहीं आणि नफाही आहे ! असें असलें तर माझें काय जातें ! मी तें करीन.

रामभाऊ.–खचीतना पण हें ! वचन द्या तर.

त्र्यंबकभट.–मी पूर्वीं बोलल्याप्रमाणें असलें तर खचीत. हें घ्या वचन.

रामभाऊ.–ऐका तर. ह्या लग्नाच्या कामांत मला पुष्क-

ळ खटपट करावी लागत आहे; तिचा मोबदला तुम्हांकडून तर मिळण्याची आशा दिसतच नाहीं बरें, तिकडूनही मला उघडपणें मागतां येत नाहीं. कारण ते मोठे पडले ! आणि त्यांत स्नेही म्हणविणात ! या करितां तुम्हाला मी त्यांजकडून सातशें रुपये देववितोंच, पण तुम्ही "मी आपल्या मुलीचे बाराशें रुपये घेणार" असें सांगा. तुमचे सातशें रुपये ठरलेच आहेत शिवाय या कामगिरीबद्दल तुम्हाला आगखी पन्नास देईन. ह्यांत तुमचाही नफा आहे व माझाही नफा आहे. कसें ! ठरलेंना !

**त्र्यंबकभट.**—हो हो, मी वचन देखील दिलें. आतां नवीन काय ठरावयाचें आहे !

**रामभाऊ.**—बरें. आतां त्यांनकडील कोणी आला किंवा दुसरा कोणी आला आणि त्यानें विचारिलें, तर बाराशें रु-पये घ्यावयाचे असें सांगा. विसराल बरें ! तुमच्या पदरांत रुपये घालावयास मीच येईन. त्यावेळेस बरोबर दुसरे को-णी असतील; ह्याकरितां त्यांच्या समक्ष तुम्ही बाराशें रुपये मोजून घ्या. मागाहून येऊन मी आपले रुपये घेऊन जाईन. आतां ठरलें असेंच समजा. आतां फिरावयाचें नाहीं. तिकडे जाऊन ठरवून टाकितों ठरवूंना ?

**त्र्यंबकभट.**—माझ्या म्हणण्याप्रमाणें झाल्यावर बेलाशक ठरवा; मग माझी कांहीं हरकत नाहीं.

ह्याप्रमाणें बोलणें झाल्यावर **रामभाऊ** आपले मनोरथ पूर्ण झाल्यासारखेच आहेत असें समजून आनंदित होऊन घरीं गेला. रात्रीं जेवण झाल्यावर तो **गोपाळरावाकडे** गेला. त्यावेळेस तेही जेवून खाऊन माडीवर बसले होते.

**गोपाळराव.**—या **रामभाऊ.** आज संध्याकाळीं को-णीकडे स्वारी झुकली होती ! इकडे कोठें दृष्टीस पडली नाहीं !

**रामभाऊ.**—अहो त्या तुमच्याच कामाकरितां त्या **त्र्यंबक-भटाकडे** गेलों होतों, म्हणून इकडे यावयास बनलें नाहीं.

**गोपाळराव**.–मग जमवून आला कीं नाहीं !

**रामभाऊ**.—हा पठ्या ज्या ठिकाणीं जाईल तेथून नाट लावून येईल असें कालत्रयीं होणार नाहीं ! परंतुः—

**गोपाळराव**.–परंतु काय ? तिचा बाप कांहीं अधिकउणे पैसे मागत असेल. असेंच कीं नाहीं !

**रामभाऊ**.–धन्य आहे आपली रावसाहेब ! सुतानें स्वर्गास जाणारे खरे !

**गोपाळराव**.–हा त्तिचे ! एवढेंचना ! मी तुला कालच सांगितलें कीं, तिच्या करितां मी दहा हजार रुपये देखील देईन. ह्यापेक्षां तर तिचा बाप अधिक मागत नाहींना !

**रामभाऊ**.–छेः छेः ह्याचा तिसरा चवथा हिस्सा देखील नाहीं मागत. फक्त पूर्वीं जो त्याचा हजाराचा आंकडा होता त्यावर दोनशें रुपये चढले आहेत. ह्मणजे आतां बाराशें दिले पाहिजेत. बाकी मानापानाचें मग कांहीं नाहीं.

**गोपाळराव**.–जाऊं देरे ! त्याला आतां पाहिजेत तर बाराशें रुपये देऊन टाक, आणि टाक जुळवून. कारण मी तिच्या वियोगाचा एकेक दिवस एकेका वर्षाप्रमाणे घालवीत आहे !

**रामभाऊ**.–मग उद्यां सकाळीं तिच्या बापास आपली कबुली कळवितों. संध्याकाळीं लागलेंच रुपयेही पदरांत घालून टाकावे. कारण रुपये पदरांत पडल्याशिवाय तो भट मुहूर्त निश्चयही करणार नाहीं !

**गोपाळराव**.–कळव त्याला आमची कबुली, आणि उद्यांच्या उद्यां त्याच्या पदरांत रुपये घाल.

दुसरे दिवशीं सकाळीं **रामभाऊ** त्र्यंबकभटाकडे गेला आणि त्यानें त्याला ‘ **गो**पाळराव तुमच्या म्हणण्यास कबूल आहेत ह्याकरितां आतां मुहूर्त निश्चय करावा ’ असें सांगितलें.

**त्र्यंबकभट**–माझ्या पदरांत रकम पडली म्हणजे मग मुहूर्तनिश्चय तुम्हीं केला तरी तो मला कबूल आहे.

**रामभाऊ**.–अहो रकम कांहीं कोठें पळते आहे कीं काय ! कीं आम्ही पळत आहों ! आज संध्याकाळीं रुपये घेऊन येतों. मग तर ठीक होईलना !

**त्र्यंबकभट**.–रकम पळते किंवा तुम्ही पळतां असें मी म्हणत नाहीं. पण सध्यां माझ्या हाताजवळ खर्चाला एक दमडी देखील नाहीं. तेव्हां प्रथम पैसे आल्याशिवाय जर मी मुहूर्तनिश्चय करा म्हटलें तर लग्नाच्या सामान सुमानाची लागलीच तयारी केली पाहिजे, ती मीं कशानें करावी ! म्हणून म्हणतों कीं, मुहूर्तनिश्चय झाल्याच्या पूर्वीं माझ्या पदरांत रकम पडली पाहिजे. आतां आज संध्याकाळीं तुम्ही रुपये आणणार आहांच, तेव्हां तिकडूनच मुहूर्त वगैरे ठरवून या म्हणजे झालें. हें टिपणही पाहिजे तर घेऊन जा.

**रामभाऊ**.–टिपण घेऊन घरीं गेला आणि जेवण वगैरे झाल्यावर **गो**पाळरावाकडे जाऊन त्याला सर्व हकीकत कळविली; व टिपणही त्याच्याजवळ दिलें. नंतर लागलेंच उपाध्या व जोशी ह्यांस बोलावून आणून **गो**पाळरावानें त्यांस आपला लग्नाचा बेत कळविला, आणि त्यांस सांगितलें कीं, 'त्या मुलीशी लग्न करण्याचा माझा निश्चय ठरला आहे. ह्याकरितां तुम्ही गणमैत्री, राजकूट, एकनाड, मुहूर्त लाभतो न लाभतो हीं पाहण्याच्या भानगडींत पडूं नका. कोणीकडून तरी जमवून घ्या. तुमची मेहनत व्यर्थ जाणार नाहीं.'

उपाध्या व जोशी ह्यांनींही **गो**पाळरावाचा लग्न करण्याचा निश्चय व आपली मेहनत व्यर्थ न जाऊं देण्याविषयीं त्याची कबुली, ह्यांजकडे लक्ष देऊन शुभाशुभ ग्रह, राशी वगैरे सर्व पातड्यांतल्या पातड्यांत गुंडाळून ठेवून, आपण बेलाशक पाहिल्याच मुहूर्तावर लग्न करावें, म्हणून सांगितलें. तेव्हां **गोपा**-

ठरावानें लागलेंच त्यांस रामभाऊ बरोबर त्र्यंबकभटाकडे रुपये पदरांत घालावयास पाठविले. ते सर्वजण त्र्यंबकभटाकडे पोहोचल्यावरः—

**त्र्यंबकभट.**–नमस्कार भाऊसाहेब, उपाध्येबोवा नमस्कार ! यावें ! नमस्कार जोशीबोवा बसावें. आज ह्या संबंधानें तरी आपल्यासारख्याचे पाय माझ्या घरीं लागले !

**रामभाऊ.**–त्र्यंबकभटजी, आपल्या म्हणण्याप्रमाणें रकम घेऊन आलों आहें. घ्या तर आतां.

**त्र्यंबकभट.**–( आनंदानें ) मोजा मोजा !

रामभाऊनें रुपये मोजून त्याच्या स्वाधीन केल्यावर.— त्र्यंबकभटजी आतां रुपये तुमच्या पदरांत पडले. आतां मुहूर्तनिश्चय ठरवावयाचा. तुमची कांहीं हरकत नाहींना राहिली ?

**त्र्यंबकभट.**–आतां माझी कांहीं हरकत नाहीं. जोशीबोवांनीं उभयतांचीं टिपणें वगैरे पाहिलींच असतील. त्यांनीं पाहिलीं तींच मीं पाहिलीं. ते मुहूर्त ठरवितील तोच मीं ठरविला. कां जोशीबोवा कोणती तीथ योजितां !

**जोशीबोवा.**–शुद्ध पंचमी, गुरुवार गोरज मुहूर्त उत्तम आहे, दोघांमही तो लाभत आहे.

**त्र्यंबकभट.**–ठीक आहे, मी आतां तयारीला लागतो. आतां कांहीं ठरवावयाचें नाहींच !

**रामभाऊ.**–आतां आम्हीही तयारीला लागतों. चला.

**जोशीबोवा.**–उपाध्येबोवा चला.

जोशीबोवा, उपाध्येबोवा व रामभाऊ हे तिघे निघून गेले. अर्ध्या रस्त्यांत गेल्यावरः—

**रामभाऊ.**–जोशीबोवा आतां तुम्ही नका रावसाहेबांकडे येण्याची तसदी घेऊं. उपाध्येबोवा, तुम्हीही जा आतां घरीं मी ही घरीं जातों. सकाळीं गोपाळरावांकडे जाईन. आतां रात्र झाली.

**जोशीबोवा.**–बरें, आतां आम्ही जातों घरीं. पण **भाऊ** साहेब, यजमानांनीं आमची मेहनत लक्षांत ठेवण्याचें कबूल केलें आहे, तें लक्षांत असूंद्या. नाहीं तर " गरज सरो आणि वैद्य मरो." असें व्हावयाचें !

**रामभाऊ.**–छे: छे: रावसाहेब तसे करणारे मनुष्य नव्हत. आणखी तुम्ही कां भितां ! मी आहें कीं नाहीं मध्यें ? मी कबुलीप्रमाणें त्यांजकडून करवीन. जा आतां तुम्ही.

**जोशी** व **उपाध्या** यांस वाटेस लावून **रामभाऊ** आपल्या घरीं जाण्याच्या मिषानें जो त्यांच्यानवळून निघाला, तो तसाच त्र्यंबकभटाकडे गेला.

**रामभाऊ.**–कां भटजी, झालें काम ? हें जमविण्याच्या कामांत मला फार खटपट पडली.

**त्र्यंबकभट.**– ठीकच आहे तुमचे स्नेहीच आहेत ते, तेव्हां स्नेह्याच्या कामांत मेहनत केलीच पाहिजे. तरी या खटपटींत तुमचा हात कांहीं कोरडा नाहींना राहिला ?

**रामभाऊ.**–नाहीं कोरडा नाहीं राहिला. बरें आणा आमची अनामत.

त्र्यंबकभटाच्या लोभी स्वभावामुळें सगळेच रुपये आपण ठेवावे असें त्यास वाटत होतें, परंतु तसें करून ती रकम आपणास पचणें कठीण असेंही त्याच्या मनांत आल्यावरून त्यानें बाराशेंपैकीं साडेचारशें रुपये आणून **रामभाऊ**च्या स्वाधीन केले.

**रामभाऊ.**–भटजी, आतां तुम्हाला भटजी म्हणणें बरोबर दिसत नाहीं, कारण तुम्ही आतां **गोपाळराव**जींसारख्या बड्या गृहस्थाचे श्वशूर झाला. तेव्हां तुम्हाला कांहीं तरी टोपण नांव दिलें पाहिजे ! जरा पाणी आणवा पाहूं, तहान लागली आहे.

**त्र्यंबकभट.**–**गोदे,** तांब्यापेचपात्री भरून आण पाहूं. तूंच आण हो.

**गोदावरी**.—तांब्यापंचपात्री घेऊन आली, तेव्हां **रामभाऊ**-नें मोठ्या उत्कंठेनें तिजकडे पाहिलें. ती पाणी ठेवण्यास जवळ आली. तेव्हां तो तिला म्हणाला—कां आतां तुम्ही मोठीं माणसें होणार ! मग आमची ओळख तरी राहील कां पण ! ह्यावर ती कांहींच उत्तर न देतां निघून गेली.

**रामभाऊ**.–कां आमच्या बोलण्याचा राग कां आला ! कीं कांहीं आज बिनसलें आहे ?

**त्र्यंबकभट**.-बिनसलें कसचें ! कांहीं कपाळबिपाळ दुखत असेल. मी आतां सुंठबिंठ घालितों.

**रामभाऊ**.–घाला तर. मीही जातों आतां रात्र झाली.

**त्र्यंबक**भटाच्या पदरांत रुपये पडल्यावर तो लग्नाच्या तयारीस लागला, व त्याच प्रमाणें **गोपाळरावा**कडेही तयारी होऊं लागली.

## भाग ३ रा.

मागील भागांत **गोपाळरावा**च्या लग्नाची तयारी चालली होती असें सांगितलें. परंतु **गोपाळराव** हा कोण व त्याची काय हकीकत आहे हें जाणण्याविषयीं आमचे वाचक उत्सुक झाले असतील, ह्याकरितां ह्या ठिकाणीं त्याची थोडीशी मूळपीठिका सांगणें अवश्य आहे.

**गोपाळरावा**चा बाप **केशवराव** हा **वसई** शहरांत पहिल्यानें एका व्याजबट्याचा व्यापार करणाऱ्या सावकाराकडे कारकून होता. तो सावकार पांच पन्नास हजारांचा मालक होता. ह्या **केशवरावा**ची प्रथम फार गरिबी. परंतु याचा यजमान सावकार एकाएकीं कांहीं रोगानें मरण पावला. ( कोणी म्हणतात कीं, त्याला ह्या **केशवरावा**नेंच विषप्रयोग केला ) तेव्हां त्याच्या दवलतीची व्यवस्था पाहण्यास त्याचा मुलगा किंवा भाऊ वगैरे कोणी मोठें पुरुष माणूस नव्हतें. कायती समंजस मालकीण

त्याची बायको मात्र होती. परंतु ती किती झाली तरी बायकोच ! तिला व्यापाराच्या कामांत समजूत ती किती असणार ! त्यामुळे यजमानाच्या मरणाच्या गडबडींत संधि साधून केशवरावानें त्याच्या बाहेर असलेल्या रुमालांतून चार पांच हजारांचीं खतें लांबविलीं. आणखीहि त्यानें हात मारिला असता. परंतु इतक्यांत त्या सावकाराच्या मरणाचें वर्तमान ऐकून त्याच्या बायकोचा भाऊ आपल्या बहिणीच्या दवलतीची नीट व्यवस्था करावी म्हणून तेथें आला. त्यामुळें केशवरावास आपला हात आंखडावा लागला. नंतर केशवरावानें लागलीच नोकरी सोडिली. आपण सावकाराकडील नोकरी सोडिली, हें त्यानें फारसें बाहेर फुटूं दिलें नाहीं, व ती गोष्ट लोकांत फारशी प्रसिद्ध झाली नाहीं, इतक्यांत यानें ज्या कुळांचीं खतें लांबविलीं होतीं त्यांजकडे जाऊन ' तुम्ही आज आमच्या यजमानाच्या रकमेचा निकाल करा. आमच्या यजमानिणीस पैशाची फार जरूर आहे. आज निकाल कराल तर त्यांत तुमचा कांहीं नफा होईल. नाहीं तर कोर्ट पाहणें जरूर पडेल ' असें सांगूं लागला. तेव्हां याच्या हातांत ज्यांचीं खतें होतीं त्यांतील बहुतेकांनीं, आज रुपये दिले तर आपणांस कांहीं नफेवाईक होईल, ह्या गोष्टीकडे लक्ष देऊन कोणी मुद्दल व थोडें व्याज, कोणी मुदलामुदल, कोणी थोडी सूट घेऊन, कोणी मुदलाच्या पाऊणपट, कोणी निमे असे रुपये दिले. जीं कुळें धूर्त होतीं, त्यांनीं ह्याचें कपट ओळखून ' आम्ही कांहींच देत नाहीं, खुशाल फिर्याद करा ' म्हणून सांगितलें. तेव्हां ह्याचा उपाय खुंटला. पुढें थोडक्याच दिवसांनीं याजपाशीं जे दोन तीन हजार रुपये जमले होते, त्याजवर यानें व्याजबट्याचा व्यापार सुरू केला. मुळीं व्यापारास भांडवलच अनीतीनें मिळविलेलें, तेव्हां त्याचा व्यापारही तशाच प्रकारच्या अनीतीनें चालावयाचा, हें उघड आहे. ह्या केशवरावानें व्यापाराच्या व इतर प्रकारें पैसा मिळ-

विण्याच्या कामांत, अन्याय, जुलूम व लबाड्या ह्यांची तर अ-गदीं कमाल करून सोडली. दुसऱ्याची संपत्ति हरण करण्या-च्या कामांत जितक्या लबाड्या करणें शक्य आहे, तितक्या यानें केल्या. त्याच्या लबाड्यांचे कांहीं मासले आमच्या वाच-कांकरितां येथें देतों.

केशवरावानें वसई शहरांतील पांच सातजण गांवकुटार, खोटींनाटीं व अनन्वित कर्में करून पैसे मिळविणारे असे अ-सामी हाताशीं धरिले. असे लोक पैशासाठीं पाहिजे त्या प्रकारचें अन्यायवर्तन करण्यास तयार असतातच.—त्यांच्या सहायानें यानें एखाद्या गांवढे गांवांतील, खाऊन पिऊन सुखी व ज्याला लिहितां वाचतां येत नाहीं, अशा मनुष्याच्या नांवाचें खोटें खत करावें. त्यांत आपण धनको, तो गांवढ्यांतील मनु ष्य रिणको, व लिहिणारा व साक्षी वगैरे वर सांगितलेल्या मं-डळींपैकीं काहींजण असावयाचे. ह्या प्रमाणें खत तयार झाल्यावर कांहीं दिवसांनीं त्यांत लिहिलेली मुदत पुरी झाली. म्हणजे त्या रिणकोवर कोर्टांत फिर्याद करावी. कोर्टांतून त्या रिणकोस समान लावण्यास जो शिपायी जाई, त्याला आठ चार आणे देऊन आपलासा करून आपल्या साक्ष्यांपैकीं एकाकडून त्या समानावर रिणकोची समान पोंचल्याबद्दल सही करावी. किंवा त्या शिपायाकडून 'समान प्रतिवादीच्या राहत्या घराच्या दारावर चिकटाविलें' असा रिपोर्ट करवावा. पुढें त्या बिचाऱ्या बनावट प्रतिवादीस समान लागलें नाहीं व ह्या बनावट देवघेवीची कांहीं माहि-तीही नाहीं, तेव्हां तो नेमिलेल्या तारखेस कोर्टांत हजर को-ठून होणार! तो हजर झाला नाहीं तरी त्याच्या विरुद्ध एक-तर्फी निवाडा होत असे. निवाडा झाला म्हणजे ह्यानें त्याच्या जिनगीवर जप्ती न्यावी. त्याच्या जिनगीवर जप्ती गेली म्हणजे त्या बिचाऱ्यास मोठा अचंबा वाटावा. मग त्यानें आपला वादी

कोण, आपण त्याजपासून रुपये घेतले कधीं, माझ्या जिनगीची जप्ती काय म्हणून होते, ह्या गोष्टीचा शोध करूं लागावें. तेव्हां केशवरावानें जणूं काय त्यानें ह्याचे रुपये खरेच घेतले आहेत अशीं त्याला उत्तरें द्यावीं. मग तो दुर्दैवी मनुष्य तडफडत, झडपडत, हायहाय करीत ह्याचे रुपये देई. त्यानें न दिले तर त्याच्या जिनगीचे लिलांव करून हा आपले रुपये घेई.

तसेंच कोणी एखादा पैशासाठीं अडलेला मनुष्य असला ह्मणजे ह्यानें त्याला कांहीं रुपये द्यावे, आणि जे रुपये खरोखर दिले असतील त्याच्या दीडपटी इतक्या मुदलाचें खत करून घ्यावें. रिणको बिचारा अडलेला! करतो काय ! तो तसेंही खत करून देत असे. पुढें मुदतींत रुपये न आले म्हणजे फिर्याद करून त्याच्या सर्व मालमत्तेची जप्ती करवावी आणि लिलांव करण्यास जो कारकून जाईल, त्याचा हात दाबून त्याला त्या मालमत्तेच्या जागीं नेला न नेलेंसें करून, ज्या जिनगीचे उघड लिलांव केले असतां पांचशें रुपये यावयाचे, 'तिचे लिलांवांत पन्नास किंवा पाऊणशें रुपये आले' असा त्या कारकुनाकडून रिपोर्ट करवावयाचा. ती जिनगी सवड असेल तर आपल्या, नाहीं तर आपल्या कारकुनाच्या नावावर घ्यावयाची, कदाचित् जिनगीच्या मालकानें 'माझ्या जिनगीचे आडगांवांत लिलांव झाल्याकारणानें तिची किंमत कमी येऊन माझा तोटा झाला. ह्याकरितां त्या जिनगीचे कोर्टांत पुनः लिलांव करावे' असा कोर्टास अर्ज केला, आणि कोर्टाचा मुनसिफ केशवरावाचा मिंधा नसला, तर तो त्या जिनगीचे कोर्टांत लिलांव करण्याचा हुकूम देत असे. परंतु कोर्टाचा नाझर ह्यांचा बांधलेलाच! तो केव्हां तरी कोणी लिलांवांत बोलण्यास हजर नाहीं अशी सवड पाहून पटकन तीनवार लिलांव पुकारून पुरे करीत असे. त्यांत कदाचित

काहीं पांच दहा रुपये पहिल्या रकमेपेक्षां ज्यास्ती करून केशवरावच ती जिनगी आपल्या किंवा आपल्या कारकुनाच्या नांवावर घेत असे. म्हणजे तिच्या मालकाचा उपाय नाहींसा होई.

कधीं यनें असें करावें कीं, एखाद्याची जमीन गहाण घ्यावी, व त्या रिणकोस, ' खत रजिस्टर झाल्यावर रुपये देतों ' असें सांगावें. रजिस्टर ह्यांचा बांधलेलाच! त्यानें खत रजिस्टर करते वेळेस ' आमचे समक्ष खतांत लिहिलेले रुपये धनकोनें रिणकोस दिले ' असा शेरा मारावा. खत रजिस्टर होऊन आल्यावर ह्याने त्या रिणकोस एक दोन दिवस ' रुपये आज देतों, उद्यां देतों ' म्हणून झुलवावें. त्या रिणकोनें फारच निकड लाविली म्हणजे त्याच्यावर उलटून " वाः आम्ही रजिस्टरच्या समक्ष तुला रुपये दिले आहेत. आतां रुपये कसले मागतोस " असा त्याला जबाब द्यावा! कदाचित् रिणकोनें फिर्याद वगैरे करण्याची कांहीं खटपट केली तरी ह्या केशवरावाचा रिणकोस रुपये दिल्याविषयीं चांगला पुरावा असल्यामुळें त्या फिर्यादीचा कांहीं उपयोग होत नसे. त्यामुळें ती जमीन ह्याला फुकट मिळत असे.

ह्याच्या घरच्या जमाखर्चाच्या वह्या तर निवळ खोटया असत. गांवढयांतील एखाद्या कुणब्यानें ह्याजकडून दोन चार वेळां कांहीं रुपये नेले असले म्हणजे त्याच्या नांवावर आठ दहा वेळां रकमा खर्च पडलेल्या असावयाच्या! तसेंच त्यानें आठ दहा वेळां रकमा परत केल्या असल्या, तर त्याच्या खात्यास दोन तीन वेळच्या रकमा मात्र जमा असावयाच्या! अशा रीतीनें एकदां का एकाद्या गांवढयांतील मनुष्यानें खात्यावरून रुपये काढिले, म्हणजे मग त्याच्याकडून पांच रुपयांबद्दल पन्नास रुपयांची जरी पावती झाली तरी ह्याचें देणें म्हणून कांहीं फिटावयाचें नाहीं! कदाचित् तो

देतां देतां कंटाळून, हिशोब करून खातें पूज्य करण्याकरितां आला, तरी त्या वेळेस हिशोब करतांनाही ' आठ सवे चवदा' ' पांच आणि चार नऊ हातचा आला एक ' अशा प्रकारें त्याचा हिशोब करावयाचा ! कदाचित् कोणी रुपये देत नाहीं-सा झाला, तर खात्यावरून त्यानवर फिर्याद करावयाची. फिर्याद केल्यावर तो गांवढळ मनुष्य ' मी ह्याजकडून रुपये नेले होते व परतही केले होते ' असें कबूल करीत असे. त्यामुळें त्याच्या खात्यावरून जितक्या रुपयांची फिर्याद असेल तितक्या रकमेचा निवाडा होत असे.

आपल्या देणेदाराजवळून पैसे उपटण्याची ह्याची आणखी अशी एक चाल होती कीं, एकाद्या कुणब्याकडे कांहीं येणें असलें म्हणजे फिर्याद करून निवाडा झाला, म्हणजे ऐन लावणीच्या किंवा दुसऱ्या कांहीं हंगामाच्या वेळेस त्याच्या घरावर जप्ती न्यावी. अशा वेळेस जप्ती नेली, म्हणजे तो बिचारा कुणबी घाबरावा. कारण त्या वेळेस त्याची सर्व जिनगी जप्त झाली तर त्याला उपाशीं मरावें लागणार. त्याकरतां त्यानें कांहीं दिवस थांबण्याविषयीं ह्याची विनवणी करावी. म्हणजे ह्यानें त्याला ' आज अमुक दहा किंवा वीस ( जेवढ्या रकमेचा निवाडा असेल, व त्याच्या घरांत जशी जिनगी असेल त्याप्रमाणें ) रुपये देशील तर कांहीं दिवस थांबतों ' असें सांगावें ! कुणबी बिचारा अडलेला, करतो काय ! तो ह्याच्या म्हणण्याप्रमाणें कांहीं तरी तजवीज करून रुपये देई. हे रुपये त्याच्या हुकुमनाम्यांतील रकमेंत वजा मिळत नसत. ते मध्येंच केशवरावाच्या भक्षस्थानीं पडत!

दुसऱ्याची जमीन अपहार करण्याची ह्याची अशी एक कपटयुक्ति असे कीं, ज्या जमिनीकडे तिचा मालक फारसें लक्ष देत नाहीं, किंवा तिजवर त्याचा सर्वकाळ वापर नाहीं, अशा जमिनीवर ह्यानें प्रथम कांहीं दिवस आपलीं गुरें बांधण्याचें

सुरू करावे, किंवा कांहीं लांकडें, गवत वगैरे रचून ठेवावें. कदाचित् त्या जमिनीच्या मालकानें त्याविषयीं ह्याला कधीं विचारिलेंच तर ' आम्हाला थोडे दिवस गुरें बांधण्यास दुसरें कांहीं सामान असेल तर तें ठेवण्यास अडचण आहे, ह्याकरितां चार दिवस तुमची जागा अडविली आहे. लवकरच रिकामी करून देऊं. पाहिजे तर त्याबद्दल तुम्हाला भाडें देऊं. ' अशा गोड शब्दांनीं त्या मालकाची समजूत करावी. असा गुरें बांधण्याचा किंवा सामान वगैरे ठेवण्याचा क्रम कितीएक वर्षे चालला म्हणजे एक दिवस त्या जमिनीचा मालक कोठें बाहेर गांवीं गेला आहे अशी संधि पाहून त्या जमिनीवर एक लहानसें घर बांधावें, म्हणजे ती ह्याची झालीच ! कारण त्या मालकानें फिर्याद केली तरी ह्या केशवरावाची बरेच वर्षांची चालती वहिवाट कोर्टांत शाबीद होई. त्यामुळें मालकास जमिनीची आशा सोडून चुरमुरे खात बसावें लागे.

ह्याचा देवघेवीचा व्यवहार बहुतकरून अडाणी लोकांतच होता; त्यामुळें ह्याचे दस्तऐवज व जमाखर्च खोटे आहेत असें कोर्टाच्या नजरेस आणून देण्याचा प्रयत्न त्यांजकडून होत नसे. एक दोन वेळां एका वकिलानें ह्याच्या एका कुळास हाताशीं धरून, ह्याचें, त्या कुळावरील फिर्यादींतील खत खोटें आहे असें शाबीद केलें होतें, व त्याच्या योगानें हे केशवराव व ह्यांचे साथीदार, ह्यांस बिन भाड्याच्या घरांत जाण्याचा प्रसंग आला होता. परंतु कोर्टाचा मुनसिफ हा ह्याचा मिंधा असल्यामुळें त्यानें ह्याजवर फौजदारींत खटला करण्यास रुकार दिला नाहीं ! त्यामुळें हे बचावले. फक्त ह्याचा तेवढा दावा बुडाला.

अशा व्यापारानें ह्या केशवरावानें वसई तालुक्यांतील बहुतेक गांवढ्यांतील लोकांस भिकेस लाविलें. ज्या गांवढ्यांतील लोक ह्याचा प्रवेश त्या गांवढ्यांत झाला नव्हता

तोंपर्यंत थोडी बहुत शेती, भाजीपाला लावणें व मोलमजुरी करणें हीं कामें करून गरिबी रीतीनें भोळी कोरडी मिळेल तशी भाकर खाऊन सुखानें आपला निर्वाह करीत होते, ते लोक ह्याचा त्यांच्या गांवांत प्रवेश झाल्यापासून अगदीं कंगाल होऊन गेले. ह्यानें त्यांच्या सात पिढ्यांपासून मोठ्या मेहनतीनें लागवडीस आणलेल्या थोड्याथोड्या जमिनी, त्यांचीं घरें, पोटच्या पोराप्रमाणें जतन करून वाढविलेलीं थोडीं बहुत गुरें, गाड्या, त्यांच्या घरांतील फुटकीं तुटकीं भांडीं वगैरे सर्व लिलांव करून विकून फस्त केलें. कितीएक लोक अन्न अन्न करीत देशधडीस लागले. जे कांहीं तेथें शिलक राहिले होते त्यांच्या सर्व जिनगीवर मालकी केशवरावाचीच होती. त्या तालुक्यांतील बहुतेक गांवळ्यांवरील जमीन ह्याचीच होऊन गेली होती. ह्यानें त्या तालुक्यांतील गांवढ्यांत असा प्रळय उडवून दिला होता व तेथील लोकांस ह्याच्या कर्जाचें इतकें भय वाटत असे कीं, गांवढ्यांतील एखाद्या कुणब्याचें दुसऱ्याशीं भांडण होत असलें म्हणजे एक दुसऱ्याला शिव्या शाप देते वेळेस "तुझ्या घरांत केशवराव पडो" असें म्हणत असे. म्हणजे हे राजश्री एकदां एखाद्याच्या घरांत (देण्या घेण्याच्या संबंधानें) शिरले म्हणजे त्याच्या घरादाराचा सत्यानाश झालाच असें समजावयाचें. सारांश हा केशवराव व्यापाराच्या कामांत पैसे मिळण्याकरितां कितीही नीच, कितीही अधमपणाचें, कितीही निर्दयपणाचें, कितीही अन्यायाचें कृत्य करण्यास विलकुल मागें पुढें पहात नसे. त्याचप्रमाणें इतर प्रकारें पैसा मिळविण्यांत हा कमी लबाड्या करीत असे असें नाहीं. ज्या गांवांत ह्याचें पुष्कळ पेणें असून जो बहुतेक गांव ह्याचाच होऊन राहिला असेल, त्याच्या शेजारीं जें सरकारी जंगल असेल त्यांतील इमारतीचीं लांकडें बेलाशक तोडावीं. अशा रीतीनें ह्यानें एक

दोन तालुक्यांतील सरकारी जंगल जाळून टाकिलें होतें, व त्यापासून ह्यानें पुष्कळ पैसा मिळविला होता. सरकारच्या घरांतील ह्या चोरीबद्दलही त्याला कांहीं प्रायश्चित्त भोगावें लागलें नाहीं. कारण जंगलावर देखरेख करणारे अधिकारी पैसे चारून मिंधे करून ठेविलेले असत. शिवाय जिल्ह्याच्या कलेक्टरचा चिटणीस, त्यांच्या कचेरींतील कारकून, निरनिराळ्या प्रांतांच्या अधिकाऱ्याचे शिरस्तेदार, एक दोन तालुक्यांचे मामलतदार, त्यांच्या कचेरींतील कारकून, ह्यांस वारंवार मेजवान्या चारून व पैसे देऊन ह्यानें आपलेसे करून ठेविलेले असत. त्यामुळें ह्याचा हा चोरीचा धंदा बिनधोक चालत असे. कोणी सरकारांत चहाडी वगैरे केलीच तरी आंतल्या आंतच दाबादाबी होत असे. वरिष्ठ प्रतीच्या सरकारी अधिकाऱ्यापर्यंत दादच पोहोंचत नसे. कदाचित् एखाद्या वेळेस पोहोंचली तरी सर्वकाळ तिचा उपयोग होण्याचा संभव नसे. कारण वरिष्ठ प्रतीचे अधिकारी—जे नजर वगैरे घेण्या सारखे असत.—त्यांना ह्यांच्या कडून फळफळावळ, दूध, लोणी, त्यांच्या घोड्यांना दाणा वैरण इत्यादि सामान वारंवार जात असे; व कधीं कधीं त्यांना 'बडी मेजवानी' ही मिळत असे. मग ते अधिकारी ह्याच्या विरुद्ध चहाडी ऐकून चवकशी करतात कशाला! कदाचित् एकादा निर्लोभ, निःपक्षपाती, ईश्वराचा लाल अधिकारी असला, आणि त्याजकडे ह्याच्या लबाड्यांविषयीं कोणी चहाडी केलीच, तर तो चवकशी करीत असे. परंतु ह्या कपटपटूच्या खोट्या पुराव्यामुळें त्या चवकशीचा बहुतकरून कांहीं उपयोग नसे. कदाचित् त्या अधिकाऱ्यानें आग्रहानें ह्याला कांहीं दंडखंड केला तरी त्याविषयीं ह्याला कांहीं विधिनिषेध वाटत नसे व त्यापासून ह्याच्या मोठेपणास किंवा अब्रूस लोकांत कांहीं कमीपणा येत नसे! मोठमोठ्या

गांवांतून जे मोठे मोठे म्हणून गाजत असतात, त्यांचें नीति संबंधानें आचरण पाहिलें असतां तें बहुतेकांचें आमच्या केशवरावजींपेक्षां फारसें भिन्न आढळणार नाहीं. परंतु ' सरकारी कामदारांस मेजवान्या देणें, त्यांना भेटी पाठविणें, ते गांवांत आले असतां त्यांची सरबराई ठेवणें, त्यांच्या पुढें पुढें रावसाहेब, भाऊसाहेब म्हणणें, त्यांचीं खासगी कामें करणें; त्याप्रमाणेंच गांवांतील भटाभिक्षुकांस वारंवार जेवाव-यास बोलाविणें, एकादशण्या, लघुरुद्र, वसंतपूजा, मंत्रजागर, व्रतें, उद्यापनें करून त्यांस चांगली दक्षणा देणें, भिक्षुकांनीं आरंभिलेल्या भिक्षुकी कृत्यास द्रव्यद्वारा मदत करणें, शास्त्री, पुराणीक, वैदिक, ह्यांची थोडी बहुत संभावना करणें, तसेच गांवांतील ग्रामकंटक व कुटाळ लोकांस खोटीं खतें लिहि-ण्यास बोलावून त्यांस थोडे बहुत पैसे पोंचविणें,' हीं त्याचीं कृत्यें चालू असतात त्यामुळें सरकार दरबारांत, देवळांत, गटारयंत्रावर, कुटाळ मंडळ्यांत, त्यांची स्तुतिच होत असते ! मग त्या गृहस्थाचीं कर्मे कितीही नीच असोत, त्याची संपत्ति कितीही दुष्ट कृत्यें करून मिळविलेली असो, त्याच्या अब्रूस कितीही डाग लागलेले असोत, त्याची अब्रू व मोठे-पणा हीं कायमचीं कायमच ! ! ह्याच वर्गांतील केशवराव हा होता. त्याच्या दुष्ट कृत्यांचें सविस्तर वर्णन करून त्याचें चरित्र सागूं लागलो तर ह्या पुस्तका एवढीं तीन पुस्तकेही पुरणार नाहीत ! ह्या करितां त्याच्या कर्मकथेचें येथें किंचित् दिग्द-र्शन मात्र केलें आहे. हे तरी करण्याचें कारण असें आहे कीं, आमचे गोपाळरावजी हे ह्यांचे चिरंजीव, व सर्वप्रकारें ह्यांच्या तालमींत वाढलेले ! तेव्हां गोपाळरावास वडिलांची शिक्षा व त्यांच्या वर्तनाचा कित्ता कसा होता हें आमच्या वाचकांस सम-जलें म्हणजे त्याच्या वर्तनाचा अजमास करितां येईल. ह्याच्या विद्याभ्यासाविषयीं तर बोलावयासच नको ! बापानें ह्याला लहा-

नपणीं शाळेंत घातलें होतें व ह्याच्या शिकण्यासाठीं म्हणून खर्चही बराच झाला. परंतु हा बापाचा एकुलता एक लाडका मुलगा ! शिवाय बापही सुखी व विद्येची योग्यता न समजणारा, आणि मुख्यत्वें करून विद्या नसतां अनेक कपटयुक्तींनीं भरभराटीस आलेला, तेव्हां अशा बापाचें लक्ष मुलाच्या शिकण्याकडे कितीसें असेल हें दिसतच आहे ! त्यामुळें ह्याच्या कोणत्याही वाईट खोडीस प्रतिबंध करण्यास म्हणून कोणी नाहींच ! अशी स्थिति असल्यामुळें गोपाळराव हा लहानपणापासूनच दुराचरणाच्या कामांत तरबेज होत चालला. श्रीमंताचा मुलगा दुराचारी निघाला कीं, त्याला सोबती मिळण्यास कांहीं तोटा नसतोच. त्याप्रमाणें गोपाळरावास रामभाऊप्रभृति स्नेही मिळाले. घरांतील थोडा बहुत कारभार गोपाळरावाच्या हातांत आल्या बरोबर त्याला नाचरंग, तमाशे व बाहेरख्यालीपणा, ह्या गोष्टींचा नाद लागला. ही गोष्ट बापाच्या लक्षांतही आली, परंतु साम, दाम, दंड ह्यांतून एकही उपाय त्याला ताळ्यावर आणण्यास उपयोगी पडला नाहीं. तेव्हां शेवटीं बाप त्रासला आणि त्यानें मुलाचा नाद सोडून 'होईल तसें होऊं' ह्मणून स्वस्थ बसला. तथापि आपण कवडी कवडी करून, अनेक निर्दय व नीच कृत्यें करून मिळविलेला पैसा, मुलगा पाण्यासारखा उडवितो, हें पाहून त्याला फारच दुःख होत असे, पण करतो काय ! तसेंच मनचे मनांत चुरचुरत बसावें लागे. ह्या दुःखानें त्याला हृद्रोग लागून प्रकृति क्षीण होऊन एके दिवशीं तो मरण पावला.

बाप मरण पावल्यावर गोपाळरावाच्या चैनीच्या दुष्कृत्यांस प्रतिबंधक म्हणून कोणी राहिला नाहीं. त्याची आईही बाप मरण्याच्या पूर्वीं सहा महिने वारली होती. शिवाय त्याच्या घरांत त्याचें नातलग म्हणून कोणी नव्हतें,

एक दोन दूरदूरचे नातलग असे पुरुष व एक दोन तशाच विधवा बाया, एवढीं कायतीं घरचीं म्हणून म्हणावयास मनुष्यें होतीं; परंतु हीं सर्व पोटासाठीं याजकडे राहिलेलीं होतीं. शिवाय दोन कारकून, एक आचारी, एक पुजेचा ब्राम्हण, एक पाणक्या, वसुलाकरितां ठेविलेले चार शिपाई व दोन गडी अशीं चाकरमाणसें होतीं. ह्यांपैकीं कोणीही गोपाळरावास त्याच्या दुराचरणाबद्दल दोष देण्यासारखें नव्हतें. ह्याचें लग्न लहानपणींच झालें होतें व बायकोही बरोबरीचीच होती, परंतु ह्याचा बाप पैशाचा फार लोभी असल्या कारणानें, त्यानें आपल्या व्याह्याच्या श्रीमंतीकडे व त्यानें दिलेल्या बाराशें रुपये हुंड्याकडे लक्ष देऊन मुलीच्या स्वरूपाकडे फारसें लक्ष दिलें नाहीं. त्यामुळें ह्याला जी बायको मिळाली, ती रूपानें साधारणच होती. तिचे गुण चांगले होते, पण त्यांकडे पहातो कोण ! तिला ऋतु प्राप्त झाला तरी सहा सहा महिन्यांत तिची आणि नवऱ्याची गांठही पडत नसे ! पुरुषाला एकदां बाहेरचा नाद फार लागला म्हणजे त्याची बायको कितीही सुस्वरूप व गुणवती असो, तिजकडे म्हणून त्याचें लक्ष जात नाहींसेंच होतें. तसेंच ह्याचें झालें. त्यांत ह्याची बायकोही रूपानें उत्तम नव्हती. त्यामुळें ह्याचें लक्ष तिजकडे मुळींच नव्हतें म्हटलें तरी चालेल.

बाप वारल्यावर गोपाळराव सर्व संपत्तीचा मालक झाला. हा बापाच्या तालमींत वाढलेला असल्यामुळें लोकांच्या संपत्तीचा अपहार करण्याच्या कामांत तो आपल्या वडिलांपेक्षां तिळमात्र कमी नव्हता. कांकणभर ज्यास्त होता म्हटलें तरी चालेल. ह्यानें लोकांस पैशानें व अब्रूनें बुडविण्याच्या कामांत बापावर कडी ठेविली होती. ह्याच्या बापाचा हेतु कायतो संपत्ति मिळविण्याचा असे, परंतु ह्याचा हेतु संपत्ति मिळविण्याचा असून आणखी आपली विषयवासनाही तृप्त करण्याचा असल्यामुळें

बापापेक्षां ह्याच्या हातून फारच अधिक दुष्कर्मे होत असत. ह्यानें आपली विषयवासना तृप्त करण्याकरितां नानाप्रकारचीं घाणेरडीं कृत्यें चालविलीं होतीं. गांवांतील वेश्यांपैकीं यानें थोड्याच शिल्लक ठेविल्या होत्या. शिवाय त्याच्या घरीं आचारी व पाणके होते त्यांचीं ह्यानें आपल्या खर्चानें लग्नें केलीं होतीं. त्यांच्या लग्नास जो खर्च केला त्याबद्दल त्या रकमेचीं त्यांजपासून ह्यानें खतें करून घेतलीं होतीं. प्रत्येकाच्या लग्नास चारचारशें रुपये खर्च झाला होता, व त्या रकमेचें व्याजही दुहोत्राप्रमाणें असे. त्यामुळें त्यांना वर्षभर चाकरी करून व्याजाची फेड करणेंही मुष्कील पडे. मग मुद्दल फिटण्याची गोष्टच बोलावयास नको. त्यांच्या बायका वयांत आल्या तेव्हां गोपाळरावानें त्यांच्या नवऱ्यांकडून त्यांना आपल्या घरीं आणविलें.

बायकांवर त्यांच्या नवऱ्यांची सत्ता म्हटली म्हणजे 'त्या त्यांच्या बायका आणि ते त्या बायकांचे नवरे' इतकें म्हणण्यापुरती मात्र होती; बाकी सर्व प्रकारें सत्ता गोपाळरावाची! इतकें होतें तरी कोणा गरीबगुरीबाची बायको बरीशी दिसली म्हणजे हरप्रयत्न करून तिला भ्रष्ट करावयाचीच! कधीं कधीं घरांतून बाहेरही काढावयाची! हा क्रम चालू होताच. ज्या बायकांस हा भ्रष्ट करी किंवा बाहेर काढी त्यांचे नवरे आपल्या अब्रूच्या भीतीनें व मोठ्याशीं वांकडें होणार ह्या भीतीनें कांहीं सरकार दरबार करण्यास बहुतकरून धजत नसत. कदाचित् एखाद्या बायकोच्या नवऱ्यानें धीर करून, आपली बायको गोपाळरावानें फूस लावून नेली म्हणून त्यावर मामलेदार किंवा फौजदार यांजकडे फिर्याद घेऊन जावें, तर ते अधिकारी गोपाळरावाचे बांधलेले असल्यामुळें फिर्याद घेऊन जाणारासच ते–'मूर्खा! गोपाळराव हा अब्रूदार मनुष्य! तो असें भलतेंच काम कधीं करणार नाहीं, अशी आमची खात्री आहे. तूं लुच्चा आहेस. अशा थोर गृहस्थाची अशी भलतीच नालस्ती

घेऊन पुन्हा आलास तर संभाळ ! कैदेंत चेपून टाकूं एकदम! तुजवर एकदां मेहेरबानी करून तुला सोडून देतों. छाकटा कोठचा ! निघ येथून खबरदार पुन्हा आलास तर' अशा प्रकारची धमकी देत ! म्हणजे तो बिचारा रडत घरीं जात असे. कदाचित् त्या दुर्दैवी मनुष्यांपैकीं कोणी त्या फौजदाराच्या किंवा मामलेदाराच्या धमकीला न जुमानतां पुढें वरिष्ठ अधिकाऱ्याकडे दाद मागावयास गेला, आणि कदाचित् दादही लागली तरी त्याच्यानें गोपाळरावावर गुन्हा शाबीद होई असा पुरावा करवेना. त्यामुळें अर्थांतच ह्याचें कांहीं होत नसे. कदाचित् गोपाळरावच--त्यानें आपल्यावर फिर्याद केली ह्या रागानें--आपल्या एखाद्या स्नेह्याकडून त्याजवर खोटीच कसली तरी फिर्याद करवून आपल्या दोस्त माजिस्ट्रेटाकडून त्याला शिक्षा देववीत असे. असें झालें म्हणजे ह्यानें दुसऱ्या एखाद्या गरीबाची बायको फितविली तरी तो ह्याजवर फिर्याद करण्यास धजत नसे. अशा रीतीनें ह्यानें किती एक बायका बाहेर काढिल्या होत्या. बरें अशा फुसलावून व थापा देऊन घरांतून बाहेर काढिलेल्या बायकांस ह्यानें जन्मभर तरी पोसावें, तर तेंही नाहीं. वर्ष सहा महिने बाळगिल्यावर त्यांस रजा मिळत असे. मग त्यांनीं पाहिजे त्या रीतीनें आपला निर्वाह करावा. असा क्रम चालला असतां गोपाळरावाचें पहिलें कुटुंब वारलें, व त्यानें गोदावरीशीं लग्न करण्याचा बेत करून मुहूर्तनिश्चयही झाला हें मागें सांगितलेंच आहे.

---

## भाग ४ था.

मागें सांगितलेंच आहे कीं, गोदावरी आपल्या सावत्र आईच्या व तिच्या ओंजळीनें पाणी पिणाऱ्या आपल्या बापाच्या हाताखालीं मोठ्या कष्टानें दिवस काढीत होती. आपला बाप सातशें रुपये घेऊन आपल्याला कोणाच्या तरी

गळ्यांत बांधणार, हें तिला समजलें होतें. परंतु तिनें विचार केला कीं, सुदैवानें जर कदाचित् इतके रुपये देऊन-ही चांगला नवरा मिळाला, तर मग उगीच हट्ट करणें चांगलें नाहीं. परंतु जर एकादा म्हातारा किंवा दुर्व्यसनी पती मिळाला तर होतां होई तों त्याशीं लग्न करावयाचें नाहीं. गोदावरी ही सुशिक्षित, समंजस व मोठी असल्यामुळें तिला नवरा बायको म्हणजे काय, त्या उभयतांचा संबंध कसा वगैरे गोष्टी बऱ्याच समजूं लागल्या होत्या व त्याप्रमाणेंच वृद्ध, रोगी किंवा दुर्व्यसनी नवरा मिळाला असतां बायकांस काय काय दुःखें भोगावीं लागतात हेंही तिला समजत होतें. आपला बाप सातशें रुपये घेऊन आपणास कोणा-च्या तरी गळ्यांत बांधणार हें तिला समजल्यापासून तिला फार वाईट वाटे, व ती जेव्हां जेव्हां कोणी मनुष्य तिच्या बापाजवळ हिच्या लग्नाविषयीं बोलण्यास येई तेव्हां तेव्हां तो काय बोलतो हें लक्षपूर्वक ऐकत असे.

**गोदावरी**—एके दिवशीं संध्याकाळीं देवदर्शनास गेली होती तेथें गांवांतील इतर बायकाही आल्या होत्या. त्या बोलत बसल्या असतां त्यांचें आपसांतच **गोपाळ**रावाच्या बायकोविषयीं बोलणें झालें तें असें.

**एक बायको**—(दुसरीला) त्या **गोपाळ**रावाची बायको आजारी होती, ती मेली म्हणतात. खरें कां हें?

**दुसरी बायको**—खरेंच तें, आज दोन दिवस झाले. सुटली बिचारी एकदां दुःखांतून!

**एकजण**—तिला कसलें एवढें दुःख होतें! श्रीमंताची बायको ती! तिला कांहीं कोणत्याही गोष्टीला कमी कां होतें?

**दुसरी**—अग कमी नसतें तर ती मेलीच नसती. नव-ऱ्याची नुसती श्रीमंती काय चाटावयाची आहे! बायकांना

दुसरें कांहीं सुख नसलें तरी त्यांना नवऱ्याचें सुख पाहिजे. तें नसून जरी दुसरीं सुखें खंडीभर असलीं, तरी तीं त्यांना गोड लागत नाहींत. त्यांतलीच गत ह्या **गोपाळ**रावाच्या बायकोची. नवरा श्रीमंत, बायकोला डागिने पुष्कळ, खाण्यापिण्याला तोटा नाहीं, काम करावयास नको, हें सगळें चांगलें होतें पण नवऱ्याला बाहेरचा नाद पराकाष्ठेचा असल्यामुळें तें सगळें फुकट गेलें. तो बायकोचें नांव देखील घेत नसे. तिला नहाण आल्यापासून वर्षावर्षांत दोघांची गांठ देखील पडत नसे. आणि ती बायको चांगली गुणांची व थोरा मोठ्याची मुलगी असल्यामुळें झुरणीस लागली होती. आणखी नवऱ्याची कधीं कपिलाषष्ठीचा योग येऊन गांठ पडली असेल; तिच्या योगानें तिला त्याच्या पासून आजार लागला. त्यामुळें तिची प्रकृति फारच बिघडली, तिला औषधपाणीही कोणी केलें नाहीं. आणि केलें तरी त्या औषधांनीं शरीराच्या दुखण्याला गुण येईल, पण मनाच्या दुखण्याला त्यांचा काय उपयोग होणार आहे? त्याला तसेंच औषध पाहिजे. तें मिळण्याची तर आशाच नव्हती. त्यामुळें ती आज कितीएक महिने खितपत पडली होती. शेवटीं परवां आटपली बापडी!

**एकजण**—बरें झालें बाई, सुटली एकदां! त्या दुःखापेक्षां मरण बरें!

**दुसरी** —ती सुटली, तरी आणखी कोणाची पोर बुडावयाचीच! कारण त्याच्या जवळ पुष्कळ पैसे आहेत, व त्याचें वयही फारसें दिसत नाहीं, तेव्हां ह्या गोष्टींना भुलून कोणी तरी आपली मुलगी त्याच्या भरीस घालीलच! आणि तिचीही पहिल्या बायको सारखी गत होईलच! कारण ह्याचा बाहेरचा नाद ह्मणून कांहीं जिवांनजीव आहे तोंपर्यंत सुटावयाचा नाहीं तेव्हा बायकोचे हाल तरी कसे चुकतात!

**एकजण**—कोणा मेल्याची पोर वर आली आहे! असल्या मेल्या खाटकाला देण्याला? त्यापेक्षां तिला विहिरींत कां ढकलून दिली नाहीं?

**दुसरी**—अग तें कांहीं नाहीं हो! लोक आंत कांहीं पहात नाहींत. बाहेरच्या थाटमाटालाच भुलतात, आणि मुलीचा जीव संकटांत घालतात! आणखी कोणी मुलगी सांगून नाहींच दिली, तरी तो एकाद्या लोभी गरीबाची पैसे देऊन करील.

**एकजण**—अगे पण पैसे घेऊन तरी पहिल्या बायकोसारखे हाल काढावयासच मुलगी द्यावयाची कीं नाहीं?

**दुसरी**—अग पैसा घेऊन मुलगी देणारे लोक तिच्या सुखाकडे बघत नाहींत. त्यांची नजर काय ती पैशाकडे असते. तेवढें मिळालें, म्हणजे झालें. मग आपली मुलगी लग्न झाल्यावर कशाही कां हालांत पडेना, त्याची ते काळजी करीत नाहींत. ह्यांची आणि खाटकांची एकच रीत. ते बकऱ्याचें मांस विकितात आणि हे आपल्या मुलीचें विकितात, दोघांना दयामाया म्हणून नाहींच.

**एकजण**—मरोत ते रुपये घेऊन मुलगी देणारे! जळोत त्यांचीं पोटें! संध्याकाळ झाली. चला आतां आपण घरीं जाऊं.

हें त्या बायकांचें बोलणें **गोदावरी** लक्ष देऊन ऐकत होती. तिनें जेव्हां त्या **गोपाळरावाच्या** बायकोचे हाल ऐकिले, तेव्हां तिच्या कोमल मनास अतिशय दुःख झालें, आणि मनांत म्हणाली, ' देवा मला नकोरे अशाच्या पदरीं पडूं देऊं ' पुढें जेव्हां तिनें त्या बायकांच्या तोंडून तो ' **गोपाळराव** पैसे भरूनही एखाद्याची मुलगी करील ' असें ऐकिलें तेव्हां तिला मोठी काळजी पडली. कारण तिला वाटलें कीं, जर हा बायको मेलेला **गोपाळराव** आपल्या बापाकू-

हे येऊन त्याच्या म्हणण्याप्रमाणें पैसे देण्याचें कबूल करून मला मागूं लागला, तर बाप कांहीं नाहीं म्हणावयाचा नाहीं. त्यांत आणखी तो श्रीमंतही आहे, तेव्हां नाहीं म्हणावयाची तर गोष्टच बोलावयास नको. ती देवास म्हणाली, देवा! मजवर कृपा कर आणि त्या गोपाळरावास आमच्या घरीं येण्याची वासना होऊं देऊं नको.

त्या दिवशीं देवळाहून घरीं आल्यापासून गोदावरीस लग्नाविषयीं अधिकच काळजी पडली. कोणी परका गृहस्थ तिच्या बापाजवळ येऊन बोलत बसला, म्हणजे त्यांचें बोलणें ती लक्ष देऊन ऐकत असे. त्यांचें बोलणें आटपल्यावर त्यांत गोपाळरावाकडून तिला मागण्याचें कांहीं बोलणें निघालें नाहीं असें असलें म्हणजे तिचा जीव जरा भांड्यांत पडे. तिला कितीएक मागण्या आल्या, परंतु तिच्या बापाचा तिचे बरोबर सातशें रुपये घेण्याचा अगदीं निश्चयच ठरलेला असल्यामुळें त्या परत गेल्या. कोणाचेंच कांहीं बरोबर जमलें नाहीं.

मागें सांगितल्याप्रमाणें रामभाऊ एके दिवशीं तिच्या बापाकडे आला, व पूर्वीं सांगितल्याप्रमाणें त्याचें व तिच्या बापाचें बोलणें झालें, तें तिनें सर्व ऐकिलें. तेव्हां तर तिच्या मनांत धसकाच बसला. तिला वाटलें कीं, आतां मी खचीत त्या गोपाळरावाच्या पदरीं पडणार. हा विचार मनांत आल्यानें तिला फार दुःख झालें. त्या गोपाळरावाची आपल्या पहिल्या बायकोशीं वागणूक, तिच्या योगानें तिचे झालेले हाल, त्याचें दुराचरण, हीं तिच्या डोळ्यांपुढें येऊन उभीं राहिलीं! तेणेंकरून तिच्या मनांत भय व दुःख ह्यांनीं अगदीं घोंटाळा करून टाकिला. शेवटीं तिनें विचार करून असा निश्चय केला कीं, आतां आपल्या मनांतील गोष्ट मावशीनें सांगितल्याप्रमाणें बापाजवळ बोलावयाची.

ातां लाज धरून उपयोग नाहीं. मग बापानें ह्याबद्दल मला ंडगी म्हटलें तरी चिंता नाहीं.

त्या दिवशीं रात्रीं जेवण झाल्यावर गोदावरीची सावत्र ाई कोठें शेजारच्या घरीं कांहीं कामाकरितां गेली होती. ेचा बाप एकटांच खोलींत बसला होता. अशी संधि पाहून । बापाजवळ जाऊन बसली.

**गोदावरी**—बाबा, आज मला कायसें करमत नाहीं कसें-ःच वाटतें.

**त्र्यंबक**—कां काय होतें माझ्या गोदूला ! कपाळबिपाळ ाहींना दुखत ?

**गोदावरी**—नाहीं, कपाळ नाहीं दुखत, पण कांहीं चैन ढत नाहीं. पण बाबा, मघां तुजजवळ तांबडें पागोटें घात-ेला बोलत बसला होता तो कोण ?

**त्र्यंबक**—अग तो त्या बचंभटाचा मुलगा रामभाऊ, त्या ुभारवेशीच्या आळीला त्याचें घर आहे. कां बरें !

**गोदावरी**—नाहीं, फार वेळ तुजजवळ बोलत बसला होता हणून विचारिलें. एवढा वेळ कसल्या गोष्टी चालल्या होत्या !

**त्र्यंबक**—तुला पोरीलाग कशाला पाहिजेत त्या गोष्टी ! ो तुझ्या लग्नाविषयीं बोलत होता. समजलीस ?

**गोदावरी**—बाबा रागावूं नको. मीं विचारिलें म्हणून काय ालें? खरेंच कशाविषयीं बोलत होता ?

**त्र्यंबक**—खरोखरच तुझ्या लग्नाविषयीं बोलत होता. दु-सरें कांहीं नाहीं.

**गोदावरी**—तें समजलें, पण म्हटलें कोठें तें ?

**त्र्यंबक**—तुला कशाला ह्या चौकशी पाहिजेत ?

**गोदावरी**—नाहीं, तरी पण ?

**त्र्यंबक**--तरी पण काय ? अग तो गोपाळराव म्हणून एक त्याचा स्नेही आहे. तो श्रीमंत आहे, तरुण आहे. त्या-

ची बायको नुकतीच वारली. त्याला दुसरें लग्न करावयाचें आहे म्हणून हा त्याचा स्नेही तुझ्याविषयीं विचारावयास आला होता.

**गोदावरी**--मग ?

**त्र्यंबक**—तुझी तरी शिकस्त झाली **गोदे** ! मग काय ! मीं त्याला सांगितलें कीं, तो नवरामुलगा श्रीमंत असो, कीं तरुण असो, आमची आहे गरीबी तेव्हां त्यानें आम्हाला आमच्या म्हणण्याप्रमाणें रक्कम दिली पाहिजे. ती जर तो कबूल करील तर आम्ही तुमचें म्हणणें मान्य करूं. तें स्थळ काय उत्तम आहे. हजार रुपये हुंडा देऊन देखील शोधूं गेल्यास असें स्थळ मिळावयाचें नाहीं. तो नवरामुलगाही तरुण हौशी, श्रीमंत व त्याच्या सर्व संपत्तीचा एकटा मालक आहे बायकोला डागिन्यांनीं पण काय मढवून काढील. तें जमेल तर फार उत्तम होईल.

**गोदावरी**—बाबा—

**त्र्यंबक**—**गोदे** काय म्हणतेस ? तुझ्या मनांत कांहीं तरी बोलावयाचें आहे. बोल बोल काय तें.

**गोदावरी**—बाबा, मला तूं तेथें कां देणार ?

**त्र्यंबक**—आमच्या म्हणण्याप्रमाणें जर तो कबूल झाला, तर मग देण्याला काय हरकत आहे ? तेथें द्यावयाची हें समजल्यावर तुला देखील फार आनंद व्हावा, पण तूं तर उलटी त्रासलेली दिसतेस. हें काय ? वाईट कां आहे तें स्थळ ?

**गोदावरी**—बाबा, त्याची पहिली बायको कशानें मेली हें तुला ठाऊक आहे का ?

**त्र्यंबक**—हो, तिला दोन तीन महिने ताप येत होता. बरी करण्याकरितां नवऱ्यानें शेंकडों उपाय केले, पण कांहीं गुण आला नाहीं; शेवटीं मेली. दुसरें काय कारण आहे? तिचें आयुष्यच सरलें त्याला कोणाचा उपाय चालणार आहे !

**गोदावरी**--पण मीं ऐकिलें कीं, ती त्याच्या त्रासामुळें मेली !

**त्र्यंबक**—त्याच्या त्रासामुळें ! ती कशी ! ऐकूंदे तरी एकदां.

ह्या वेळीं **गोदावरीनें** देवळांत त्या बायकांच्या तोंडून ऐकिलेली सर्व हकीकत बापास सांगितली. मात्र अमुक ठिकाणीं अमक्या जवळून ऐकिली असें सांगितलें नाहीं. मोघम ' मीं असें ऐकिलें ' असें सांगितलें. आणि म्हणाली:—बाबा, त्या ठिकाणीं मला दिले तर माझेही तसेच हाल होतील. हें मनांत आण, आणि मला तेथें देण्याचा बेत करूं नको.

ह्यावेळीं **त्र्यंबकभट** एकटाच होता. त्याचें मन **गोदावरीच्या** विरुद्ध वळविण्यास दुसरें कोणी जवळ नव्हतें, व तीही लाडक्या लाडक्या शब्दांनी बोलत होती, त्यामुळें त्याचें मन कांहीं वेळ हिच्या म्हणण्याकडे वळलें, आणि म्हणाला ' बेटा, ' मी काय करणें तें तुझ्या सुखाचा विचार करूनच करीन.

**गोदावरी**—पण मघां आला होता तो उद्यांच जर रुपये घेऊन आला तर मग कसें करशील ?

**त्र्यंबक**—अग तो रुपये घेऊन आला तरी मी घेतले पाहिजेत कीं नाहीं ?

**गोदावरी**--बरें आहे, पण काय बोलला आहेस तेवढें लक्षांत असूं दे म्हणजे झालें.

**गोदावरीच्या** बोलण्यानें **त्र्यंबकभटाचें** मन तिच्या म्हणण्याकडे तत्कालिक वळलें होतें, व मध्यें जर त्याच्या मनाला दुसरीकडे ओढणारें कोणी नसतें, आणि **गोदावरीचेंच** बोलणें वारंवार त्याच्या कानांवर जातें, तर कदाचित् तिच्या म्हणण्याप्रमाणें त्यानें केलेंही असतें. परंतु तिचा नाश करून आपलें हित करून घेण्यास तिची दुष्ट सावत्र आई टपतच होती. त्यामुळें तिचे बोलण्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं.

गोदावरीचें बापाजवळ बोलणें झाल्यावर दुसऱ्या दिवशीं जेव्हां त्याची आणि बायकोची गांठ पडली, त्यावेळेस–तरुणी-कामुकच तो त्यानें गोदावरीचें सर्व बोलणें तिला सांगितलें. तेव्हां ती लागलीच संतापाचा आवेश आणून म्हणाली–"काय ग बाई हें ! ह्या आतांच्या पोरींना भीड मर्यादा कांहीं नाहींच ! 'आजाला नातू शिकवितो, त्यांतली अवस्था ! आपण ज्या ठिकाणीं द्यावयाची म्हणूं, तें ठिकाण हिला वाईट लागणार ! म्हणजे आम्ही जशी कांहीं मूर्खच ! हीच काय ती शहाणी ! आम्ही योजिलेलीं ठिकाणें जर मनास येत नाहींत, तर म्हणावें स्वतःच नवरा पाहून कर लग्न; नाहीं तर तशीच रहा. द्वाड कारटी कोठची ! हें लिहिणें वाचणें शिकल्याचें फळ बरें ? ह्या लिहिणें वाचणें शिकलेल्या पोरी अशाच बाजारी होतात. मग त्यांना, लाज, भीड, मर्यादा हीं कशीं तीं ठाऊकच नाहींतशीं होतात. कांहीं नाहीं तिचें म्हणणें ऐकावयाचें. ती झक् मारते ! पुनः ह्याविषयीं शब्द काढिला तर चांगला कान उपटावा. ती हें बोलली तेव्हां मी जवळ असतें तर कानशिलेंच लाल केलीं असतीं. पण येथें काय ! गोदी लाडकी ! तिला कसें बोलावें ! ध्या आतां ! बसली डोक्यावर ! "

**त्र्यंबक**—अग तूं का वेडी आहेस ? तिचें म्हणणें का मी ऐकणार आहे ? आपल्याला काय करावयाचें तें ठरलेलेंच आहे. तिचें बोलणें तुला सांगितलें, इतकेंच. बाकी तुझ्या विचाराबाहेर कां मी कांहीं करीन ?

ह्या प्रमाणें त्र्यंबकभटाचें व त्याच्या बायकोचें बोलणें झालें. त्याच्या दुसऱ्या दिवशींच दोन प्रहरीं, रामभाऊ, संध्याकाळीं रुपये आणण्याचें कबूल करून गेला, तेंही गोदावरीनें पाहिलें होतें. त्यामुळें त्या दिवशीं तो रुपये घेऊन येण्यापूर्वीं कांहीं वेळ, आईबाप एके ठिकाणीं असतां तिनें लग्नाची गोष्ट

काढिली, व बापास म्हणाली कीं, 'बाबा, अशा ठिकाणीं मला भरीस घालून माझ्या जन्माचें मातेरें करूं नको. माझ्या जन्माच्या सुखाकडे लक्ष देऊन दुसरें चांगलेंसें स्थळ पहा मग तेथून दोन तीनशें रुपये कमी आले तरी चिंता नाहीं. आणि तुला सातशें रुपयेच पाहिजे असतील, तर चांगलेंसें स्थळ पाहून तिकडून किती येतील ते पहा, आणि बाकी सातशेंच्या भरीला जे लागतील ते मी मावशीकडून तुला देववीन. पण त्या गोपाळरावाच्या मोठेपणाला भुलून आपल्या पोटच्या गोळ्यास झुरझुरून मरावयास लावूं नको. आपल्या मुलांच्या सुखाकडे लक्ष देणें हें आईबापांचें मुख्य कर्तव्यकर्म आहे. तें त्यांनीं बरोबर रीतीनें केलें नाहीं, तर तीं परमेश्वराचीं मोठीं अपराधीं होतात, व जन्मभर मुलांचे हाल होतांना तीं जे अभिश्राप देतात ते त्यांच्या मस्तकावर पडतात. पुरुषाची लग्नाची गोष्ट निराळी आहे. त्यांना काय ? एक बायको आवडली नाहीं, तर दुसरी करतील. बायकांचें तसें नाहीं. त्यांना आईबाप एकदां ज्याच्या पदरीं बांधितील, तो वेडा, कुरूप, अंध, रोगी, वृद्ध कसाही असला तरी त्याजबरोबर सगळा जन्म घालविणें त्यांस भाग पडतें. त्याकरितां मुलगी देते वेळेस आईबापांनीं फार विचार केला पाहिजे.' इत्यादि शहाणपणाच्या व खऱ्या अशा गोष्टी तिनें पुष्कळ सांगितल्या, व परोपरी बापाच्या विनवण्या केल्या, व मनांत नव्हतें तरी आपल्या सावत्र आईस म्हणाली "आई, बायकांचें सर्व सुखदुःख बायकांनाच ठाऊक असतें. बायकांना सर्व सुख कायतें नवऱ्याचें. त्याशिवाय डागडागिने, चिरगुटपांघरूण, चाकरकुळंबिणी कितीही असल्या तरी त्यांचा उपयोग होत नाहीं.

मला ज्या ठिकाणीं द्यावयाचें घाटत आहे, तें ठिकाण असेंच आहे, म्हणजे तेथें इतर गोष्टींची कांहीं कमताई नाहीं, पण मुख्य आवश्यक गोष्टींच्या नांवानें शून्य ! तर आई तूं

तरी मजवर दया करून बाबाला दोन गोष्टी सांग, " असें म्हणून तिच्या पुष्कळ विनवण्या केल्या. परंतु सावत्र आईच ती, आणखी त्यांत मूळचीच दुष्टस्वभावाची, त्यामुळें तिला बिचाऱ्या गोदावरीची तिळप्राय दया आली नाहीं. तिनें तिला कांहीं उत्तर न देतां, जरा रागाच्या मुद्रेनें नवऱ्याकडे पाहिलें. तेव्हां लागलेंच ते म्हणाले:—' गोदे, पुरे कर आतां. तोंड आटपतेस कीं नाहीं ! द्वाड कारटी ! आणखी एक शब्द बोललीस तर तोंडावर डाग देईन ! चालती हो एथन कशी ! आपल्या खोलींत जाऊन बैस. आम्हांला शिकवावयास पुनः येऊं नको. आम्हांला वाटेल तें आम्हीं करूं. तुझ्यापेक्षां आम्हांला अक्कल अधिक आहे. '

अशा रीतीनें गोदावरीस तिच्या बापानें धुडकावून लाविलें. तेव्हां ती फार निराश झाली, आणि तिच्या मनांत ' मी गोपाळरावाबरोबर लग्न करण्यास साफ उभी रहाणार नाहीं ' असें बापास सांगावयाचें होतें. परंतु तिनें विचार केला कीं, असें सांगितलें तर आपणास बाप कदाचित् कोंडून ठेवील, व जबरीनें त्याशीं माझें लग्न लावील. याकरितां आपण कांहींच बोलूं नये. असा विचार करून ती आपल्या खोलींत जाऊन बसली.

त्याच दिवशीं रात्रीं रामभाऊनें उपाध्या व जोशी ह्यांस बरोबर आणून त्र्यंबकभटाच्या पदरांत रुपये घातले व मुहूर्तनिश्चय होऊन गोपाळराव व त्र्यंबकभट हे तयारीस लागले, हें मागें सांगितलेंच आहे. हें लग्न ठरल्यापासून गोदावरी व तिच्या पक्षाचा एक गृहस्थ ह्यांशिवाय सर्वांस आनंद झाला. त्र्यंबकभटास आपल्या ठरावापेक्षां अधिक पैसे मिळाले म्हणून, आनंद झाला; त्याच्या बायकोस आपणास डागिने करण्यास पैसे मिळाले म्हणून आनंद झाला; गोपाळरावास आतां आपली व त्या सुंदर गोदावरीची लवकरच

गांठ पडेल, ह्या आशेनें आनंद झाला, व रामभाऊसही, आपणास गोदावरी प्राप्त होण्यास फार दिवस नकोत, असें वाटून आनंद झाला; व तो तिला आपली झांक दाखविण्याकरितां, नुकेच गप्प केलेल्या पैशांनीं चांगले चांगले कपडे करूं लागला असा सर्वांस आनंद झाला होता; लग्नाला दोन तीन दिवस राहिले होते; त्यामुळें वर सांगितलेल्या मनुष्यांस आपले हेतु सफळ झाले असें वाटत होतें, परंतु ईश्वरीसूत्र कांहीं निराळेंच होतें. त्याच्या योगानें मध्येंच जी एक गोष्ट घडून आली, तिच्या योगानें आनंद मानणाऱ्यांच्या आनंदाचा बोजवार होऊन त्यांना चुरमुरे खात बसावें लागलें! ती गोष्ट पुढील भागांत सांगण्यांत येईल तिजवरून गोदावरीच्या पक्षाचा गृहस्थ तो कोण त्याचाही खुलासा होईल.

## भाग ५ वा.

गोदावरीचें घर ज्या आळींत होतें, त्याच आळींत तिच्या घरापासून दहा पंधरा घरें टाकून एका कुलीन ब्राम्हणाचे घर होतें. हा गृहस्थ पहिल्यानें घरचा खाऊन पिऊन सुखी होता, परंतु त्याचा स्वभाव जरासा पूर्वींच्या काळचा व भोळसर असल्यामुळें त्याला देण्या घेण्याच्या बाबतींत सावकारांनीं–विशेष करून आमच्या केशवरावजींनीं–फार फसविलें होतें. त्यामुळें त्याचा बहुतेक जमीनजुमला सावकाराच्या घशांत उतरला होता. त्या गृहस्थास नारायण म्हणून एक मुलगा होता. त्या गृहस्थास हा मुलगा वृद्धपणीं झाला होता, त्यामुळें तो आईबापांचा अगदीं जीवप्राण होता, तरी त्या गृहस्थानें इतर लाडक्या मुलांप्रमाणें आपल्या मुलास फाजील लाडांनीं बिघडूं न देतां त्याला सरकारी शाळेंत घातलें. नारायण हा चांगला बुद्धिमान् असल्यामुळें त्याचा विद्याभ्यास लवकर व चांगला झाला. त्यानें शाळेंत गणित, भूगोल,

इतिहास, व्याकरण, ह्या विषयांचा चांगला अभ्यास केला. शिवाय त्याचा बाप हा स्वतः शास्त्री असल्या कारणानें, त्यानें आपल्या बापाजवळही काव्य, अलंकार, ह्या विषयांचेंही बरेंच अध्ययन केलें. कांहीं काळानें ह्याची हुशारी शाळाखात्यांतील अधिकाऱ्याच्या लक्षांत येऊन त्यानें त्याला त्याच शाळेंत एक शिक्षकाची जागा दिली. त्या जागेचा पगार दरमहा दहा रुपये होता. नारायण नोकरीसाठीं कोठेंही जाण्यास तयार असतां तर त्याला कोठें तरी चांगली सरकारी नोकरी मिळाली असती. परंतु त्याच्या आईबापांस हा एकुलताएक मुलगा असल्यामुळें तीं ह्याचा वियोग सहन करण्याचें कबूल करीनात, व हाही सुशील व ममताळू असल्यामुळें यालाही आपल्या मातापितरांस वृद्धापकाळीं वियोगदुःखांत टाकून नोकरीकरितां दूर देशीं जाववेना. तथापि ह्यानें आपल्या जाग्याचें काम मेहनतीनें व प्रामाणिकपणानें केल्यावरून कांहीं दिवसांनीं त्याला त्याच शाळेच्या मुख्य शिक्षकाची जागा खालीं झाली होती ती मिळाली. त्या जाग्याचा पगार दरमहा पंचवीस रुपये होता. ती जागा मिळाल्यावर गांवांत पूर्वींपासून त्याच्या हुशारीविषयीं प्रसिद्धि होती ती अधिक झाली, व लोकांत त्याच्या स्थितीप्रमाणें बरीच मानमान्यता झाली. ह्या त्याच्या मानमान्यतेबद्दल आम्हीही त्याला आतां पासून नारायणराव असें म्हणण्याचें सुरू करतों.

नारायणरावास चांगलें समजूं लागल्यावर त्याची सर्व जिनगी घशांत उतरविण्याचा जो केशवरावानें बेत केला होता तो ह्याच्या लक्षांत आला. तेव्हां लागलेंच यानें आपल्या जिनगीपैकीं कांहीं विकून, मारुतीच्या शेंपटाप्रमाणें वाढणारें जें केशवरावाचें कर्ज, तें फेडून टाकिलें, व त्याबरोबर इतर सावकारांचें जें अल्पस्वल्प देणें होतें, तेंही दिलें. त्यामुळें

त्याला राहण्यास घर आणि थोडकेसें शेत, इतकें मात्र शिल्लक राहिलें. तथापि त्याच्या कुटुंबाच्या निर्वाहार्थ राहिलेल्या शेताचें उत्पन्न पुरत नसे. त्यामुळें नारायणरावास अल्प वयांतच मागें सांगितलेली लहानशी चाकरी धरणें भाग पडलें. पहिल्यानें त्याला चाकरी लागली तेव्हां त्याचें वय सोळा वर्षांचें होतें. त्याच्या आईबापांच्या मनांत त्या वेळीं त्याचें लग्न करावयाचें होतें व त्याकरितां त्यांनीं कांहीं खटपटही चालविली होती, परंतु तितक्यांत त्याची आई वारली, त्यामुळें तो बेत तसाच राहिला. पुढें एक वर्षानें त्याचा बापही वारला त्यामुळें आईबापांच्या हातून त्याचे लग्नाचा योग घडून आला नाहीं. पुढें ह्यानें स्वतः आपलें लग्न करावें, परंतु लग्न म्हणजे काय, तें करण्याचा खरा हेतु काय, व तें केल्यावर सुखानें जन्म जावा म्हणून तें होण्याच्या पूर्वी कोणकोणत्या गोष्टींविषयीं सावधगिरी ठेविली पाहिजे, हें त्यास चांगलें समजत होतें. त्यामुळें कशी तरी एकादी लहान मोठी मुलगी पाहून एकदां लग्न करून घ्यावें असें त्याच्या मनांत येईना. त्यामुळें आईबाप वारल्यावरही ३।४ वर्षे म्हणजे ह्याचें वय एकवीस वर्षांचें होईपर्यंत ह्याचें लग्न झालें नव्हतें, हा सुशिक्षित व विचारी असल्यामुळें ह्याचें लग्न २१ वर्षांपर्यंत झालें नव्हतें तरी तो कोणत्याही दुर्व्यसनांत अगदीं पडला नव्हता. आपल्या नोकरीचें काम संभाळून जो वेळ राही, तो त्यानें इकडे तिकडे फिरण्यांत, एकाद्याच्या घरीं, गांवांतील चांडाळ चौकडींत किंवा कुटाळ मंडळींत जाऊन वाता झोकण्यास किंवा तंबाकू चोळीत रिकामें बसण्यांत, घालविला नाहीं; तर त्याला जो वेळ मिळे, तो काव्यें, नाटकें, कादंबऱ्या, इतिहास इत्यादि वाचण्यांत तो घालवीत असे. अशा व्यासंगानें त्याचें मन सुप्रकाशित झालें होतें, व त्याच्या अंगीं रसिकता आली होती. त्यामुळें तो कोणाजवळही बोलूं लागला तर इतका

गोड व मार्मिक बोलत असे कीं, ऐकणारास त्याच्याजवळ कितीही वेळ बोलणें ऐकत बसलें तरी कंटाळा येत नसे.

नारायणरावानें आपणास करमणुकीकरितां व रिकाम्या वेळीं बाचीत बसण्यास किंवा फिरण्यास म्हणून आपल्या घराच्या पाठीमागें एक लहानसा बाग केला होता. त्यांत गुलाब, मोतिया, मोगरा, गुलछबू वगैरे फुलझाडें व पपनस, नारिंगी, डाळिंबी वगैरे फळझाडें लाविलीं होतीं. एक दोन तुळशीचे वाफेही लाविले होते. शिवाय त्यांत एक बेलाचें व एक पारिजातकाचें आणि चार पांच आंब्याचीं अशीं पूर्वींचीच मोठीं झाडे होतीं. त्या बागा सभोंवतीं लहानशी भिंत होती. नारायणराव संध्याकाळीं शाळेंतून आला म्हणजे ह्या बागांत विश्रांतीकरितां बसत असे किंवा फिरत असे. तेथें फुलें, तुळशी, बेल, हीं असल्यामुळें आसपासच्या घरच्या मुली तीं नेण्यास तेथें येत असत. हा संध्याकाळीं बागांत गेला म्हणजे तेथें आलेल्या लहान मुलींबरोबर गमतीनें बोलण्यांतच कांहीं वेळ घालवीत असे. त्याच्या बागांत फुलें तोडण्यास मुलगे फारसे येत नसत. कारण हा त्या गांवांतील शाळेचा मुख्य शिक्षक असल्यामुळें त्यांना त्यांच्या पोरस्वभावामुळें येण्यास भय वाटे. फुलें नेण्यास आलेल्या मुलींजवळ हा गोड बोले व कधीं कधीं त्यांस खाऊही देई, त्यामुळें त्या ह्याजकडे आनंदानें येत व बोलत. ह्या लहान मुलींजवळ बोलण्यांत व गोष्टी सांगण्यांत त्याचे दोन हेतु होते. दिवसभर काम करून थकलेल्या मनास कांहीं वेळ विश्रांति व्हावी व घटकाभर लहान मुलींच्या बोलण्या चालण्याची गंमत पहाण्यास मिळावी व तेणेंकरून मनाचा शीण जावा, हा एक- आणि दुसरा हेतु असा होता कीं, तेथें येणाऱ्या मुलींत सुरेख, शहाणी, मर्यादशील, होतकरू कोण आहे, कोणाला घरची शिक्षा चांगली आहे, हें समजावें, म्हणजे ती आपल्या मना-

प्रमाणें असल्यास आपणाकरितां तिच्या वडिलांजवळ तिची मागणी वगैरे घालण्यास ठीक पडेल. मुली लहान असल्या तरी त्यांचे बोलणें चालणें, हासणें खेळणे, रीतभात हीं पाहिलीं म्हणजे त्यांत होतकरू, मर्यादशीळ, हुशार कोणती आहे हे चतुर मनुष्याच्या लक्षांत आल्यावांचून राहत नाहीं.

गोदावरी आपल्या मावशीकडून घरीं आल्यावर एक दोन दिवसांनीं शेजारच्या एका लहान मुलीबरोबर बेल, तुळशी व फुलें आणण्याकरितां संध्याकाळच्या वेळीं वर सांगितलेल्या नारायणरावाच्या बागांत गेली. तिला मावशीकडे मुंबईस असतांना तेथें बागांत जाण्याची व तेथील शोभा पहाण्याची संवय असे. त्यामुळें ती वसईस आल्यावर मुंबईसारखे येथें बाग नाहींत हे पाहून तिला जरा वाईट वाटत असे. परंतु हा नारायणरावाचा लहानसा टुमदार बाग पाहून तिला बरें वाटलें ती रोज त्या बागांत संध्याकाळच्या वेळीं फुलें वगैरे आणण्यास जाऊं लागली. एके दिवशीं ती त्या बागांत फुलझाडांकडे व फळझाडाकडे पहात पहात मधून मधून बरोबरच्या लहान मुलीबरोबर कांहीं बोलत बोलत स्वच्छंदानें फिरत होती, इतक्यांत त्या दिवशीं नारायणराव चार वाजतां शाळा सोडून घरीं आला होता, तो नित्यक्रमाप्रमाणे अंगांत एक सदरा व डोकीला एक रेशीम कांठी उपर्णे गुंडाळलेलें, व हातांत एक पुस्तक घेऊन, बागांत गेला व रोजच्या क्रमाप्रमाणें इकडे तिकडे फिरूं लागला, इतक्यांत त्याची दृष्टि वर सांगितल्याप्रमाणें गोदावरी फिरत असतां तिजकडे गेली.

गोदावरीचें सुंदर रूप, तिची ती बालपणा जाऊन नुकताच तारुण्यास आरंभ झाला आहे अशी मुग्ध अवस्था, तिचें चालणें, पहाणे, पोषाख याची साधी व टापटिपीची तऱ्हा, हीं पाहिलीं म्हणजे कोणाचेंही मन रममाण व्हावेंच; अशी ती होती; मग नारायणराव तर ज्वानींत आलेला, अविवाहित व

रसिक असा होता; तेव्हां त्याचें चित्त गोदावरीच्या ठिकाणीं रममाण झालें हें सांगावयास नकोच. तो तिजकडे पहात व तिचें लावण्यामृत आपल्या नेत्रद्वारें प्राशन करीत थोडा वेळ तसाच उभा राहिला. त्याचें मन जरा चंचळ झालें तरी त्यानें तसेंच आवरून धरिलें, व हळूहळू ती जेथें फुलें तोडीत होती तेथें जवळच जाऊन उभा राहिला. नारायणरावानें गोदावरीस तिच्या लहानपणीं पुष्कळदां कडेवर घेऊन खेळविलें होतें, तरी तिची आई वारल्यापासून सहा सात वर्षे ती आपल्या माहशीकडेच होती त्यामुळें व तिच्या लहानपणाच्या व आतांच्या स्वरूपांत फारच फरक पडलेला असल्यामुळें त्याच्यानें तिला पाहिल्याबरोबर ओळखवलें नाहीं. तेव्हां तो तिला म्हणाला— ‘ मुली, तूं कोणाची मुलगी ग ! ’

गोदावरी आपल्या फुलें तोडण्याच्या नादांत होती व नारायणरावही तिच्या बाजूकडून हळूहळू चालत आला होता, त्यामुळें तो जवळ येईपर्यंत तिला दिसला नाहीं. त्यानें वर सांगितल्याप्रमाणें तिला विचारिलें, तें ऐकिल्याबरोबर ती त्याजकडे पाहून जरा चपापली, आणि जरा एकीकडे जाऊन खालीं पहात उभी राहिली.

गोदावरीचा चेहरा आधींच मोहक होता आणि ह्या वेळेस त्याजवर जरा भीति व लज्जा ह्यांची छाया आली होती त्यामुळें तर तो फारच खुमारीदार दिसूं लागला होता. तो पाहून नारायणरावानें उत्कंठापूर्वक पूर्वीचा प्रश्न पुनः तिला विचारिला :

**गोदावरी**—मी बुरजाजवळच्या त्र्यंबकभटाची मुलगी.

**नारायणराव**—त्र्यंबकभटजींची ! अरर ! तूं तर आमच्या भागीरथी ( गोदावरीच्या आईचें नांव ) काकूची मुलगी गोदू ! ओहो ! मी तर तुला ओळखिलें देखील नाहीं ! भागीरथीकाकू वारल्यापासून आज सहा सात वर्षे तूं आपल्या मावशीकडेच होतीस, त्यामुळें असें झालें. तिकडून कधीं आलीस !

**गोदावरी**—पुष्कळ दिवस मनुष्य पाहिलें नसलें म्हणजे असें होतें. मला येऊन चार दिवस झाले.

**नारायणराव**—आतां लग्नाकरितां तुला इकडे आणिलें असेल नाहीं ?

**गोदावरी**—( खालीं पहात उभी राहते. )

**नारायणराव**—गोदावरी, पण तूं तरी मला ओळखिलें कां !

**गोदावरी**—( वाकड्या नजरेनें नारायणरावाकडे पाहून ) पाहिलेंसें वाटतें, पण कांहीं चांगलीशी ओळख पटत नाहीं.

**नारायणराव**—ठीकच. तूं मला पाहिले त्या गोष्टीला आज सरासरी सात वर्षें झालीं, आणि तूं येथें होतीस तेव्हां लहान होतीस. तूं इकडून गेलीस तेव्हां तुला पांचवें किंवा सहावें वर्ष असेल. तुझ्या आईचा व माझ्या आईचा फार घरोबा होता. तुझी आई रोज दोन प्रहरीं जेवण झाल्यावर तुला घेऊन आमच्या घरीं बसावयास येत असे. तूं तर कधीं कधीं एकेक दोनदोन दिवस आपल्या घरीं न जातां आमच्या घरींच राहत असस. मीं लहानपणीं तुला खेळविलें देखील आहे. अजून तरी मला तूं ओळखिलें कां !

**गोदावरी**—आतां बरेंच ओळखिलें.

**नारायणराव**—अग मी तुझ्या सगुणाकाकूचा नानाशास्त्रीबावांचा मुलगा. आतां तरी पटते का पक्की ओळख !

**गोदावरी**—( लाजत लाजत त्याच्या तोंडाकडे पाहून ) आतां बरीक चांगली ओळख पटली.

तिला त्याची ओळख पटली तरी तिच्यानें एकमारखें त्याच्या तोंडाकडे पाहवेना. आधीं तिनें त्याला पुष्कळ दिवसांत पाहिलें नव्हतें, आणि आतां पाहिलें तेव्हां तर तो ज्वानींत आलेला पुरुष दिसला. त्यामुळें व तिच्या त्या वेळच्या वयाच्या अवस्थेमुळें तिच्यानें त्याजकडे पाहवेना. तिला तसें करण्यास भीति व लज्जा वाटे. तथापि त्याचें तें रुंद कपाळ, मोठे व

पाणीदार डोळे, भिवया कमानदार, नाक सरळ, गालांवर ज्वा नीची गुलाबी लाली, एकंदर चेहेऱ्याचा मार्दवणा, भरदार छाती, बांधा बेताचा उंच, लिंबासारखें गोरेपण, स्वर गंभीर व बोलणें गोड ह्यांच्या योगानें तिची नजर वारंवार त्याच्या तों डाकडे गेल्याशिवाय राहिली नाहीं. ती वारंवार त्याजकडे किंचित् भयाभीत, लज्जेच्या व प्रीतीच्या वांकड्या दृष्टीनें पाहूं लागली. तोही मधून मधून प्रेमपुरींत उत्कंठेच्या दृष्टीनें तिजकडे पाहूं लागला.

**नारायणराव**—गोदावरी, इतके दिवस तूं मुंबईस माव शीकडे होतीस तेथें काय करीत असस ? तेथें मुलींच्या शाळेंत जात होतीस कीं नाहीं ?

**गोदावरी**--माझी मावशी स्वतः लिहिणें वाचणें शिकलेली आहे. तिनें मला लिहिणें वाचणें थोडेंसें बरींच शिकविलें. शिवाय मी आज चार वर्षें तेथील मुलींच्या शाळेंत होतें.

**नारायणराव**—त्या मुलींच्या शाळेंत हुशार हुशार मुलींस बक्षिसें मिळत असतात, त्यांपैकीं तुला एखादें मिळालें होतें काय !

**गोदावरी**--मला दरवर्षीं बक्षीस मिळत असे. पहिलीं दोन वर्षें एकेक खण मिळाला होता; आणि आज दोन वर्षें एकेक चाळीस रुपयांची साडी आणि दहा रुपयांचा खण अशीं बक्षिसें मिळालीं.

**नारायणराव**--वाः शाबास गोदावरी. तर मग तूं आतां हुशार मुलगी झालीस; आतां तुला नवराही तुझ्यासारखाच सुशिक्षित मिळाला पाहिजे. तुझ्या बाबानें तसें एखादें स्थळ पाहिलें आहे कीं नाहीं ?

नारायणरावाचा हा प्रश्न ऐकून गोदावरीस आपल्या बापाच्या आपल्या लग्नाविषयींच्या बेताचें स्मरण झालें व आपल्या बापाचा गिळंकृत कन्यादान करण्याचा बेत तिच्या मनांत

आला, व तसें कन्यादान केलें ह्मणजे सुशिक्षित व चतुर नवरा आपणास मिळण्याची आशा नाहीं हें मनांत येऊन तिला दुःख झालें. तें बाहेर दिसूं नये ह्मणून प्रयत्न केला, तरी तें तिच्या मुद्रेवरून नारायणरावाच्या लक्षांत आल्याशिवाय राहिलें नाहीं. तिला कां वाईट वाटलें ह्याविषयींही त्यानें अजमास केला. आपण तिला दुःख होण्याजोगी गोष्ट बोललों ह्याविषयीं त्याला वाईट वाटलें. त्यावरून तो तिला कांहीं तिचें समाधान होण्यासारखें बोलणार, इतक्यांत.

**गोदावरी**—( दीर्घ श्वास टाकून ) संध्याकाळ झाला मी जातें आतां ( असें ह्मणून जाण्यास निघाली. )

**नारायणराव**—जरा थांब गडे. माझ्या बोलण्यानें तुला दुःख झालें, ह्याचें मला फार वाईट वाटतें.

गोदावरीचें मन विरस झालें होतें, त्यामुळें तिच्यानें कांहीं अधिक बोलवलें नाहीं. ती इतकेंच ह्मणाली कीं, 'संध्याकाळ झाला, आई मला रागें भरेल. मी जातें आतां.'

**नारायणराव**—बरें, पण उद्यां तरी तूं येथें येशील का ? आमच्या बागांत फुलें, तुळशी, बेल हीं पाहिजेत तितकीं आहेत.

**गोदावरी**—आईनें मला येऊं दिलें, तर मी उद्यां येईन.

**नारायणराव**—कसें तरी करून येशील तर बरें होईल. कारण तूं फार दिवसांनीं भेटलीस, तर घटकाभर चांगलेंसें बोलावयास देखील सांपडलें नाहीं.

गोदावरीनें मानेनेंच 'होय' अशी खूण करून ती निघून गेली. तिचें मन खट्टू झालें होतें त्यामुळें ती इकडे तिकडे पहात नव्हती तरी जातां जातां तिनें एक दोन वेळां नारायणरावाकडे पाहिलें. हा तर ती दिसेनाशी होईपर्यंत तिजकडे पहात होता. ती एक दोन घरांच्या आड जाऊन

दिसेनाशी झाली तेव्हां तो आपल्या खोलींत परत गेला आधीं तिचें स्वरूप मोहक, स्वर गोड, उपवर झालेली शिवाय चांगली शिकलेली; अशी असल्यामुळें नारायणरावाचें मन तिजकडे फारच लागून राहिलें. तो आपल्य मनांत ह्मणाला, 'आपल्या नशिबीं जर ब्रह्मदेवानें हें र० नेमिलें असेल, तर मजसारखा धन्य कोणीच नाहीं. आपणास जर ही बायको होईल, तर आपल्या संसाराचें सार्थक होईल. ती सुशिक्षित असल्यामुळें आपणास तिच्य सहवासानें क्षणोक्षणीं आनंद होईल. परंतु ती आपली गृहिणी होईल तर!'

तिच्या बापाचा—'तिचे सातशें रुपये घेण्याचा बेत' तो ह्याला सांगोसांगीनें सरासरी समजला होता. त्यामुळें त्याल फार वाईट वाटलें. तो ह्मणाला—'तिच्या बापाच्या ह्मणण्याप्रमाणें मला आज सातशें रुपये देऊन लग्न करण्याचें सामर्थ्य असतें, तर तेव्हांच रुपये देऊन तिजबरोबर लग्न लाविलें असतें. बरें आज नाहीं तर पुढें हा लग्नाचा बेत जमवूं असें ह्मणावें, तर ती आतां फार दिवस लग्नाची राहणार नाहीं. कोणी तरी तिच्या बापाच्या ह्मणण्याप्रमाणें रक्कम देऊन तिचें पाणिग्रहण करील. अशा रीतीचे विचार मनांत आल्यानें त्याचें मन घोटाळ्यांत पडलें. त्याच्या मनाची तिच्या प्राप्तीविषयीं उत्कंठा सुटेना. व तिच्या बापानें तिच्या प्राप्तीकरितां मध्यें जी अट घातली होती ती पुरी करण्याचें सामर्थ्य दिसेना. ह्यावेळेस आपल्या गरिबीबद्दल त्याला वाईट वाटलें. त्याप्रमाणेंच लोभी व निर्दय आईबाप आपल्या पोटच्या गोळ्याच्या सुखाकडे लक्ष न देतां त्याला पाहिजे त्याच्या पदरीं बांधितात, ह्या गोष्टीविषयींही त्यास फारच वाईट वाटलें. त्याचें जेवण वगैरे झाल्यावर झोंप येण्याकरितां तो बिछान्यावर पडला; परंतु एक वेळ गोदाव-

रीची मूर्ति येऊन त्याच्या पुढें उभी रहावी,एक वेळ तिच्या बापाची तिच्या लग्नाविषयींची अट पुढें उभी रहावी, असा एकसारखा क्रम चालला होता, त्यामुळें रात्रभर त्याला चांगलीशी झोंप देखील लागली नाहीं. ( तो सुशिक्षित, चतुर, नीतिमान् व विचारी असल्यामुळें, अयोग्य रीतीनें तिचा आपला अल्प काळ तरी समागम व्हावा हा घाणेरडा विचार त्याच्या मनांत आला नाहीं. )

**गोदावरी** बागांतून खट्टू होऊन घरीं आली. तिचें मनही दुःखित होतेंच, परंतु तिला घरांतील कांहीं काम करावें लागलें, त्यामुळें तिचा कांहीं वेळ त्यांत गेला. तथापि जेवण झाल्यावर जेव्हां ती निजावयास गेली तेव्हां तिच्या मनांत लग्नाविषयीं विचार येऊन, फार काळजी वाटूं लागली. तिला वाटलें कीं, आपणास चांगला सद्गुणी, सुशिक्षित व तरुण पति मिळण्याची आशा दिसत नाहीं, पण त्याच्या उलट एखादा दुर्गुणी, अशिक्षित व वृद्ध असा मिळण्याचा मात्र संभव दिसत आहे. कारण जो सद्गुणी वगैरे असेल तो माझ्या बापाच्या ह्मणण्याप्रमाणें पैसे देण्यास कां तयार होईल ? त्याला कोणाचीही मुलगी पायां पडत माळ घालील. ती आपणाशींच ह्मणाली:—'देवा तूं माझ्या कपाळीं पतिसुख नेमिलेंच नाहीं काय? नेमिलेंच नसलें तर मला थोडीबहुत अक्कल आहे ती तरी द्यावयाची नव्हती. मला वेडीच करावयाची होती ह्मणजे ह्या सुखाविषयीं विशेष विचारच माझ्या मनांत आले नसते !' असे विचार मनांत येऊन तिला कांहीं सुचेनासें झालें. मधून मधून तिला नारायणरावाचीही आठवण होई. त्याचें तारुण्य, सुंदर रूप, त्याचें गोड बोलणें ह्यांजकडे तिचें मन ओढ घेई; परंतु लागलाच त्याचा सहवास होण्यास ज्या आडचणी होत्या, त्या मध्यें आडव्या येत, त्यामुळें मनाची ओढ तेथेंच आडे व त्याची

निराशा होई. अशा प्रकारच्या मनाच्या अवस्थेत तिनें रात्र घालविली. ती आपल्या मावशीकडून निघाल्यापासून तिला लग्नाविषयीं काळजी लागली होतीच, परंतु त्या दिवशीं गोपाळरावाकडून तिच्या बापाकडे रामभाऊ आला होता व त्याच दिवशीं नारायणरावाची भेट होऊन त्याशीं थोडेंसें बोलणेंही झालें होतें, त्यामुळें तिच्या मनास विशेष काळजी व चटपट लागली होती.

दुसरे दिवशीं संध्याकाळीं गोदावरी रोजच्याप्रमाणें फुलें-तुळशी आणण्याकरितां नारायणरावाच्या बागांत गेली. तिच्या मनांत त्याला भेटण्याविषयींही इच्छा होती, त्यामुळें तिनें त्या दिवशीं आपणाबरोबर शेजारची मुलगीही घेतली नव्हती. नारायणराव तर तिच्या येण्याची वाटच पहात होता. तो तिला बागांत शिरतांना पाहिल्याबरोबर बागांत आला. त्या दिवशीं मागें सांगितल्याप्रमाणें दोन प्रहरीं रामभाऊ त्र्यंबकभटाकडे आला होता, व त्या दिवशीं संध्याकाळीं रुपये आणावयाचा करार करून गेला होता, हें तिनें पाहिलें होतें, त्यामुळें काळजीनें तिचें तोंड कोमेजलें होतें. तें नारायणरावाच्या लागलेंच लक्षांत आलें. तेव्हां तो तिलाः—

**नारायणराव**—गोदावरी, आज तुझ्या मुद्रेवरून तुला मोठी काळजी लागली असावी असें दिसतें. कारण आज तुझें तोंड अगदीं कोमेजून गेलेलें दिसत आहे व त्यावर दुःख आणि काळजी ह्यांची छाया स्पष्ट दिसत आहे. ह्याचें काय बरें कारण? कालच्या माझ्या बोलण्याचें का तुला वाईट वाटलें? वाटलें असेल तर मला क्षमा कर. रागावूं नको. तूं लहानपणीं माझ्या कडेखांद्यावर खेळलेली, ह्मणून मी तुला परकी समजत नाहीं. मीं आपलें सहज विचारिलें.

**गोदावरी**—(दीर्घ श्वास टाकून) छत्! तुमच्या बोल-

ण्याचें मला कांहीं वाईट वाटलें नाहीं. त्याविषयीं तुह्मी कांहीं मनांत आणूं नका. माझ्या नशिबाविषयीं मला वाईट वाटलें. त्यांत तुमच्या बोलण्याचें कांहीं नाहीं.

**नारायणराव**—माझ्या बोलण्याचें नसेल वाईट वाटलें. नशिबाविषयीं वाटलें. पण कशानें तरी आज तुला फार दुःख होत आहे असें मला खास वाटतें. तर त्याचें खरें कारण मला सांग. परकेपणा अगदीं धरूं नको. तुला दुःखित पाहून मला फार दुःख होत आहे. तुला आज आई कांहीं अधिकउणें बोलली कीं काय?

**गोदावरी**—आई आज नवीन काय बोलते? तें मी येथें आल्यापासून चाललेंच आहे. त्यासाठीं वाईट वाटून काय करावयाचें आहे?

**नारायणराव**—तर मग तुला वाईट वाटण्याचें कारण तरी काय? तुला आवडत नाहीं अशा ठिकाणीं तुला देण्याचा तुझ्या आईबापांनीं बेत केला आहे कीं काय?

**गोदावरी**—ज्या आईबापांना पैशाचा फार लोभ असतो, तीं मुलीच्या आवडीकडे कशाला पाहतात?

**नारायणराव**—हं! असें काय? कोणत्या ठिकाणीं तुला देण्याचा त्यांचा बेत आहे?

**गोदावरी**—येथेंच कोणा श्रीमंताची बायको नुकतीच मेली आहेना! तेथें देण्याचा विचार आहे.

**नारायणराव**—त्या गोपाळरावाची बायको मेली आहे खरी. त्याला देण्याचा बेत आहे कीं काय?

**गोदावरी**—असें दिसतें खरें!

**नारायणराव**—ईश्वर करो, आणि माझ्या शत्रूची मुलगीही त्याच्या पदरीं न पडो! ज्याला आपली मुलगी अधिकच झाली असेल त्यानें त्याला देण्यापेक्षां एखाद्या शुंभ दरिद्र्याला द्यावी, नाहींतर विहीरींत लोटून द्यावी! त्याच्या

पहिल्या बायकोचे जे हाल झाले, ते कानांनीं ऐकवत दे-
खील नाहींत ! काय त्या बिचारीची दुर्दशा झाली ! तिला दु-
खणें लागून हाल हाल होऊन मरण्याला केवळ हा तिचा
नवरा गोपाळराव कारण झाला !

**गोदावरी**—ती सगळी हकीकत मीं परवा ऐकिली आहे, आणि त्या दिवसापासूनच त्याची धाड मजवर येईल ह्मणून मला भीति वाटत होती, ती आतां खरी होऊं पहात आहे !

**नारायणराव**—त्याच्याकडून कोणी मनुष्य तुझ्या बापाकडे आला होता काय ?

**गोदावरी**—होय. आज दोन तीन दिवस त्याचा एक स्नेही रामभाऊ ह्मणून कोणी आहे तो आह्मांकडे खेपा घालीत असतो. आज दोन प्रहरीं देखील आला होता.

**नारायणराव**—मग, तुझा बाबा त्याला देण्याला कबूल झाला काय ? किती रुपये सांगितले ?

**गोदावरी**—बाबा कबूल होईल तर काय झालें ? त्यानें त्याला सातशें रुपये सांगितले, ते त्यानें कबूल केले, मग बाबाच्या कबुलीविषयीं संशय नको !

**नारायणराव**—काय करावें **गोदावरी** ! ईश्वरानें जर मला एवढी रक्कम देण्याचें सामर्थ्य दिलें असतें तर काय मजा झाली असती ! तेव्हांच देऊन टाकून—तुझी आई तूं लहान असतांना जें वारंवार ह्मणत असे तें खरें केलें असतें!

**गोदावरी**—काय तें ?

**नारायणराव**—तूं लहान होतीस तेव्हां तुझी आई तुला घेऊन आमच्या घरीं बसावयास येई तेव्हां मी तुला कडेवर घेऊन इकडे तिकडे फिरवीत असें, खेळवीत असें, व केव्हां केव्हां खाऊही देत असें. एके दिवशीं मीं विडा खाल्ला होता तो माझ्या तोंडांत असतांनाच मी तुला कडेवर घे-

तलें होतें. तेव्हां तूं माझ्या तोंडांतील विडा मागूं लागलीस, तेव्हां मी तुला तोंडांतील विडा दिला, तें तुझी व माझी आई एके ठिकाणीं बसल्या होत्या त्यांनीं पाहिलें आणि त्या हांसल्या. इतक्यांत माझी आतेबहीण तेथें जवळच उभी होती, ती मोठ्यानें ह्मणाली 'बायकोला पहा कसा तोंडांतला विडा देत आहे तो!' तें ऐकिल्याबरोबर मी तुला खालीं ठेवून लाजून एकीकडे गेलों. त्याच वेळेस तुझ्या व माझ्या आईचें तुला आमच्या घरीं द्यावयाची ह्याविषयीं कांहीं बोलणें झालें. पुढें तुझी आई, मला हाक मारावयाची झाली तरी 'जांवईबोवा' ह्मणत असे. ही गोष्ट आमच्या बाबांच्याही मनास आली होती. तुझी आई त्र्यंबकभटाजवळ बोलली होती कीं नाहीं कोण जाणें. पुढें कोणतीही गोष्ट घडून यावयाची इतक्यांत भागीरथीकाकूच आटपल्या! नंतर तुझ्या मावशीनें तुला तिकडे मुंबईसच नेलें. त्या नंतर माझ्या आईनें ही गोष्ट तुझ्या बापाजवळ एकदोनदां काढिली होती, परंतु तो तुझ्या हल्लींच्या आईच्या आज्ञेंत असल्यामुळें त्या गोष्टीकडे त्यानें मुळींच लक्ष दिलें नाहीं, व पुनः तिनेंही ती गोष्ट त्याजपाशीं काढिली नाहीं. अशी हकीकत आहे. तेव्हां ह्मटलें, जर मजवळ तुझ्या बापाला तुझ्याबद्दल द्यावयास पाहिजेत तितके पैसे असते तर तुझ्या व माझ्या आईच्या मनांतील हेतु पूर्ण करण्याचा विचार केला असता!

**नारायणराव** वरील हकीकत सांगत असतां, ती ऐकून **गोदावरीच्या** मनांत–ती हकीकत ऐकण्याविषयीं उत्कंठा, आईच्या मरणाची गोष्ट ऐकून दुःख, बापाचा आपल्या लग्नाविषयीं मतलब ऐकून काळजी, व आपण ज्याच्याजवळ बोलत आहों त्याशीं आपलें लग्न होणार होतें हें ऐकून लज्जा–हे विकार एका मागून एक असे उत्पन्न झाले, व ते तिच्या मुद्रेवरही दिसत होते. शेवटीं लज्जेनें थोडा वे-

ळ थांबून सलज्ज अशा स्वरानें ह्मणाली:—

त्या गोष्टीला आज बरींच वर्षे झालीं. मग आजपर्यंत दुसरें कोठें कां जमविलें नाहीं ?

**नारायणराव**—पुढें माझ्या आईबापांनीं एक दोन मुली पाहिल्या होत्या, पण त्यावेळेस जरा पैशाचीही अडचण, आणि त्या मुली मला तर अगदीं आवडत नव्हत्या, व तें मीं आईला बोलण्यांत दर्शविलें. त्यामुळें तें लग्नाचें कारण कांहीं दिवस तसेंच राहिलें. इतक्यांत मातोश्रीचा काळ झाला. तिला एक वर्ष होतें न होतें इतक्यांत वडीलही वारले. त्यामुळें तो बेत तसाच राहिला. पुढें मला पैसेही जरा पहिल्यापेक्षां अधिक मिळूं लागले, तेव्हां दोन चार मुली सांगून आल्या होत्या, त्यांतील दोन तर रूपानें अगदीं नादानच होत्या, दोघीजणी बऱ्या होत्या, पण मुळापासून त्यांना चांगली शिक्षा लाविलेली नव्हती व लिहिणें वाचणेंही शिकविलें नव्हतें. त्यांना बायकांच्या इतर कामीं वळणही लाविलेलें नव्हतें असें मला समजलें. ह्मणून मीं तीं स्थळें नाकारिलीं.

**गोदावरी**—मग आपल्या मनाप्रमाणें ह्मणजे कशी मुलगी पहावयाची ?

**नारायणराव**—मी असें ह्मणतों कीं, तिचें रूप सुंदर असावेंच, परंतु तिचे गुण चांगले असले पाहिजेत, तिला घरची शिक्षा चांगली असली पाहिजे, तिला लिहितांवाचतां आलें पाहिजे व तिचा स्वभाव बहुतेक अंशीं तरी आपल्या स्वभावाशीं मिळतां असला पाहिजे. तसा स्वभाव नसला तर आपण संसारांत मिळेल त्यांत संतुष्ट राहून सुखानें वागण्यास पहाणार, आणि आपली बायको प्राप्त वस्तूंत संतोष न मानितां सर्व काळ वस्त्रभूषणांनीं आपलें शरीर शोभविण्याकडे व डामडौल करण्याकडे लक्ष देणार ! अशा भिन्न स्वभावांच्या योगानें दोघांसही सर्व काळ असंतुष्टपणानें

लवावा लागणार ! तसेंच तिला लिहिणें वाचणें येत अस-
ह्मणजे आपण उत्तम उत्तम गोष्टींचें ज्ञान संपादन कर-
ाकरितां सर्वकाळ निमग्न असणार, आणि आपल्या प-
ास ते उत्तम विषय समजत नसल्यामुळें ती आपणास न
ावडणाऱ्या, मूर्खपणाच्या व पोरकट अशा करमणुकींत निमग्न
सणार ! मिळून दोघेंही एकमेकाच्या वागणुकीविषयीं ना-
ुषच आणि अशा स्त्रीच्या सहवासानें जन्म घालविणें हें वि-
ाव्यसनी मनुष्यास, जनावराच्या सहवासानें जन्म घाल-
वण्यासारखें वाटतें ! शिवाय तिला लिहिणें वाचणें येत न-
लें ह्मणजे तिला बहुतकरून ज्ञानसंपादनाचा मार्गच ना-
ीसा झाला असें ह्मणावयाचें. बरें लग्न झाल्यावर आपण
आपल्या बायकोस शिकवून सुशिक्षित करूं ह्मटलें तर क-
ाचित् तसें होण्याचा संभव आहे, पण तेंही फार कठिण-
पडेल. कारण तिला जन्मापासून ज्या बायकांचा सह-
ास असतो त्यांचींच मनें, कुल्या, कुजट व पोरकट विचारां-
ीं भरलेलीं असतात. त्यांत सुशिक्षित अशी क्वचितच अ-
ते. त्यामुळें त्यांच्या शिक्षेंत वाढलेली जी मुलगी तिचें म-
हीं त्यांच्या सारखेंच असणार ! त्यामुळें लग्न झाल्यावर
री आपण तिला शिकविण्याचा प्रयत्न केला, तरी लहान-
णापासून तिच्या हाडांस खिळलेले जे विचार व ग्रह अ-
तात ते काढून टाकणें कठिणच; याकरितां मुलीं लग्न क-
ावयाचें तेव्हांच चांगला विचार करून आपल्या मनाप्रमाणें
मुलगी मिळेल तरच लग्न करावयाचें नाहीं तर नाहीं, असा
ीं निश्चय केला. त्यामुळें लग्न आजपर्यंत राहिलें.

**गोदावरी**—मग इतक्या दिवसांत आपल्या मनाप्रमाणें अशी नाहींच का एखादी मुलगी आढळली !

**नारायणराव**—मीं स्वतः व माझ्या मित्रानें ह्या कामांत पुष्कळ शोध केला, पण कोठें कांहीं मनाजोगतें आढ-

ळलें नाहीं. हल्लीं कालपर्वापासून मात्र ( किंचित् हांसून थांबतो. )

**नारायणराव** बोलत असतां गोदावरी त्याच्या तोंडाकडे वारंवार मर्यादेनें पहात होती, त्याच्या योगानें त्याचें रूप तिला अधिक अधिक सुंदर वाटूं लागलें, व आवडूं लागलें, व त्यामुळें तिच्या मनांतील काळजीचाही तिला विसर पडत चालला. आणखी जेव्हां त्यानें, तिच्या आईचा तिला आपल्याला देण्याचा बेत सांगितला तेव्हां तिला मनांत उगीच आनंद झाला. तो कां झाला, हें तिचें तिलाही समजलें नाहीं. पुढें आपल्याला स्त्री कशी पाहिजे ह्याविषयीं जेव्हां त्यानें आपलें मनोगत तिला सांगितलें तेव्हां तिचें स्वतःचें मनोगत तसेंच असल्यामुळें तिला आपल्या स्थितीचा कांहीं वेळ विसर पडून, तो तिला फारच आवडूं लागला; व तो जसा बाहेर तसाच आंतही सुंदर आहे अशी तिची खातरी झाल्यावरून तिचें मन त्याजकडे वेधलें; त्यामुळें तिला त्याच्या तोंडाकडे पहाण्यास लाज वाटूं लागली, व ती तिच्या नाजूक गालांवरही दिसूं लागली. तेव्हां ती त्याजकडे प्रेमपूरित वांकड्या दृष्टीनें चोरून पाहूं लागली, आणि ह्मणाली:—

'बोलतां बोलतां मध्येंच कां थांबलांत? कालपर्वापासून तें काय?'

**नारायणराव**—तें कांहीं नाहीं !

**गोदावरी**—कांहीं नाहीं कसें? आपल्या बोलण्यांत शेवटीं 'हल्लीं कालपर्वापासून मात्र' असे शब्द आले होते, ह्मणून विचारिलें. नाहीं का सांगावयाचें?

**नारायणराव**—वः, न सांगण्याला काय झालें? आणि तुला जर सांगावयाचें नाहीं, तर सांगावयाचें कोणाला? ह्मटलें कालपर्वापासून मात्र आमच्या मनाजोगतें स्त्रीरत्न आढळलें आहे, परंतुः—

**गोदावरी**—परंतु तें काय ?

**नारायणराव**—परंतु ह्मणजे इतकेंच कीं ज्या स्त्रीशीं आपला संबंध व्हावा अशी आपली पूर्ण इच्छा आहे, तशीच जर आपणापाशीं संबंध होण्याविषयीं तिची इच्छा असली, तरच तिचा आणि आपला संबंध जुळून येण्याचा संभव ! आणि अशा परस्परांचा संबंध जुळण्याविषयीं परस्परांच्या इच्छा असल्या आणि त्यांच्या इच्छेप्रमाणें जर त्यांचा संबंध पुढें जुळला, तर त्यापासून उभयतांसही आमरणांत अत्यानंद होतो. आणि संबंध जुळण्याविषयीं जर एक पक्षीं इच्छा असली आणि दुसऱ्या पक्षी नसली, तर तो संबंध आधीं जुळणें कठिण, आणि कदाचित् जुळला तरी तो सुखावहही होणें कठिण. आणि ह्याकरितांच कोणीही एकपक्षीं इच्छा असेल तर तसा संबंध जुळविण्याच्या भानगडींत पडूं नये. ह्मणून ह्मटलें, आह्माला जें पर्वांपासून स्त्रीरत्न आढळलें आहे त्याशीं संबंध जुळावा अशी माझी इच्छा आहे, परंतु त्याची आहे कीं नाहीं समजत नाहीं. मुळीं इच्छा असली तर पुढें जुळविण्याची गोष्ट !

**गोदावरी**—( सलज्ज ) आपल्यासारख्या चतुर मनुष्यास जी स्त्री रूपानें व गुणांनीं पसंत पडली, ती माझ्या मतें सर्वोपरी उत्तमच असली पाहिजे. आणि अशा स्त्रीनें जर आपल्याला पाहिलें असेल व आपलें तिचें बोलणें चालणें झालें असेल, तर तिच्याशीं सहवास होण्याविषयीं जी आपली इच्छा तिजपेक्षांही अधिक इच्छा आपल्याशीं सहवास होण्याविषयीं त्या स्त्रीच्या मनांत उत्पन्न झाल्याशिवाय राहील असें मला वाटत नाहीं. पण कोणती ती अशी दैवाची स्त्री ? तिचें नांव गांव तरी ऐकूं द्या एकदां !

**नारायणराव**—( सानंद ) गोदावरी, गडे तूं तर अ-

गदीं अंतच पाहूं लागलीस ! तूं आतां फार खोल झालीस ! समजून काय वेड घेतेस ?

**गोदावरी**—मीं नाहीं बाई कांहीं समजलें ! पण नांव सांगायला काय झालें इतक्यांतच ?

**नारायणराव**—तुला आतां नांव सांगितलेंच पाहिजे तर सांगतों ऐक. जिचें दर्शन घेतलें असतां नेत्रांस आनंद होतो, जिचा मंजुळ शब्द ऐकिला असतां कर्ण आनंदित होतात, जिचा स्पर्श झाला असतां सर्व शरीर शीतळ व पवित्र होतें, जिचा सहवास आला असतां धन्यता व पावनता प्राप्त होतें, जी अंतर्बाह्य रम्य, दर्शनीय व त्र्यंबकोद्भवा, गोदावरी, तेंच आह्माला आढळलेल्या स्त्रीरत्नाचें नांव ऐकिलें !

**गोदावरी**—बाई बाई बाई ! वर्णन करण्याची तर अगदीं शर्थच केली !

**नारायणराव**—वर्णन करण्याला तरी वर्णनीय वस्तु लागत असते, नाहींतर तिचें वर्णन करितां यावयाचेंच नाहीं.

ह्याप्रमाणें तीं दोघें एकमेकाशीं बोलत व एकमेकांकडे प्रेमपूरित दृष्टीनें पहात असतां दोघांसही आपआपल्या खऱ्या स्थितीचा कांहीं वेळ विसर पडला व आपला संबंध जुळण्यास मध्यें काय अडथळा आहे ही गोष्टही त्यांच्या लक्षांत राहिली नाहीं. त्यामुळें दोघांसही आपला संबंध जणूं काय जुळलाच आहे असें क्षणभर वाटलें, व तीं एकमेकांकडे पहात आनंदानें कांहीं वेळ स्तब्ध राहिलीं. अशा स्थितींत थोडा वेळ गेल्यावर आनंदाची उकळी अंमळ कमी झाली व संध्याकाळ झालेली पाहून गोदावरीस घरीं जाण्याची आठवण झाली. घरची आठवण झाल्याबरोबर, आपल्या बापाजवळून, दोन प्रहरीं, रामभाऊ संध्याकाळीं रुपये आणण्याचें कबूल करून गेला आहे ह्या

गोष्टीचें स्मरण झालें. तें स्मरण झाल्याबरोबर तिच्या मनांतील आनंद नाहींसा झाला. तिच्या चेहेऱ्यावर आनंदाचीं चिन्हें दिसत होतीं, त्या ठिकाणीं चिंता व दुःख ह्यांचीं चिन्हें दिसूं लागलीं. तीं पाहून नारायणरावासही आपल्या स्थितीची व गोदावरी आपणास प्राप्त होण्यास मध्यें काय अडथळा आहे ह्या गोष्टीची आठवण झाली. तेव्हां त्याच्या मनांतील आनंद नाहींसा होऊन त्या ठिकाणीं चिंता उत्पन्न झाली. इतक्यांत,

**गोदावरी**—एकमेकांच्या इच्छेप्रमाणें झाल्यास सर्व चांगलें आहे, पण तसें होतें कसें ह्याविषयीं मोठी पंचाईत आहे, कारण तो गोपाळरावाकडील मनुष्य आज दोन प्रहरीं, बाबांजवळ संध्याकाळीं रुपये आणण्याचें कबूल करून गेला आहे. तो आज खचित रुपये आणीलसें वाटतें, आणि त्यानें रुपये आणिले ह्मणजे बाबाही ते घेतल्याशिवाय रहाणार नाहींत ह्याला काय करावें ?

**नारायणराव**—आज संध्याकाळीं तो रुपये घेऊन येण्याच्यापूर्वींच तूं आपल्या बाबाला लग्नाविषयीं आपला मनोदय बोलतां बोलतां दर्शव ह्मणजे तो गोपाळरावाकडील मनुष्य रुपये घेऊन आला तरी तुझा बाप आजच ते घेणार नाहीं.

**गोदावरी**—मीं आपला मनोदय बाबाला एकदां कळविला होता. त्या वेळेस आईही जवळ नव्हती. त्यामुळें त्याचें मनही माझ्या बोलण्याकडे कांहींसें वळलें होतें व त्यानें त्या वेळेस ‘ मी काय करणें तें तुझ्या सुखाचा विचार करूनच करीन ’ असेंही ह्मटलें होतें व कदाचित् तो तसें करील असें मलाही वाटत होतें; पण आज दोन प्रहरीं जेव्हां तो मनुष्य आला तेव्हां बाबानें मजजवळ कबूल केलेल्या गोष्टीचा कांहींच विचार मनांत न आणितां, बेला-

शक त्याला होकार दिला. आतां आज संध्याकाळीं त्यानें रुपये आणून पदरांत घातले ह्मणजे मग माझें कांहीं चालण्याची आशाच नाहीं.

**नारायणराव**--काय करावें **गोदावरी**! आज तितकी सातशें रुपयांची रक्कम मजजवळ नाहीं, ह्याविषयीं मला पराकाष्ठेचें दुःख होत आहे! मी कसें तरी करून चारशें रुपये देण्यास तयार करीन, परंतु आणखी तीनशें पाहिजेत ते मिळण्याचा कांहीं मार्ग दिसत नाहीं. काय माझें प्रारब्ध तरी! तुझ्यासारख्या अमूल्य रत्नाच्या प्राप्तीकरितां सातशें रुपये देण्याचें मला सामर्थ्य नसावें! ईश्वर-इच्छा!

**गोदावरी**—आपल्याना, मला दुःखांतून काढण्याविषयीं इतकी आस्था आहे हें पाहून मला फार आनंद होतो, परंतु ही रुपयांची गोष्ट मनांत आली ह्मणजे फार दुःख होतें. ह्याविषयीं मला एक उपाय सुचला आहे, आपल्याना पसंत पडला तर करून पाहीन.

**नारायणराव**—ऐकूंदे तर खरा. तूं उपाय काढशील तो गैरशिस्त नसेलच!

**गोदावरी**—माझ्या मावशीला इकडील सर्व हकीकतीचें एक पत्र पाठवितें, व त्यांत मला तीनशें रुपये देण्याविषयीं तिला लिहितें. तिलाही आतां माझ्याशिवाय जवळचें नातलग असें कोणी राहिलें नाहीं व मजवर तिचा पराकाष्ठेचा लोभही आहे, त्यामुळें अखेरीस तरी ती तिची राहिली साहिली सर्व जिनगी मलाच देणार आहे, ह्मणून ह्यावेळेस अशा कामाकरितां तिजजवळ तीनशें रुपये मागितले असतां ती नाहीं ह्मणणार नाहीं.

**नारायणराव**--**गोदावरी**, तुझें चातुर्य व तुझी माझ्या ठिकाणीं प्रीति हीं पाहून मी आनंद समुद्रांत गटंगळ्या खात आहें असें मला वाटतें! तूं योजिलेल्या विचारास मी नि-

रुपायानें संमत देतों. तर आज तूं आपल्या बाबाजवळ लग्नाची गोष्ट काढ. जरा भीड वगैरे सोड आणि **गोपाळरा**वास तुला न देण्याविषयीं त्यास सुचव आणि ज्या उपायानें त्याचें मन तुझ्या बोलण्याकडे वळेल तो उपाय करून शेवटीं, 'दुसऱ्या एखाद्या चांगल्या ठिकणाकडून कांहीं रुपये कमी आले तरी तें कबूल करण्याविषयीं त्यास सांग. इतकें करूनही तो रक्कम कमी करीत नाहींच असें झाल्यास, चार दिवस थांबण्याविषयीं तरी त्याला सांग, आणि माझें नांव तर न घेतां मोघमच सांग कीं, एखाद्या चांगल्याशा स्थळाकडून चार पांचशें रुपये येतील तर ते घ्यावे आणि बाकीचे सातशेंच्या भरीचे दोन तीनशें काय लागतील ते मी आपल्या मावशीकडून आणून देतें.' असें सांगितलें म्हणजे त्याच्या म्हणण्याप्रमाणें रुपये तर मिळतीलच, मग कायतें चार दिवस मागाहून लग्न करावयाचें इतकेंच तुझें म्हणणें राहिलें, तें तो मान्य करील असें वाटतें.

**गोदावरी**—ठीक आहे. ह्याप्रमाणें मी बाबांजवळ आतां गेल्याबरोबर गोष्ट काढतें. यश देणार परमेश्वर! आतां जातें तर! कारण तो रुपये घेऊन बाबाकडे आला नाहीं इतक्यांत ही गोष्ट काढिली पाहिजे.

**नारायणराव**—ये तर आतां. उदईक तुझी गांठ पडेल तेव्हां ह्या गोष्टीचा काय परिणाम झाला तो समजणार. तोंपर्यंत माझा जीव टांगलेला राहणार आहे!

**गोदावरी**—त्याला कांहीं उपाय नाहीं. मध्येंच इकडे येण्यास मला संधी सांपडणार नाहीं. उद्यां संध्याकाळीं मी होईल तितकें करून लवकरच येईन.

**गोदावरी** घरीं गेल्यावर आपल्या बापाजवळ काय काय बोलली व बापानें तिला कसें धुडकावून लाविलें हें मागें सांगितलेंच आहे. त्याप्रमाणेंच त्या रात्रीं **रामभाऊ**,

जोशी व उपाध्या यांनीं येऊन त्र्यंबकभटाच्या पदरांत रुपये घातले हेंही मागें सांगितलेंच आहे.

आपल्या बापानें आपल्या बोलण्याकडे बिलकूल लक्ष न देतां रुपयेही पदरांत घेतले, हें गोदावरीनें पाहिलें, तेव्हां तिची खातरी झाली कीं, आतां बाप कांहीं आपल्याना गोपाळरावाकडे न देण्याविषयीं तजवीज करीत नाहीं. सारांश आतां दुसरा कांहीं उपाय केला नाहीं तर आपल्याना त्या निर्दय गोपाळरावाच्या पदरांत पडावें लागणार, व आपलीही त्याच्या पहिल्या बायकोसारखी दुर्दशा होणार. हा विचार मनांत आल्यावर ती आपणापाशीं ह्मणाली—" मी त्या गोपाळरावाशीं लग्न लावण्यापेक्षां जीव देईन, पण त्याच्याशीं ह्मणून लग्न लावणार नाहीं. आपल्या मनानें तर, नारायणरावाची भेट व बोलणें चालणें झाल्यापासून त्याला माळ घातलीच आहे. त्या वेळेपासून त्याची मूर्ति माझ्या डोळ्यापुढून हालतही नाहीं. त्याचें मनही आपल्याशीं लग्न करण्याविषयीं उत्सुक आहे. तो सुंदर, तरुण, विद्वान्ही आहे. शिवाय माझी आई वारली नसती तर त्याच्याशीं माझें लग्न झालेंच असतें. तेव्हां आतां आपण कसेंही करून आपल्या स्वर्गस्थ आईचा हेतु सिद्धीस न्यावा. पण हा जरी आईचा हेतु .सता तरीही अशा पुरुषापेक्षां तनुमनधन अर्पण करण्यास अधिक योग्य पुरुष मिळणें कठिणच होतें. तेव्हां आतां हाच निश्चय कीं, कांहीं होवो, नारायणरावाशिवाय इतर पुरुष मात्र पिताबंधुसारखे मानावयाचे. पण मीं असा निश्चय केला आणि तिकडून स्वीकार नाहीं झाला तर ? पण असें कधीं होणारच नाहीं ! आणि अशा सद्गुणी पुरुषाच्या ठिकाणीं अशी शंका घेणें हेंही अयोग्य ! आणि कदाचित् माझ्या दुर्दैवानें तिकडून स्वीकार नाहींच झाला, तर त्यांच्या नांवानें मी आजन्म तशी राहीन, पण दुसऱ्या

पुरुषाशीं संबंध करणार नाहीं. ठीक आहे आतां हाच निश्चय. उद्यां संध्याकाळीं ही गोष्ट त्यांना सांगावयाची.

ह्याप्रमाणें निरुपाय झाल्यामुळें गोदावरीनें आईबापांचें संमत न घेतां नारायणरावाशीं लग्न लावण्याचा निश्चय केला. हा निश्चय ती कामानें अंध होऊन केवळ अविचारानें केला असें ह्मणतां येणार नाहीं. त्याच्या ठिकाणीं तिची प्रीति जडली होती हें तर खरेंच, परंतु केवळ त्या प्रीतिशिवाय-ही तिला असा निश्चय करण्यास इतर कारणें होतीं. तीं कोणतीं हें उघड करून येथें सांगण्याची आवश्यकता नाहीं. एवढा वेळ सांगितलेल्या हकीकतीवरून तीं सहज ध्यानांत येण्यासारखीं आहेत. आणखी तिला त्या वेळीं दुसरा कोणताही विचार करण्यास अवकाशही राहिला न-व्हता. गोपाळरावाचें व तिचें लग्न ठरलेला मुहूर्त एक दोन दिवसांनींच आला होता. ह्याकरितां कोणता तरी निश्चय करणें तो त्याच वेळेस करणें आवश्यक होतें.

दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं रोजच्याप्रमाणें गोदावरी बागांत गेली व तेथें नारायणरावही आलेला होताच. तो तिला ह्मणाला.

‘ कां गोदावरी, काल ठरल्याप्रमाणें तूं आपल्या बाबा-जवळ गोष्ट काढिली असशीलच. काय झालें त्याचें, बाबा काय ह्मणाला, तें ऐकण्याविषयीं माझे कान फारच उत्कं-ठित झाले आहेत ’ !

ह्या ठिकाणीं गोदावरीनें बापाचें व तिचें बोलणें झालें तें व रामभाऊनें रुपये आणून दिले तें सर्व त्याला सांगितलें. तें ऐकून तो फार दुःखित झाला व त्या दुःखाच्या आवेशा-मुळें त्याच्यानें कांहीं वेळ एक शब्दही बोलवला नाहीं. कांहीं वेळानें एक दीर्घ श्वास टाकून ह्मणालाः—मी काल सं-ध्याकाळपासून फार आशेंत होतों कीं, तुझ्या बाबाला त्या-

च्या ह्मणण्याप्रमाणें रुपये मिळतात असें झालें ह्मणजे तो तुझ्या ह्मणण्यास कबूल होईल. परंतु आज तुझ्या तोंडचे हे शब्द ऐकून माझी कंबर अगदीं खचून गेली.

**गोदावरी**—ह्याला कांहीं तरी उपाय योजिला पाहिजे. मी त्या गोपाळरावाजवळ लग्न लावण्यापेक्षां शंभर वेळां अग्नींत आनंदानें उडी टाकीन, पण त्याच्याशीं लग्नास ह्मणून उभी राहणार नाहीं. आतां मला सर्वपरी आपला भरंवसा आहे. ह्या संकटांतून मुक्त करणार आपणाशिवाय मला दुसरें कोणी नाहीं. ह्या गरीब गाईला कसाब नेऊं पहात आहे. आपण सोडविल्यास महत् उपकार होतील. फार काय सांगूं, हा जीव मीं आपल्या पायांच्या ठिकाणीं अर्पण केला आहे. ह्याचें काय पाहिजे तें करण्यास आपण मुकत्यार आहां. ( रडूं लागते )

**नारायणराव**-शिव शिव शिव! गोदावरी! तुझ्या बोलण्यानें आणि तुला दुःखित पाहून माझें हृदय दुभंग होऊं पाहत आहे! अग तुझ्यासारखें रत्न प्राप्त होण्यास सात जन्म तपश्चर्या केली पाहिजे, तरीही तुझ्यासारखें रत्न मिळालें तर भाग्यच! तर अशा तुला संकटांत पाहून सोडविण्यास पुढें होणार नाहीं असा मनुष्य ह्या जगांत तरी मिळेल काय? अग तूं ज्याला हुकूम करशील तो मनुष्य तुझ्यासाठीं काय पाहिजे तें करण्यास तयार होईल! मग मीं तर सर्वस्वी तुझा अंकितच आहें मी तयार होईन ह्यांत नवल तें काय? फक्त तुझा निश्चय कितपत व काय आहे हें समजावें ह्मणून मी प्रथम कोणतीही गोष्ट बोललों नाहीं. बाकी माझा तर निश्चयच आहे कीं, तुझ्या सारखी स्त्री मिळेल तरच बायको करावयाची. नाहींतर आजन्म ब्रह्मचर्य धारण करावयाचें.

**गोदावरी**—आतां माझी सर्व चिंता दूर झाली. आतां

आपण सांगाल त्याप्रमाणें वागण्यास मी तयार आहें तर सांगा आतां मी उद्यां काय करूं तें ?

**नारायणराव**—काय करावयाचें तें कालच मीं आपला मित्र तो **गणपतराव** वकील त्याला विचारून ठरवून ठेविलेंच आहे.

**गोदावरी**—(मध्येंच) हें काय ! त्याला कशाला हें कळविलें.

**नारायणराव**—अग तो वकील तुझा मावस भाऊच आहे, आणि माझाही जिवलग मित्र आहे. त्यामुळें तुझें व माझें हित व्हावें अशी त्याची पूर्ण इच्छा आहे. आणखी तुझ्या बापाच्या संमतीवांचून तूं लग्न करण्याला तयार झालीस ह्मणजे अर्थातच त्याला फार राग येईल व तो तुला आश्रय देणारावर फिर्याद करील. त्यांत आतां त्यानें रुपयेही पदरांत घेतले आहेत, आणि तेही **गोपाळरावापासून** ! त्यामुळें तूं त्याच्याशीं लग्न करण्याचें नाकारितेस हें त्याला समजलें ह्मणजे त्यालाही राग येईल, व तो तुझ्या बापास मिलाफी होऊन त्याजकडून तुला आश्रय देणारावर फिर्याद करविल्याशिवाय कधीं राहणार नाहीं. ह्याकरितां मला वकिलाची संमति घेणें आवश्यक झालें. आतां फिर्याद वगैरे झाली तरी भीति बाळगण्याचें कांहीं कारण नाहीं. तर आतां तूं असें कर कीं, उद्यां उजाडण्यापूर्वीं सुमारें तीन साडेतीन वाजतां, तुझे कपडे वगैरे चिजा कीं ज्यांवर केवळ तुझीच मालकी आहे, तुझ्या बापाचा त्यावर कांहीं हक्क नाहीं अशा घेऊन इकडे निघून यावें. तुला आश्रय देण्याचा माझा निश्चय मीं तुला कळविलाच आहे. पुढें फिर्याद आर्याद काय करतील त्याचा निकाल झाल्यावर पुढें काय तो विचार करितां येईल.

**गोदावरी**—ठीक आहे आपण सांगितल्याप्रमाणें उद्यां

मी आपणाकडे निघून येतें. मीं आपलें तनुमनधन सर्वस्व आपणास अर्पण केलें आहे, हें लक्षांत वागवावें. आपणासारख्या सुज्ञास मीं वारंवार सांगावें असें नाहीं. परंतु माझी पोरबुद्धि, सांगितल्याशिवाय राहवत नाहीं ह्मणून सांगतें. राग न यावा.

**नारायणराव**—गोदावरी, तुला जें कांहीं मीं सांगितलें, तें पुढचा मागचा सुमार पाहिल्याशिवाय व आपल्या मनाचा पक्का निश्चय केल्याशिवाय सांगितलें नाहीं. आतां फार काय सांगूं तूं जर माझा अंगीकार करीत आहेस, तर या कामांत हा देह किंबहुना प्राणही जरी खर्च झाला तरी मी त्याची पर्वा करीत नाहीं ! हें पक्कें समज !

ह्या वेळेस **गोदावरी** व **नारायण** ह्या दोघांचीही आपला एकमेकांचा समागम खचित होणार ह्याविषयीं खातरी झाली होती, त्यामुळें दोघांसही अत्यानंद व्हावा हें उघड आहे, तथापि. त्यांचीं मनें, हें कृत्य निर्विघ्नपणें कसें पार पडेल व त्यांत आपली अब्रू कशी बचावेल, ह्या काळजींत असल्यामुळें त्यांना जितका आनंद व्हावा तितका झाला नाहीं तरी त्यांना—आपण जो हा मार्ग धरिला आहे हा निरुपायानें धरिला आहे, सरळ मार्गानें काम झालें असतें तर आपण ह्या भानगडींत पडलों नसतों; आपण करीत आहों हें काम अगदीं निर्दोष आहे, ह्यांत कोणत्याही प्रकारानें नीतीस धक्का बसत नाहीं, व ह्यांत आपण ईश्वराचे किमपि अपराधी होत नाहीं, असें पक्कें माहीत होतें, तरी तीं दोघेंही तरुण, सरळ स्वभावाचीं व कोमल मनाचीं असल्यामुळें त्यांना हें कृत्य साहसाचें आहे असें वाटलें, त्यामुळें एकमेकांचा संबंध जुळणें हें जरी दोघांस अति इष्ट होतें, तरी त्यांचीं मनें त्या वेळेस, कांहीं भय व काळजी ह्यांनीं भरलेलीं असल्यामुळें उभयतांसही इष्ट अशा प्रसंगीं त्यांच्या तोंडांतून

आनंदोद्गार व प्रेमोद्गार, जसे यावे तसे आले नाहींत. नंतर गोदावरी नारायणरावाचा निरोप घेऊन घरीं गेली. तिच्या घरीं त्या दिवशीं तिच्या लग्नाची तयारी होऊन राहिली होती. दुसऱ्या दिवशीं सकाळीं देवक स्थापना व्हावयाची होती. घरांत तिच्या सावत्र आईच्या संबंधाचीं व शेजारचीं बायका माणसें बरींच जमलीं होतीं. त्यांची गडबड चालली होती. कोणी तळीत होती, कोणी लाडवांकरितां पांक करीत होती, कोणी लाडू वळीत बसल्या होत्या, कोणी दुसरे दिवसाकरितां कांहीं तयारी करीत होती. कोणी, गोदूला तिचा नवरा डागिन्यांनीं मढवून काढील, मग ती श्रीमंताची बायको झाल्यावर आमची ओळख विसरेल, मग ती आमच्याकडे येण्याची व बोलण्याची देखील कठिणच, अशा तिच्या थट्टा करीत होत्या. कोणी–तिला सवती पुष्कळ आहेत, त्यांतल्या दोघी तिघी तर आमच्या घराजवळच राहतात– अशा रीतीनें बोलून तिला चिडवण्याचा प्रयत्न करीत होत्या. कोणी तिला नवऱ्या बायकोच्या संबंधाचे थट्टेचे चावट प्रश्न विचारीत होत्या. परंतु तिचें मन दुसऱ्या दिवसाच्या विचाराकडे लागलेलें असल्यामुळें, त्या थट्टांकडे तिचें लक्षही नव्हतें. त्यामुळें ती त्यांच्यांशीं फारसें बोलली नाहीं. तिला त्या रात्रीं जेवणही नकोसें झालें होतें, परंतु इतर बायकांबरोबर ती उगीच पानावर बसली व जेवलेंसें केलें. ती आपल्या खोलींत जाऊन आंतून दाराला कडी लावून हांथरुणावर पडली. परंतु तिचें मन अगदीं अस्वस्थ होऊन गेलेलें असल्यामुळें तिला चैन पडेना. तिला एकदां वाटावें कीं, आपण एकदम बापाच्या घरून निघून दुसऱ्या पुरुषाकडे जाऊन त्याशीं लग्न लावणें हें मोठें साहसाचें कृत्य आहे, हें कसें करावें ? मला लोक काय ह्मणतील ? बाबानें माझ्या अंगीकार करणाऱ्यावर फिर्याद केली, तर तिचा काय परि-

णाम होईल ! कदाचित् पुनः बापाच्या घरीं परत यावें लागलें तर ही आई माझे होतील तितके हाल करील व मला अगदीं वाईट ठिकाणीं देववील. ह्याकरितां दैवावर हवाला ठेवून बाप ज्याला देत आहे त्याशींच लग्न करण्यास कबूल व्हावें. परंतु हा विचार मनांत ठरत आहे इतक्यांत, त्या गोपाळरावाच्या पहिल्या बायकोचे झालेले हाल, त्याची दुर्व्यसनें हीं तिच्या डोळ्यापुढें येऊन उभीं रहात. त्याप्रमाणेंच नारायणरावाचें सुंदर रूप, त्याचें चातुर्य, त्याची आपल्याविषयीं आस्था व त्याला आपण दिलेलें वचन, ह्यांची तिला आठवण होई, त्यामुळें तिचा पहिला बेत सगळा मोडून जाई. असें कितीएक वेळां झालें. शेवटीं काय होईल तें होवो. उजाडण्यापूर्वीं ठरल्याप्रमाणें नारायरावाकडे जावयाचें असा तिनें निश्चय केला. इतक्यांत कोंबडा आरवला. तेव्हां आतां उशीर लावून उपयोगी नाहीं. सकाळीं पुण्याहवाचन व्हावयाचें आहे. तेव्हां आपणास आतां उठवावयास बायका येतील. असा विचार करून ती लागलीच उठली, आणि खोलींतच तोंड धुवून तिनें आपल्या मावशीकडून कांहीं डागिने व चिरगुटें आणिलीं होतीं त्यांचें बोचकें बांधिलें. आपलीं पुस्तकें बरोबर घेतलीं आणि हळूच खोलीचें दार उघडून—'ईश्वरा ! तुजवर सर्व भार ठेवून मी बापाचें घर सोडून आश्रय पाहण्याकरितां चालती होत आहें. ह्यांत माझा कांहीं अन्याय असेल तर त्याचा साक्षी तूं आहेस, आणि सर्वांस बुद्धिदाताही तूंच आहेस' असें ह्मणून खोलीचें दार बाहेरून लावून घेतलें आणि हळूच मागल्या पडवींतून बाहेर पडून नारायणरावाकडे चालती झाली.

तिकडे नारायणरावासही गोदावरीप्रमाणेंच त्या रात्रीस झोंप आली नाहीं. त्याच्या मनांतही तिच्या सारखेच विचार

ओळत होते. त्याला एकदां वाटे कीं, आपण दुसऱ्याच्या मुलीस त्याच्या घरांतून तिच्या आईबापाच्या संमतीवांचून काढून तिला आपल्या घरात आश्रय देऊन आपण तिचा अंगीकार करणें हें चांगलें नाहीं. असें केल्यानें मला लोक काय ह्मणतील? तिच्या बापानें मजवर फिर्याद केल्यास तिचा काय परिणाम होईल? कदाचित् फिर्यादीवरून त्याची मुलगी त्याला परत मिळाली तर एवढी सगळी खटपट व्यर्थ जाऊन आपली फजिती मात्र नफ्या पोटीं रहावयाची ! आणखी ह्या खटपटींत गोदावरीच्या जिवाचीही ओढाताण होईल ह्याकरितां आपण ह्या भानगडींत पडूंच नये. आपल्या नशिबीं असलें तर आपणास चांगली बायको मिळेल व लग्नही होईल! असें एकदां वाटे. परंतु हा विचार होत आहे इतक्यांत गोदावरी सारखी अनाथ मुलगी त्या गोपाळरावाच्या पदरीं पडली तर तिची कशी दुर्दशा होईल व तिला किती दुःख भोगावें लागेल, ह्या गोष्टी मनांत येऊन त्याला फार वाईट वाटे, व त्याच वेळेस—तिची सुंदर व मनोरम मूर्ति, तिचें तारुण्य, तिची विद्या, तिचे सद्गुण, तिची आपल्या वरील निष्ठा व तिला आपण दिलेला विश्वास, हीं येऊन त्याच्या डोळ्यांपुढें उभीं रहात. असें कितीएक वेळां झालें, अखेरीस काय होईल तें होवो, परंतु गोदावरीचा अंगीकार करावयाचा, असा त्यानें निश्चय केला. वर सांगितल्याप्रमाणें त्याच्या मनांत विचारांची भानगड चालत असल्यामुळें त्या रात्रीं त्याला झोंप मुळींच आली नाहीं. तो गोदावरी त्याजकडे येईपर्यंत हांथरुणावर जागाच होता. गोदावरी खालीं दाराजवळ येऊन तिनें आपल्या कांपत असलेल्या हातानें हळूच दारावर थाप मारिली. ती ऐकून तो लागलाच माडीवरून खालीं गेला आणि त्यानें दार उघडून तिला माडीवर नेलें आणि तिला ह्मणाला—' तूं कांहीं काळजी करूं नको. स्वस्थ

मनानें अस. थोडक्याच दिवसांत सर्व गडबड शांत होईल. मग पुढचा विचार करूं ह्मणजे झालें. आतां पाहिजे तर तोंडबिंड धू, आणि तुला रात्रीस झोंप लागली नसेल ह्याकरितां बिछाना घालून देतों त्यावर जरा अंग टाक. आपले डागिने असतील ते अंगावर घाल, आणि सरकारी कामगार कोणी विचारावयास आला तरी त्याला–'मला माझा बाप, मला आवडत नाहीं अशा ठिकाणीं देत होता, तशा ठिकाणीं न देण्याविषयीं मीं त्याला सांगितलें असतां त्यानें पैशाच्या लोभानें तें ऐकिलें नाहीं, व माझ्या इच्छेविरुद्ध माझें लग्न करण्याचा त्यानें बेत केला. त्याचा बेत पैसे घेऊन मला कोणास तरी द्यावयाची, असा असल्यामुळें मला माझें मनाप्रमाणें चांगलें स्थळ मिळण्याचा संभव नाहीं. मी आतां उपवर आहें. मला, लग्न ह्मणजे काय वगैरे गोष्टी चांगल्या समजत आहेत, तेव्हां आपल्या मर्जीप्रमाणें योग्य वर पाहून लग्न करावें अशी माझी इच्छा आहे. ही इच्छा बापाच्या घरीं राहिल्यानें कधीं शेवटास जाणार नाहीं. ह्याकरितां त्याच्या प्रतिबंधांतून सुटावें ह्मणून मी ह्यांजकडे (मजकडे) आश्रय मागावयास आलें. तो ह्यांनीं दिला. मला फुस लावून आणिलें नाहीं.' तुझ्या अंगावरील डागिने वस्त्रें ह्यांविषयीं विचारिल्यास त्यांची खरी हकीकत आहे तीच सांगावयाची ? समजलीस ? नीट ध्यानांत धर. विसरूं नको. ह्यांत खोटें असें कांहीं सांगावयाचें नाहींच. फक्त तूं घाबरशील ह्मणून तुला सांगून ठेविलें.

असें तिला सांगून तो आपला मित्र वकील याजकडे गेला आणि त्याला सर्व हकीकत कळविली. आणि आतां सकाळीं कोणी तिचा शोध करण्यास सरकारचे शिपाई वगैरे येतील ह्याकरितां तुह्मी सात वाजतां मजकडे या. तुह्मी येथें असलां ह्मणजे बरें पडेल, असेंही त्यांस सांगितलें,

आणि परत घरीं येऊन शौचमुखमार्जनादि कृत्यें आटोपून पुढें काय होतें त्याची वाट पाहत बसला. उजाडल्यावर त्याचा मित्रही त्याजकडे आला तेव्हां ते दोघे गोष्टी सांगत बसले.

---

## भाग ६ वा.

त्र्यंबकभटाकडे सकाळीं पुण्याहवाचन व्हावयाचें, ह्मणून घरांतील सर्व लहान मोठ्या बायका चार वाजतां उठल्या. कोणी वेणीफणी करणें, कोणी भाज्या चिरणें, कोणी झांडलोट करणें, कोणी मुंडावळ्या तयार करणें, कोणी अंगाला लावण्यास तेल हळद तयार करणें हीं कामें करूं लागल्या. कोणी घाणा भरण्यास गोदावरी पाहिजे व तिला नहावयास घातलें पाहिजे ह्मणून तिला उठवावयास गेल्या. त्यांनीं तिच्या खोलीबाहेरून तिला हाका मारिल्या. त्यांतील एकजण ह्मणाली:–कायग गोदू, तुला आज इतकी नीज कोठून आली आहे ? अग सगळ्या बायका पोरी मोरी सुद्धां उठल्या तरी तूं आपली निजलेलीच ! एव्हां इतकी झोंप, मग उद्यां लग्न होऊन श्रीमंताची बायको झालीस ह्मणजे सकाळीं उठण्याला बारा वाजवयाचे ! ऊठ लौकर ! चल तुझ्या अंगाला लावूं दे ! आतां घाणा भरण्यास बायका येतील, ऊठ ! असें ह्मणून तिनें खोलीचें दार खडखड ख-

डखड हालविलें तरी आंतून गोदावरी कांहीं बोलत नाहीं असें पाहून त्यांतील एकजण दिवा घेऊन आली आणि पहाते तों खोलीच्या दाराला बाहेरून कडी आहे. तेव्हां ती कोठें * * से वगैरे गेली असेल असें समजून त्या परत गेल्या. बराच वेळ झाला तरी गोदावरी येत नाहीं असें पाहून तिची सावत्र आई मोठमोठ्यानें तिला हाका मारूं लागली. तरी ती हांक देत नाहीं असें पाहून ती हातांत दिवा घेऊन जळफळतच तिच्या खोलीजवळ गेली आणि दाराची कडी काढून खाडकन् दार उघडिलें. पण आंत काय आहे! गोदावरीचें हांथरून, तिची उघडी पेटी, एक समई व पाण्याचे दोन तांब्ये, ह्यांशिवाय कांहीं नाहीं! तिचें लुगड्यांचें बोचकें, तिचा डागिन्याचा डबा, तिचीं बुकें ह्यांपैकीं तेथें कांहींच नव्हतें. हें पाहून ती घाबरली आणि तिनें दुसऱ्या बायकांस हांका मारून तें सांगितलें. इतक्यांत ही गडबड ऐकून त्र्यंबकभटही आपल्या घरीं लग्नाकरितां आलेल्या एका मनुष्यास घेऊन तेथें आला. त्यानें जेव्हां गोदावरी नाहींशी झाल्याचें ऐकिलें तेव्हां त्याच्या पोटांतही धस्स झालें. इतक्यांत तेथें जमलेल्या मनुष्यांत कुजबूज सुरू झाली. कोणी ह्मणे ती कोठें लपून बसली असेल, कोणी ह्मणे तिला देऊं केलें होतें तें ठिकाण तिच्या मनास येत नव्हतें ह्मणून ती पळून गेली असेल, कोणी ह्मणे त्याकरितां तिनें जीव दिला असेल, कोणी ह्मणे ती आतां मोठी मुलगी झाली होती व सुंदरही होती त्यामुळें तिला कोणी फुसलावून काढून नेली असेल, इत्यादि प्रकारांनीं ज्यांला जसें वाटेल तसें ते बोलूं लागले. त्र्यंबकभटही घाबरून ह्मणाला, पोरीला झालें तरी काय? ती कोठें निघून गेली, कीं तिनें विहिरींत जीव दिला, कीं तिला कोणी फसवून नेलें? आतां तिला पहावें तरी कोठें? त्यानें दोन

गडी आसपासच्या विहिरी शोधण्यास पाठविले व दोन मनुष्य इकडे तिकडे कोणाच्या घरीं शोध करण्यास पाठविले व आपण स्वतः रामभाऊकडे गेला आणि त्याला सर्व वर्तमान सांगितलें. तें ऐकून त्यालाही मोठा अचंबा वाटला, व आतां गोदावरी आपणाला लाभत नाहीं असेंही त्याच्या मनांत आलें. परंतु ही वेळ चुरचुरत बसण्याची नव्हे, होईल तितकी त्वरा करून तिचा शोध लाविला पाहिजे, असा विचार करून, तो त्र्यंबकभटास बरोबर घेऊन लागलाच गोपाळरावाकडे गेला. तेथेंही लग्नाकरितां जमलेल्या मनुष्यांची गडबड चाललीच होती. गोपाळराव माडीवर बसले होते, तेथें रामभाऊ त्र्यंबकभटास घेऊन गेला आणि दुसऱ्या तिसऱ्या कांहीं गोष्टी न काढतां, झालेली सर्व हकीकत सांगितली व आणखी ह्या कामांत पोलीसची मदत लवकर मिळेल तर गोदावरी हातची जाणार नाहीं. नाहींतर ती गेल्यासारखीच आहे. ह्याकरितां लवकर फौजदारास चिठ्ठी देण्याची तजवीज करा, असेंही सांगितलें. तेव्हा गोपाळरावास जरी तें गोदावरीचें वर्तमान ऐकून वाईट वाटलें होतें, तरी त्यानें लागलींच फौजदारास 'ह्या कामांत होईल तितकी मेहनत करून तिला शोधून काढावी' अशा मतलबाची चिठ्ठी लिहून रामभाऊपाशीं दिली. तेव्हां लागलाच तो व त्र्यंबकभट हे फौजदाराकडे गेले, व त्याला सर्व हकीकत सांगून ती चिठ्ठीही दिली. त्यानें ती पाहिल्याबरोबर दोन शिपाई व एक नाईक त्यांजबरोबर घरोघर तिचा शोध करण्याकरितां पाठविले, व चार शिपाई गांवांतून बाहेर जाणाऱ्या मोठ्या रस्त्यांच्या नाक्यांवर पाठविले. ह्मणजे कोणी कदाचित् तिला पळवून नेत असला तर तो सांपडावा. हीं इतकी खटपट होईपर्यंत उजाडलें. तेव्हां त्र्यंबकभट, रामभाऊ, दुसरे दोन गृहस्थ, पोलीसचा नाईक व शिपाई, हे

सगळे लटांबरच्या लटांबर त्र्यंबकभटाच्या आळींतील प्रत्येक घरीं गोदावरी कोणास आढळली आहे काय, किंवा तिला कोणी लपवून ठेविली किंवा ठेविल्याची कोणास माहिती आहे काय इत्यादि प्रकारें तपास करीत चालले. तपास करीत करीत ते सगळेजण सरासरी साडेसात आठ वाजण्याच्या सुमारास नारायणरावाच्या घरीं आले, व तेथेंही त्यांनीं पूर्वींप्रमाणें तिजविषयीं त्याला विचारिलें.

**नारायणराव**—गोदावरी, ह्या भटजींची मुलगी मला माहीत आहे. तिचा बाप तिच्या खुषीविरुद्ध तिचें लग्न करणार होता व हा तिजवर जुलूम होत होता; तो टाळावा व आपल्या मनाप्रमाणें योग्य वर पाहून लग्न करावें, व तसें करण्यास बापाकडे राहिलें असतां तो प्रतिबंध करील, तो न व्हावा ह्मणून ती त्याजकडून निघून मजकडे आश्रय मागावयास आली. मींही तिची हकीकत ऐकून घेऊन ती योग्य दिसल्यावरून तिला आपले घरांत आश्रय दिला आहे. ह्या गोष्टीला तीन चार तास झाले. ती हल्लीं माझे घरांत आहे. तिला मीं पळवून किंवा फुसलावून आणिलें नाहीं.

नारायणरावाचें हें बोलणें ऐकून सर्वजण थक्क झाले व कांहीं वेळ एकमेकांच्या तोंडाकडे पहात राहिले. त्र्यंबकभट तर रागानें ला ग होऊन थरथर कांपूं लागला व रामभाऊसही राग आला.

**त्र्यंबकभट**—अरे नाऱ्या, गुलामा तुला हे लांब कान फुटले वाटतें? अरे लोक तुला शास्त्रीबोवांचा मुलगा, चांगला शिकलेला, ह्मणून नांवाजतात, आणि तुझीं हीं अशीं कर्मे ! लोकांच्या मुलीस फुसलावून त्यांच्या अंगावरील डागिन्यांसुद्धां त्यांच्या बापाच्या घरांतून बाहेर काढावयाच्या, हे धंदे कधींपासून शिकलास? चोर कोठचा! चोर तर चोर आणि शिरजोर! लबाडी करून संवरून पुनः लांब लांब उत्तरें सां-

गण्याला तयार! हरामखोरा! दम खा आतां तुजवर फिर्याद करून तुझी खोड तोडून टाकतों! अहाहा! भडव्या थुः तुझ्या तोंडावर; चल कोठें आहे ती पोर? कर आमच्या स्वाधीन, नाहींतर मला सांग, मी तिचा हात धरून तिला घेऊन जातों! लहान पोरींना कांहीं समजत नसतें. त्यांना तुझ्यासारखे लबाड फसविणारे मिळाले ह्मणजे त्या फसतात. कायहो नाईक! हा गुलाम मुलगी व तिचे डागिने चोरून आणणारा गुन्हेगार नाहीं का होत? मग बांधाना ह्यांच्या मुसक्या! करा एकदा चतुर्भुज!

नाईक व शिपाई ह्यांस रामभाऊकडून पैसे वगैरे मिळण्याची आशा होती, त्यामुळें त्यांनीं कांहीं कमजास्त धाकदपट केली असती, परंतु नारायणराव हा सरकारी नोकर व सभ्य गृहस्थ पडला त्यामुळें त्यांच्यानें तसें कांहीं करवेना! शिवाय त्याचा मित्र वकीलही तेथेंच होता त्यामुळें पोलीसचे लोक एक शब्दही कमजास्त बोलले नाहींत.

**नारायणराव**—पोलीसचे लोक हे अपराधी लोकांस पकडण्यासाठीं व त्यांच्या मुसक्या बांधण्यासाठीं सरकारानें नेमिले आहेत. निरपराध्यांस पकडावें किंवा त्यांच्या मुसक्या बांधाव्या हें त्यांचें काम नव्हे. ( त्र्यंबकभटास )भटजी, आपली जीभ आपल्या स्वाधीन रहात नसली तर तिला कांसाची लगाम घालून स्वाधीन ठेवावी! ती फार मोकळी सुटत चालली आहे! आपल्याना काय बोलावयाचें असेल तें सोईनें बोलावें. ईश्वरानें आपणास तोंड दिलें आहे, तें घाणेरडे शब्द उच्चारण्यासाठीं दिलें नाहीं. तुमच्या शब्दांसारखे शब्द मला तुह्माला उलट बोलतां येत नाहींत असें नाहीं. परंतु तसे घाणेरडे शब्द तोंडांतून काढून तोंड विटाळणें हें माझें शील नव्हे, तुह्मी वडील समजून तुमची बडबड एक वेळ ऐकून घेतली आहे; पुनः अशी बडबड कराल तर तुमचें

तोंड बंद करण्यास पोलीसचे लोक जवळ आहेतच! मी तुह्माला आणखी एकदां सांगतों कीं, तुमच्या मुलीस तुमचे घरांतून मीं फुसलावून काढून आणिलें नाहीं व तिचे डागिनेही मीं घेतले नाहींत. ते तिच्या अंगावरच आहेत. आतां तिला तुह्मी हांक मारा. तिला काय पाहिजे तें सांगा आणि गेली तर घेऊन जा. त्याला माझी कांहीं हरकत नाहीं. परंतु जर ती जाण्यास खुशी नसेल, आणि तुह्मी बळजबरीनें तिला नेण्याचा प्रयत्न कराल, तर तसें मी करूं देणार नाहीं. आपल्याना पाहिजे तर मोठा रस्ता खुला आहे.

**त्र्यंबकभट**–वाहवारे ब्रह्मज्ञानी!

**नाईक**–( मध्येंच ) भटजी, तुह्माला जास्ती बोलण्याची गरज नाहीं. तुमच्या मुलीचा डागिन्यांसुद्धां ठिकाण लागला आहे. ' ती आपल्या घरांत आहे. ती होऊन आश्रय मागावयास आल्यावरून मीं आश्रय दिला असें **नारायण**राव कबूल करतात.' त्यावरून त्यांनीं चोरी केली किंवा तुमच्या मुलीस फितविली किंवा फसविली असें दिसत नाहीं. आतां तिला ह्यांनीं प्रतिबंधांत ठेविलें आहे कीं काय, हें पहावयाचें असल्यास तुह्मी तिला हाक मारा व विचारा ह्मणजे काय असेल तें समजेल.

**त्र्यंबकभटानें** गोदावरीस हांक मारिली, तेव्हां ती माडीवरील रस्त्याकडील खिडकींत येऊन उभी राहिली.

**त्र्यंबकभट**-(खालून) **गोदे** तुला या **नारायणानें** गोड गोड थापा दिल्यावरून तूं त्याच्या थापांवर विश्वास ठेवून त्याच्या भरीं भरून घरांतून निघून आली असशील. असो, झालें तें झालें. तुझी पोरबुद्धि आहे त्यामुळें तुझ्या हातून अज्ञानानें झालेल्या गोष्टींचा मी राग मानीत नाहीं. मी हल्लीं तुला देत आहें तें घर तुला आवडत नसलें तर दुसरें

चांगलें तुझ्या मनाजोगतें वर पाहून तेथें मी तुला देईन. तर चल घरीं आतां, खालीं ये कशी.

**गोदावरी**--( माडीवरून ) तुह्मी मला चांगलें स्थळ पाहून द्याल कीं नाहीं ह्याविषयीं माझी पक्की खातरी झालेली आहे. तुह्मी ह्मणतां तशी ह्यांनीं मला फुसलावून आणिली नाहीं. मी होऊन तुमच्या व आईच्या प्रतिबंधांतून सुटावें ह्मणून ह्यांच्यापाशीं आश्रय मागावयास आलें. ह्यांनीं कृपा करून मला आश्रय दिला. मी आतां सज्ञान आहें, ह्याकरितां मी आपल्या मनाप्रमाणें व परमेश्वर बुद्धि देईल त्याप्रमाणें वर पाहून त्याला माळ घालणार. मी आतां जिवंत आहें तोंपर्यंत घरीं येणार नाहीं. घरचें सुख मला पुरेसें झालें आहे! आतां मजपाशीं जे लहानसहान डागिने आहेत, त्याविषयीं तुह्मी कांहीं ह्मणाल, तर ते मला मावशीनेंच दिलेले आहेत. व दोन मोठमोठ्या साड्या आहेत त्या मला मी मुलींच्या शाळेंत असतां बक्षिस मिळालेल्या आहेत. ह्याकरितां त्यांजवरही माझीच सत्ता आहे. त्या मी तुह्मांला देणार नाहीं.

गोदावरीचें हें भाषण ऐकून त्र्यंबकभटास फार राग आला व दुःखही झालें. मुलगी आपल्या हातची गेली व तिच्याबद्दल पदरांत घेतलेली रक्कमही परत द्यावी लागणार, हें मनांत येऊन त्याला कांहीं सुचेनासें झालें. त्याचें अंग कांपूं लागलें. अंगास घाम सुटला. तें पाहून रामभाऊनें पोलीसच्या लोकांस परत जाण्यास सांगून आपण त्र्यंबकभटास घेऊन त्याच्या घरीं गेला. त्याला जरा स्वस्थ निजविलें. त्याच्या डोळ्यास पाणी लावून वारा घालून त्याला सावध केलें. तो सावध झाल्यावर रामभाऊ त्याला ह्मणालाः—भटजी तुह्मी तुमच्या मुलीविषयीं कांहीं काळजी करूं नका. मी गोपाळरावांस ही सर्व हकीकत सांगून त्यां-

जकडून कांहीं तजवीज करवून तुमची मुलगी तुह्मास मिळे असें करितों, मी आतां त्यांना इकडेसच घेऊन येतों.

ह्याप्रमाणें त्र्यंबकभटाचें समाधान करून रामभाऊ तसाच गोपाळरावाकडे गेला आणि त्याला झालेली सर्व हकीकत सांगितली. परंतु 'तिला तुमचें घर आवडत नाहीं ह्मणून तिनें असें केलें' असें मात्र सांगितलें नाहीं. 'नारायणरावानें तिला फुसलावून व थापा देऊन तिच्या बापाच्या घरांतून काढून नेली आहे. ती बापाच्या घरीं परत येण्याचें नाकबूल करिते, जबरीनें आणूं ह्मटलें तर नारायणराव तसें करण्यास प्रतिबंध करितो' अशा प्रकारची हकीकत मात्र त्यानें गोपाळरावास कळविली. व "त्र्यंबकभटाकडून येथील दुसऱ्या वर्गाच्या माजिस्त्रेटकडे नारायणरावावर ह्याबद्दल फिर्याद करवावी, व आपण माजिस्त्रेटास सांगून ठेवावें, ह्मणजे तो आपल्याला पाहिजे तसा न्याय करून तिला तिच्या बापाच्या स्वाधीन करील. त्याला मुलगी परत मिळाली ह्मणजे आपलें काम झालेंच. परत मिळेल त्याच दिवशीं मुहूर्त नसला तरी कसा तरी शास्त्रार्थ काढून लग्न लावून घ्यावें" असेंही सुचविलें.

गोदावरी घरांतून निघून गेल्याचें वर्तमान ऐकून गोपाळरावाचें मन कांहींसें उदास झालें होतें, व ती आपणांस मिळत नाहीं असेंही त्यांस वाटूं लागलें होतें. परंतु रामभाऊनें त्याला उत्तेजन देऊन 'आपण जरा मेहनत केली असतां चार पांच दिवसांतच गोदावरीबरोबर सुखसोहळा भोगण्यास मिळेल' अशी त्याला गोड आशा दाखविल्यामुळें तो त्याचे बोलण्यास कबूल झाला. तेव्हां रामभाऊ त्याला बरोबर घेऊन त्र्यंबकभटाकडे गेला. आणि त्याला असें सांगितलें कीं, "तुह्मी येथील दुसऱ्या वर्गाच्या माजिस्त्रेटाकडे, नारायणरावावर अशी फिर्याद करा कीं, 'माझी

मुलगी नारायणरावानें फुसलावून माझ्या घरांतून माझ्या संमतीवांचून तिच्या डागिन्यांसुद्धां वाईट हेतूनें काढून नेली. तर याविषयीं चौकशी होऊन गुन्हेगारास कायद्याप्रमाणें शिक्षा व्हावी व माझी मुलगी अज्ञान आहे सबब ती माझ्या ताब्यांत मिळावी.' तुह्मीं अशी फिर्याद केली ह्मणजे सर्व काम होईल. माजिस्त्रेट हे रावसाहेबांचे जिवश्च कंठश्च स्नेही आहेत. रावसाहेब त्यांना तुमच्या तर्फे कज्याचा निकाल करण्याविषयीं सांगणार आहेत. असें केलें ह्मणजे तुमची मुलगी तुह्मास परत मिळेल, त्या तिच्या अपहारकाला शिक्षा होईल. त्याला शिक्षा मिळाली ह्मणजे त्याची नोकरीही जाईल ! मग बस ह्मणावें हांका मारीत ! "

रामभाऊनें सांगितल्याप्रमाणें त्र्यंबकभटानें फिर्याद केली. तो कज्जा चालविण्याकरितां गोपाळरावानें त्याला एक वकीलही करून दिला, व आपण स्वतः जाऊन मोठ्या आग्रहानें—'ह्या फिर्यादीचा निकाल भटजीच्या तर्फे झालाच पाहिजे'—असें त्या माजिस्त्रेटास सांगितलें. त्या माजिस्त्रेटानें ह्याजपासून शेंकडों रुपये खाल्ले असल्यामुळें त्यानें ह्याच्या सांगण्याप्रमाणें निकाल करण्याचें कबूल केलें.

त्र्यबकभटानें तेथील दुसऱ्या वर्गाच्या माजिस्त्रेटाकडे पूर्वी सांगिल्याप्रमाणें फिर्याद दिली व त्यावरून त्या माजिस्त्रेटाकडून नारायणराव व गोदावरी ह्यांस नेमलेल्या तारखेस दुसऱ्या वर्गाच्या माजिस्त्रेटाकडे हजर होण्याविषयीं समन्सें लागलीं. ह्या माजिस्त्रेटपुढें आपल्याविरुद्ध कज्जा चालणार हें पाहून नारायणरावास मोठी काळजी पडली. कारण तो माजिस्त्रेट त्या जिल्ह्याच्या कलेक्टरचा चिटणीस होता, तेव्हांपासून त्यानें ह्या गोपाळरावाच्या बापापासून जंगलाच्या वगैरे खटल्यांत हजारों रुपये खाल्ले होते. हल्लींही गोपाळरावाकडून त्याला वर्षांतून चार पांचशें रुपये मि-

ळत असत. तेव्हां त्याच्यापुढें हा कज्जा चालला तर तो त्यांत होईल तितकें करून आपला नाश करील, असें नारायणरावास पक्कें माहित होतें. त्याकरितां त्यानें आपल्या मित्राच्या मसलतीनें त्या जिल्ह्याच्या मुख्य माजिस्त्रेटाकडे असा अर्ज केला कीं, " वसई येथील दुसऱ्या वर्गाच्या माजिस्त्रेटकडे माझ्याविरुद्ध येथील राहणारा त्र्यंबकभट यानें ' माझी मुलगी नारायणराव ( मी ) यानें वाईट हेतूनें फितवून तिच्या अंगावरील डागिने व वस्त्रें सुद्धां माझ्या घरांतून काढून नेऊन आपल्या घरांत ठेविली आहे तर. याविषयीं चौकशी होऊन माझी मुलगी मला परत मिळावी व गुन्हेगारास कायद्याप्रमाणें शिक्षा व्हावी ' अशी तारीख * * माहे * * * ची फिर्याद केली आहे. त्या मुलीचें लग्न व्हावयाचें आहे. ती उपवर व समंजस आहे. आपल्या मनाप्रमाणें योग्य वर पाहून लग्न करावें अशी तिची इच्छा आहे. तिचा बाप तिच्या इच्छेविरुद्ध तिचें तिला न आवडणाऱ्या मनुष्याशीं लग्न करण्याचा विचार करीत आहे. हा जुलूम टाळावा ह्मणून ती आपल्या बापाकडून निघून मजकडे आश्रय मागावयास आली, व मीं तिला आश्रय दिला अशी हकीकत आहे. येथील दुसऱ्या वर्गाचे माजिस्त्रेट हे जातीनें ब्राह्मण असून जुन्या समजुतीचे आहेत. त्यामुळें ' मुलीनें आपल्या इच्छेप्रमाणें वर पाहून लग्न करणें, व तिला तसें करतां यावें ह्मणून तिला आश्रय देणें ' ह्या गोष्टी त्यांच्या मनाला वाईट वाटणाऱ्या आहेत. शिवाय त्या मुलीस तिच्या बापानें ज्याला देऊं केलें होतें, त्या गृहस्थाचा आणि मशारनिल्हे माजिस्त्रेट ह्यांचा फार स्नेह आहे. व मागें हे माजिस्त्रेट मामलेदार या नात्यानें, व मी येथील शाळेचा हेडमास्तर या नात्यानें आह्मां दोघांमध्यें प्रकरण चाललें होतें, त्यावरून त्यांचा व माझा बेबनाव झालेला

आहे. ह्या सर्व कारणांवरून येथील माजिस्त्रेटचें मन सर्व प्रकारें माझ्या विरुद्ध आहे, व ते हल्लीं त्या मुलीच्या बापास ह्मणजे फिर्यादीस पुरावा वगैरे जमविण्याचे कामीं मदत करीत आहेत, ह्याविषयीं मी पुरावा करून शाबीद करीन. ह्याकरितां सदरहू खटला येथील माजिस्त्रेटकडे न ठेवितां तो आपणाकडे किंवा इतर हिंदु शिवाय करून कोणत्याही जातीच्या माजिस्त्रेटकडे देण्याची मेहेरबानीनें तजवीज व्हावी."

वर सांगितलेला अर्ज जिल्ह्याच्या मुख्य माजिस्त्रेटानें पाहून तो अर्जास मान्य झाला, व त्यानें तो खटला वसई प्रांताच्या पहिल्या वर्गाच्या माजिस्त्रेटकडे दिला. तो जातीचा यूरोपियन होता. नेमलेल्या तारखेस तो खटला त्या माजिस्त्रेटपुढें उभा राहिला. आपला स्नेही माजिस्त्रेट याजकडून दुसऱ्याकडे—त्यांतही जो आपला मिंधा झालेला नाहीं—अशाकडे खटला गेला हें पाहून, गोपळाराव, रामभाऊ व त्र्यंबकभट ह्यांचें धैर्य खचलें. तथापि जरी ह्या खटल्यांत नारायणरावास शिक्षा झाली नाहीं तरी गोदावरी त्र्यंबकटाच्या ताब्यांत मिळेल अशी त्यांना आशा होती. कज्जा उभा राहिल्यावर वादीच्या वकिलानें आपलें ह्मणणें माजिस्त्रेटास समजाविलें. नंतर त्र्यंबकभटाची जबानी झाली तींत त्यानें अर्जांत लिहिल्याप्रमाणें लिहून दिलें. गोदावरीनें ज्याप्रमाणें पोलीसच्या लोकांसमक्ष मजकूर सांगितला होता त्याप्रमाणेंच येथेंही सांगितला. नारायणरावानेंही आपल्या जबानींत पोलिसासमोर जसें सांगितलें होतें तसेंच सांगितलें. सर्वांच्या जबान्या झाल्यावर माजिस्त्रेटानें नारायणरावावर कोणत्याही प्रकारें गुन्हा लागू होत नाहीं ह्मणून त्यास सोडून दिलें. गोदावरी ही उपवर व सज्ञान आहे असें नजरेस आल्यावरून तिच्या इच्छेस येईल तेथें राहून आपल्या मनाप्रमाणें वर पाहून लग्न करण्याची तिला परवानगी दिली

त्र्यंबकभटास मुलीच्या खुषीविरुद्ध तिचे पैसे घेऊन लग्न करण्याचा विचार केल्यावरून दोष दिला, व लहानपणीं, वधुवरांची संमति न घेतां लग्न करण्याच्या चालीबद्दल दोन शब्द बोलून खटल्याचा निकाल केला.

कज्याचा निकाल झाल्यावर नारायणराव गोदावरीसह आनंदित होऊन तिला घेऊन आपले घरीं गेला. त्र्यंबकभटानें माजिस्त्रेटच्या तोंडचा शेवटचा हुकूम ऐकिल्यावर तो मूर्छित पडण्याच्या बेतांत आला होता, इतक्यांत रामभाऊनें त्याला गाडींत घालून त्याच्या घरीं पोंचविलें. तो घरीं गेल्यावर फार शोक करूं लागला. तो ह्मणालाः—ह्या मुलीनें गांवांत माझी फजिती केली ! मुलगी परी मुलगीही गेली ! ती गेल्यामुळें सातशें रुपयांची रकम बुडाली. आतां गोपाळरावापासून घेतलेले रुपये त्याचे त्याला परत दिले पाहिजेत. त्यांतील बहुतेक रुपये तर घरांत नथ व इतर बारीक सारीक डागिने करण्यांत खर्च झाले आहेत व कांहीं लग्नाची तयारी करण्यांत खर्च झाले. आतां रुपये परत देणें ह्मणजे निवळ पेटींतून शिलकेपैकीं दिले पाहिजेत. शिवाय रामभाऊनें दोन साक्षीनिशीं बाराशें रुपये मला दिले आहेत. परंतु त्यांपैकीं त्यानें साडेचारशें रुपये परत नेले ह्या गोष्टीला साक्षी कोणी नाहीं. तो तर लफंगा दिसत आहे. कदाचित् घेतलेले रुपये नाकबूल गेला तर बाराशें रुपये भरून देण्याचें माझ्या बोकांडीस बसेल; हाय हाय ! माझी मुलगी गेली ! पोरी तुला कशी ही बुद्धि आठवली ! कारट्ये ! मला बुडविलेंसग बुडविलेंस ! ! ह्या प्रकारें तो शोक करीत राहिला. त्यानें गोपाळरावाचे रुपये परत देण्याची कांहींच तजवीज केली नाहीं.

रामभाऊ त्र्यंबकभटास त्याच्या घरीं पोंचवून आपल्या घरीं गेला. त्याला त्या खटल्याच्या अशा निकालापासून

फारच वाईट वाटलें, व मोठी काळजी पडली. त्याला इतके दिवस गोदावरी आपणास खचित मिळेल अशी फार आशा होती; व मुहूर्त निश्चय झाला तेव्हांपासून तर तो आपलें काम झालेंच असें समजत होता. त्याला त्या लग्नाच्या खटपटींत रक्कमही बरीच मिळाली होती. तींतून त्यानें कांहीं पैसे खर्च करून आपला पोषाख वगैरे छानदार केला होता, व कांहीं पैसे दुसऱ्या रीतीनेंही चैनबाजींत उडविले होते. त्यामुळें त्याला ह्या निकालाच्या योगानें अर्थातच फार वाईट वाटलें. गोदावरी हातची गेली. शिवाय त्याचा स्नेही गोपाळराव ज्याच्या जिवावर त्याच्या सर्व चैनी चालत होत्या— त्याच्याशीं कपट करून जी रक्कम त्यानें खाल्ली होती व तिजपैकीं त्यानें कांहीं खर्चही केली होती—तीही भरून देण्याचा प्रसंग येणार. आणखी ही लबाडी गोपाळरावास समजली तर त्याचा जन्माचा स्नेहसंबंध तुटून त्याशीं वांकडें येणार. ह्या गोष्टी मनांत येऊन त्याला मोठी काळजी पडली. ह्या विवंचनेंत असतां त्याला विचार सुचला आणि तो आपणाशींच ह्मणाला:–' आपण त्र्यंबकभटापासून साडेचारशें रुपये घेतले ह्याला साक्षी कोणी नाहीं. त्याला आपण बाराशें रुपये दिले त्याला मात्र साक्षी आहेत. तेव्हां गोपाळरावानें त्र्यंबकभटाजवळ रुपये परत मागितले ह्मणजे ते त्याला दिलेच पाहिजेत. कदाचित् तो भट आपणाजवळ साडेचारशें रुपये मागेल, तर तो गोपाळरावजींचे रुपये परत करीपर्यंत आपण त्याला भेटूंच नये. पण तो ह्मातारा माझ्या दाराजवळ येऊन रुपयांसाठीं त्रागा करूं लागला, किंवा त्यानें गोपाळरावास खरी हकीकत सांगितली, तर पंचाइत पडेल. आपल्या दाराजवळ आला तर त्याचा आपण बंदोबस्त करूं. पण गोपाळरावाकडे जाऊन जर त्यानें डोकेंफोड करून त्यांना ही हकीकत सांगितली, तर जरी

त्यांचा व माझा उत्तम स्नेह आहे, तरी त्या भटाच्या कटकटीपासून कदाचित् त्यांच्या मनांत मजविषयीं संशय येईल; आणि तसें झालें तर त्यांचा आपला स्नेह तुटेल. तसें तर होतां कामा नये. ह्याकरितां आपण 'अस्वला आधीं किकाळी ठोकावी' ह्मणजे गोपाळरावजींस असें सांगावें कीं, मी त्र्यंबकभटाजवळ रुपये परत मागावयास गेलों; परंतु तो लोभी ब्राह्मण रुपये देण्यास तक्रार करितो व भलतींच कुभांडें रचण्यास तयार होतो. असे त्याच्या मनांत एकदां पक्के भरून दिलें ह्मणजे पैशांविषयीं ह्मणून भीति बाळगावयास नको. असा विचार करून संध्याकाळचे वेळीं तो गोपाळरावाकडे गेला. आपण केलेली सर्व खटपट व्यर्थ गेली, गोदावरीही मिळाली नाहीं ह्यामुळें गोपाळराव खिन्न होऊन बसले आहेत इतक्यांत रामभाऊ तेथें गेला.

**गोपाळराव**—या रामभाऊ!

**रामभाऊ**—कां रावसाहेब! उगाच एकटेचसे बसलां आहां?

**गोपाळराव**—एकटा बसूं नको तर काय करूं? दुकटा होण्यासाठीं एवढी खटपट केली होती, पण त्या कामांत थोडे बहुत पैसे जाऊन दुसरा तर कांहीं लाभ झाला नाहीं. खटपट आणि त्रास हीं मात्र पदरांत पडलीं! आमचें नशीबच तसें! ती आह्माला कोठची मिळणार!

**रामभाऊ**—वाहवा रावसाहेब! तुह्मी तर अगदीं हात पायच गाळतां! अहो, तुह्माला तिजपासून इष्ट सुख प्राप्त होण्याला, तुमचें तिचें अगदीं सगळे शिष्टाचार व सोहळे होऊन लग्नच कां झालें पाहिजे? नाहींतर नाहीं कां तुह्माला इच्छित सुख प्राप्त होणार? आतां तशा थाटानें लग्न झालें असतें तर चांगलेंच. परंतु ज्यापेक्षां तें झालें नाहीं त्यापेक्षां आतां त्याविषयीं मनांत आणून कांहीं उपयोग

नाहीं. कोणीकडून तरी तिचा आपल्यांना पाहिजे त्या प्रकारचा समागम झाला ह्मणजे झालें! तसा होण्याला तिचें आपल्याशीं लग्नच झालें पाहिजे असें कांहीं नाहीं. आणखी मी ह्मणतों लग्न झालें नाहीं तें तरी एक पक्षीं चांगलेंच झालें! कारण तें एकदां झालें असतें ह्मणजे जन्मपर्यंत पायांत बेडी पडली असती! आपल्या सारख्यांना तर कोणत्याही वस्तूच्या नवीन बाहाराचा मात्र उपभोग घेण्याची संवय! त्यामुळें एकदां वस्तूचा तो बाहार गेला ह्मणजे तिचा कंटाळा येतो व तिचें ओझें वाटूं लागतें. तसेंच लग्न झाल्यामुळें झालें असतें. आतां झालें नाहीं हें उत्तम झालें असें मी ह्मणत नाहीं. परंतु न झालें तरी फारसें वाईट वाटण्याचें कांहीं कारण नाहीं. कोणीकडून तरी तिचा व आपला कांहीं दिवस सहवास घडला ह्मणजे झालें.

गोपाळराव—रामभाऊ, तूं ह्मणतोस कोणत्याही वस्तूचा नवीन बाहार गेला ह्मणजे तिचा कंटाळा येतो, ही गोष्ट खरी आहे. तथापि ह्या गोदावरीला ती गोष्ट लागू नाहीं. 'नासलीं मिरीं जोंधळ्याला हरीं जात नाहींत' त्याप्रमाणें ह्या सुंदरीच्या तारुण्याचा बाहार जरी कमी झाला तरी ती गांवांतील युवतींस हरीं जाणार नाहीं! ती सर्वकाळ मनोरमाच असावयाची! इतर स्त्रियांसारखें वैरूप्य तिला कधीं यावयाचें नाहीं; ह्याविषयीं माझी पक्की खात्री आहे. त्याप्रमाणेंच मला तिचा कंटाळा आला, असेंही कधीं झालें नव्हतें. मी सर्वकाळ तिच्या अर्ध्या वचनांत राहून तिला गळ्यांतील ताइताप्रमाणें वागविलें असतें! परंतु तें नाहीं माझ्या अभाग्याच्या प्रारब्धीं! ! आतां तूं ह्मणतोस कीं तिचा आपला कांहीं दिवस सहवास झाला ह्मणजे झालें. हो, मी ह्मणतों 'कोल्हा काकडीला राजी' त्याप्रमाणें मुळींच नाहीं त्यापेक्षां कांहीं दिवस तिच्या माझ्या समागमाचा योग

आला तरी चिंता नाहीं. पण तसें होणें देखील दुरापास्त आहे! कारण तिच्या बोलण्या चालण्यावरून व एकंदर आचरणावरून ती त्या नाऱ्यावर पूर्णपणें फिदा आहे असें दिसतें. व तोही गोडबोल्या आहे, त्यामुळें तिचें मन त्याजवरून ढळेल ह्याविषयीं आपले तर कान कांहीं वाहत नाहीं. शिवाय ती शिकलेली आहे, शहाणी आहे, तिची चालही भारदस्तपणाची दिसते, तेव्हां ती पतिव्रताच निपजेल असें मला वाटतें. कदाचित् तिचें पाऊल वांकड्या वाटेंत पडलेंच, तरी तें आमच्या ठिकाणीं पडावयाचें नाहीं. कारण तिनें समजून उमजून माझ्याशीं लग्न करण्याविषयीं उघड नाखुषी दाखविली आहे, व माझ्याशीं लग्न न लावण्यासाठीं तर तिनें इतकें कावित्र केलें! तेव्हां आतां मी तिच्या समागमाची आशा करणें ह्मणजे लहान मुलानें चंद्रबिंब धरण्याची आशा करण्यासारखेंच आहे.

रामभाऊ—रावसाहेब, मनुष्यांना कितीएक प्रसंगीं क्षणिक वैराग्य प्राप्त होत असतें. तसें आज आपणास झालें आहे असें वाटतें व त्यामुळेंच आपणास हें लांब लचक साधुत्वाचें बोलणें सुचत आहे! आणि त्यामुळेंच, मला वाटतें, मागें आपल्या हातून ज्या अनेक गोष्टी घडून आल्या त्यांचाही आपणास विसर पडला! अहो तिनें तुह्माविषयीं जी नावड दाखविली तिचें कारण निराळेंच आहे. त्या नाऱ्यानें तिला तुमच्याविषयीं असें समजाविलें आहे कीं, 'आतां गोपाळरावाजवळ कांहीं अर्थ राहिला नाहीं. उलटें लोकांचें फार कर्ज झालें आहे, थोडे दिवसांत त्याच्या घरादाराचा सुद्धां लिलांव होईल' आणि आपल्याविषयीं मात्र मोठमोठ्या फुशारकीच्या गोष्टी सांगितल्या आहेत. त्या ऐकून तिचें कोंवळें मन तेव्हांच वळलें. नाहींतर मी जेव्हां तिच्या बापाच्या घरीं तुह्माविषयीं गोष्ट काढण्यास गेलों

होतों तेव्हां तिला चांगलें ऐकूं येतें कीं नाहीं, बोबडी वगैरे बोलते कीं काय हें पाहण्यासाठीं तिला जवळ बोलावून कांहीं प्रश्न विचारिले व तिला तुमच्याकडे किती डागिने व कसें सुख मिळेल तें सांगितलें. तेव्हां तें ऐकून ती फार आनंदित झाली असें दिसलें. परंतु आपलें लग्नाचें ठरत असतां मध्यें तिची व नारायणरावाची एकीकडे गांठ पडली. एकांत हा कामाला उत्तेजित करणारा असल्यामुळें त्या वेळीं कामानें तिच्या मनाची उचल केली असावी. आणि अशा वेळेस जवळ काय तो नारायणरावच. तेव्हां अर्थातच तिचें मन त्याजकडे लागलें असावें. आणि एकदां तिचें मन त्याजकडे वेधल्यामुळें मग त्याच्या गप्पाही तिला खऱ्या वाटल्या. परंतु आतां त्यांत किती खरेपणा आहे हें हळू हळू तिच्या अनुभवास येत जाईल, आणि जसजसा त्यांचा खोटेपणा तिला कळेल तसतशी त्याजवरची तिची प्रीति कमी कमी होत जाईल. शेवटीं तिला—मीं गोपाळरावासारखा श्रीमंत सोडून ह्या दरिद्र्याच्या नादीं कोठून लागलें—असें होईल, आणि अशा संधीस तिचें मन आपणाकडे वळविण्याचा प्रयत्न आपण सुरू ठेवूंच असें झाल्यावर ती हस्तगत होण्याला तो कितीसा उशीर लागणार ! तुह्मी ती शिकलेली आहे हें घोडें पुढें ढकलतां परंतु आपण हें खचित समजा कीं, शिकलेल्या बायकांतच न शिकलेल्या बायकांपेक्षां अधिक घोटाळे असतात ! न शिकलेल्या बऱ्या ! त्या आपल्या आईबापांनीं आपणास एकदां ज्याच्या पदरीं बांधिलें असेल, त्याच्यावर सगळा जीव ठेवून दिवस कादितात. परंतु ह्या शिकलेल्या शहाण्या ह्मटल्या ह्मणजे नवऱ्याला न कळतां पाहिजेत तशीं कंत्राटें करून पुनः त्यांचा कोठें मागमूसही नाहींसा करून पार ! पुनः नवऱ्याजवळ आपल्या पतिव्रताच ! अशा पतिव्रतेचा डौल मि-

रविगाऱ्या निदान पांच दहा तरी आपल्या हाताखालून गेल्या असतील हें आपल्यांना आठवत नाहीं काय ? ती अग्निहोत्र्याची सून ! तिनें त्या नानासाहेबाला–तो तिला पांचशें रुपये देण्याला तयार तरी–दाद दिली नाहीं ! आणखी 'पुनः माझ्याजवळ अशी गोष्ट काढशील तर मी तुझ्या पायांपाशीं डोकें फोडून जीव देईन' असें देखील सांगितलें! परंतु जेव्हां आपणाकडून एकसारखा प्रयत्न सुरू झाला तेव्हां तो तिचा नेम आणि तें पातिव्रत्य, किती दिवस टिकलें तें आपणास माहीत आहेच ! तशीच ही ! आपणास मात्र उगीच मोठा बाऊ वाटत आहे ! पण ( छातीला हात लावुन ) हा पंची जीवंत राहिला तर तो किती दिवस टिकेल तें दाखवील. त्या पूर्वीच्या कामांत तरी अस्मादिकच पुढारी होते ! हें लक्षांत असेलच.

**गोपाळराव**– तुझी जर इतकी हिंमत असली तर मी धीर सोडीत नाहीं. ती मला साध्य करून देण्याविषयीं तुझा पक्का निश्चय व सतत प्रयत्न सुरू असला ह्मणजे मला विशेष काळजी करण्याची गरज नाहीं.

**रामभाऊ**—अहो, मी तर हा जीव मित्राचे कार्यासाठीं अर्पण देखील करीन. आणखी काय सांगूं ? आपणाकडून वेळोवेळीं पैशाची मात्र मदत झाली पाहिजे. ती होईल ह्याविषयीं संशय नकोच; पण दोन पैसे कमी जास्त लागतील ह्मणून सांगून ठेवितों.

**गोपाळराव**—पैशाची नाहींरे फिकीर. तिच्या बापाकडून ते बाराशें रुपये परत आले ह्मणजे निराळेच तिच्याकरितां काढून ठेवितों. ते तरी तिच्याकरितां त्या मार्गानें खर्च होणार होतेच; ते आतां ह्या मार्गानें झाले तरी चिंता नाहीं. कोणीकडून तरी काम झालें ह्मणजे झालें. ते पैसे पुरतील ना

**रामभाऊ**—इतके कशाला पाहिजेत? त्यांतले अर्धे देखील नकोत. हो, पण मी ज्याकरितां मुद्दाम आलों, त्याची आठवण राहिली नाहीं. मी त्या त्र्यंबकभटाविषयीं सांगणार होतों.

**गोपाळराव**—काय तें?

**रामभाऊ**—मी काल त्याजकडे ते बाराशें रुपये परत मागावयास गेलों होतों. पहिल्यानें त्याला चार समाधानाच्या गोष्टी सांगून नंतर रुपयांची गोष्ट काढिली. तेव्हां तो लोभी लुच्चा ह्मातारडा काय ह्मणतो 'तुह्मांकरितां मला या खटल्यांत पुष्कळ पैसे खर्च झाले. कारण लग्न ठरलें ह्मणून मीं सामान सुमान चिरगुट पांघरूण विकत घेतलें. त्याला खर्च झाला. शिवाय मोठ्या गृहस्थाशीं संबंध ह्मणून सगळ्या सोयऱ्या धायऱ्यांस ने आण करण्यासही पुष्कळ बुडीत खर्च झाला. शंभर रुपये तर फक्त गाडीभाडे झालें. फिर्याद आर्यादि करण्यास खर्च लागला तो खेरीजच. आणखी तुमच्याशीं संबंध जुळविण्याचें ठरविलें ह्मणून माझी मुलगी मला सोडून गेली. हें माझें सर्वांत मोठें नुकसान झालें. ती तुह्माला न देतां दुसऱ्याला दिली असती तर मला बाराशें रुपये खचित् मिळाले असते. ते तुमच्यामुळें बुडाले. तर मी आतां ते घेतलेले रुपये परत देणार नाहीं.

**गोपाळराव**—वाहवारे वाहवा! बरीच जीभ चालली भटुरड्याची! पण तूं कसें हें ऐकून घेतलेंस?

**रामभाऊ**—छेः छेः मी काय ह्मणून ऐकून घेईन? मीं लागलेंच त्याला खरपूस उत्तर दिलें कीं, 'भटजीबोवा श्राद्धास जेवावयास गेलां ह्मणजे भोळ्या यजमानाला ह्या छोगी सांगाव्या! येथें रावसाहेबाशीं गांठ आहे! तुह्मीं सोईनें रुपये दिले तर ठीकच आहे; नाहीं तर आह्मी कोडतमार्फत तनवीज करून सव्याज खर्चासुद्धां रुपये घेऊं. शिवाय

तुमची पक्की खोड तोडण्याचीही तजवीज करूं हें पक्कें समजा.' मी असें बोललों तेव्हां तो पहिलें बोलणें फिरवून ह्मणाला मी स्वतः जाऊन गोपाळरावजींचे पाय धरीन व त्यांच्याच काकुळती करून निदान ते निमे रुपयांची तरी सूट देतील असें करीन.

**गोपाळराव**—हो! मी सोडतों आहें त्याला रुपये तर!

**रामभाऊ**—मीं तें त्याला सांगितलेंच. मीं ह्मटलें ते काय ह्मणून तुला रुपये सोडतील? ते कधीं एक पै सोडणार नाहींत. असें सांगितल्याबरोबर ह्मातारा रागावून मजवरच उलटला आणि ह्मणाला 'बरें बरें! तूंच गोपाळरावांना मला सूट न घालण्याविषयीं सांगशील असें दिसतें. तर मीच जाऊन त्यांना सांगेन कीं, ह्या लग्नाच्या खटपटींत रामभाऊनें मला सहाशेंच रुपये दिले. बाकीचे आपण खाल्ले असें सांगेन आणि हें खरें दिसण्यासाठीं तुझ्या दाराजवळ पैशासाठीं अडून बसेन आणि गांवभर तूं पैसे खाल्लेस असा बोभाट करीन. ह्मणजे तुझ्या लबाडीविषयीं गोपालरावजींची खातरी होईल व ते मला निमे रुपये सोडतील. निमे न सोडिले तरी कांहींतरी सोडतील. व तुझीही खोड मोडेल! हें त्याचें बोलणें ऐकून मला अति संताप आला व मोठी काळजीही पडली. कारण मीं ह्मटलें जर कदाचित् हा भटुरडा ह्मणतो तसें ह्यानें केलें, तर जरी माझा व आपला अकृत्रिम स्नेह आहे, तरी रोज मीं पैसे खाल्ल्याविषयीं जिकडून तिकडून कटकट ऐकूं येऊं लागली ह्मणजे आपणास कदाचित् मजविषयीं संशय येऊं लागेल, व तसें झालें ह्मणजे आपला व माझा जन्माचा स्नेह तुटेल. ही गोष्ट मनांत येऊन फार दुःख झालें. आपला स्नेह तुटण्यापेक्षां जितक्या रुपयांविषयीं आपणास माझा संशय येईल तितके रुपये मी आपला जीव गहाण ठेवून भरून देईन. मग ते रुपये

फेडण्यासाठीं मला जन्मभर गुलामगिरी करावी लागली तरी चिंता नाहीं; पण आपला स्नेह तुटणें हें मला सहन होणार नाहीं. हा विचार मनांत आल्यावरून ही गोष्ट एकवार आपल्या कानावर घालावी ह्मणून इकडे आलों. ( खिन्न मुद्रा करितो. )

गोपाळराव—अरे रामभाऊ, तुला काय वेड लागलें आहे ? मला तुझ्याविषयीं संशय येईल, असें तुझ्या मनांत क्षणभर तरी कसें आलें ? इतके दिवस तुझा माझा जिवश्चकंठश्च स्नेह असून माझ्या मनाची स्थिति तुला माहीत असूं नये हें मोठें आश्चर्य आहे ! अरे त्या त्र्यंबकभटानें तर काय, पण प्रत्यक्ष माझ्या आईबापांनींही जरी तुझ्याविषयीं कांहीं अधिक उणें मजजवळ सांगितलें असतें, तरी मीं तें खरें मानिलें नसतें. वेडा कुठचा ! त्या भटाला माझ्याजवळ तुझ्याविषयीं गाऱ्हाणें सांगावयास येऊं देतो आहे कोण ? दाराजवळ आला तर शिपायाला सांगून ठेवितों कीं, त्याला धक्के मारून हांकून दे; ह्मणजे झालें कीं नाहीं ! आणि आतां तूंही त्याजकडे रुपये मागण्यास जाऊं नको. त्याला वकील मार्फत चार दिवसांच्या आंत आमचे रुपये देण्याविषयीं नोटीस देऊं. तितक्यानें त्यानें रुपये दिले तर बरेंच झालें; नाहीं तर कोर्टांत फिर्याद करूं. तूं त्याविषयीं कांहीं काळजी करूं नको. आमच्या पांखराविषयीं मात्र प्रयत्न सुरू असूं दे.

गोपाळरावाच्या ह्या बोलण्यानें रामभाऊस रुपयांविषयीं काळजी पडली होती ती दूर झाली व तो आनंदित होऊन घरीं गेला. दुसऱ्या दिवशीं गोपाळरावाकडून त्र्यंबकभटास रुपयांबद्दल नोटीस देवविली. ती अशीः—

रा० त्र्यंबकभट बिन जनार्दनभट राहणार वसई यांस ह्या लेखानें खालीं सही करणाराकडून नोटिस देण्यांत येते कीं,

तुह्मीं आपली मुलगी गोदावरी ही आह्मास देण्याचें कबूल केलें व तिजबद्दल आमचे तर्फेनें रामभाऊ ह्यांनीं ग्रामजोशी व आमचे उपाध्ये यांचे समक्ष तुह्मास बाराशें रुपये दिले, व तुह्मीं रुपये घेऊन मुलगी देण्याचा करार केला. त्याजबद्दल लग्नाचा मुहूर्त—निश्चयही झाला. पुढें कराराप्रमाणें मुलगी आह्मास द्यावयाची ती तुह्मीं दिली नाहीं, व पुढेंही द्याल अशी आशा नाहीं. व आमचे घेतलेले रुपये परत करावयाचे तेही तुह्मीं अद्याप केले नाहींत. तर आमचे सदर्हू बाराशें रुपये ही नोटीस पावल्यापासून तीन दिवसांचे आंत खुद्द आमचे पाशीं किंवा रा॰ रा॰ रामभाऊ ह्यांजपाशीं द्यावें. नाहींपेक्षां सदर्हू तीन दिवसांनंतर, दर रुपयास दरमहा एक आणाप्रमाणें झाले मुदतीचें व्याज तुह्मांस द्यावें लागेल. व ह्याबद्दल आह्मी कोर्टांत फिर्याद करून रुपये घेऊं. फिर्यादीचा व या नोटिशीचा खर्च तुह्मावर पडेल. कळावें तारीख १३ माहे एप्रिल सन १८६९.

केशव गोपाळ.

ही नोटीस त्र्यंबकभटास पोंचली तेव्हां ती पाहिल्याबरोबर तो फार घाबरून गेला. रामभाऊनें घेतलेले साडेचारशें रुपये, तो खचित नाकबूल जातो असें त्यास वाटलें. तथापि तो तसाच त्या शिरशिरी बरोबर त्याजकडे गेला, व त्याला ह्मणाला कीं, " तुह्मीं बाराशें रुपयांपैकीं साडेचारशें रुपये घेतले आहेत ते आतां मला द्या. गोपाळरावाकडून बाराशें रुपये तीन दिवसांचें आंत परत करण्याविषयीं नोटीस लागली आहे. तरी तुह्माला ठाऊक असेलच. तर आतां लवकर रुपये द्या ह्मणजे मी ते रुपये आतांच त्यांना नेऊन देतों."

रामभाऊ—अहो भटजी, तुह्मी शुद्धीवर आहां का?

तुह्मी कोणाजवळ आणि कशाचे रुपये मागतां? गोपाळरावाच्या तर्फे मीं, जोशीबावा व उपाध्येबोवा ह्यांच्या समक्षच तुमच्या पदरांत बाराशें रुपये घातलेना? मग मजजवळ साडेचारशें रुपये कसले मागतां? तुमचे रुपये घेतले आहेत कोणी?

**त्र्यंबकभट**—अरे वारे वा लुच्चा! ! साडेचारशें रुपये घेऊन. नाहीं ह्मणतोस काय? मी आपल्या मुलीचे सातशें रुपये घ्यावयाचे ह्मणून सांगितलें असतां, तूं ह्मणालास कीं, 'तुह्मी मुलीचे बाराशें रुपये घ्यावयाचे ह्मणून सांगा. व तितके रुपये पदरांतही घ्या. त्याबद्दल तुह्मास मी पन्नास रुपये अधिक देईन, व बाकी साडे चारशें मी घेईन.' असें तूं नाहीं मला सांगितलेंस? आणि मग तूं, जोशी आणि उपाध्या यांच्या देखत बाराशें रुपये मला दिले. आणि ते मजकडून गेल्यावर तूं रात्रीं येऊन नाहीं का साडेचारशें रुपये घेऊन गेलास? उगाच माझी थट्टा करीत असलास तर करूं नको! ही का थट्टेची गोष्ट आहे? लवकर रुपये दे.

**रामभाऊ**—मी का तुमची थट्टा करितों? मी तुह्माला निक्षून सांगतों कीं मला तुमचे साडेचारशें किंवा एक रुपया किंवा एक कवडी देखील माहीत नाहीं! तुह्मी गोपाळरावांकडून घेतलेले रुपये त्यांना सुखासंतोषानें परत द्या. नाहींतर ते फिर्याद करून खर्च सुद्धां घेतीलच. आणि पुन्हां अशी भलतीच बडबड करण्यास मजकडे येऊं नका. कारण तुमची ही बडबड ऐकून, लोक विनाकारण मला लबाड ह्मणतील. चला, निघा व्हा चालते कसे!

**त्र्यंबकभट**—अरे गुलामा मानकाप्या! असें ब्राह्मणाला बुडवून तुझें कल्याण कधीं होणार नाहीं! तुझा सत्यनाश, कुलक्षय होईल! ईश्वर, गरीब ब्राह्मणाला बुडविणाराचें वाटोळें केल्याशिवाय कधीं राहणार नाहीं! राम्या, बऱ्या

गोष्टीनें रुपये दे. मी रुपये घेतल्याशिवाय येथून हालणार नाहीं, उपास करीत बसेन! आणि नच देशील तर फांस लावून किंवा डोकें फोडून जीव देईन! पण रुपये घेतल्याशिवाय येथून हालणार नाहीं!

**रामभाऊ**—भटा! तोंड संभाळ. नाहींतर बत्तीशी रंगेल. तूं जीव देणार ना? दम खा तर मग! तूं आत्महत्या करण्याचा प्रयत्न करितोस ह्मणून तुला पोलीसच्या स्वाधीन करतों. निघतोस कीं नाहीं येथून? कीं जाऊं पोलीसकडे?

**त्र्यंबकभट**—पोलीसकडे जा, नाहींतर पोलीसच्या बापाकडे जा! मी रुपये घेतल्याशिवाय येथून हालणार नाहीं!

रामभाऊ लागलाच पागोटें घालून पोलीसास खबर देण्यास निघाला. तेव्हां त्र्यंबकभटानें त्याचें धोतर धरून त्याला अडकविलें व रुपये दिल्याशिवाय सोडणार नाहीं असें ह्मणूं लागला. तेव्हां रामभाऊनें त्यास दोन ठोंसे लगावून सोडून दिलें, व आपण पोलीसच्या कचेरींत जाऊन एका नायकास ही हकीकत सांगून त्यास घेऊन आला. नायकास पाहिल्याबरोबर त्र्यंबकभट भ्याला. तरी त्यानें आपली सर्व हकीकत त्याजवळ सांगण्यास आरंभ केला. पण ऐकतो कोण! त्या नायकानें दरडावून सांगितलें कीं, भटजी, तुमचें काय ह्मणणें असेल त्याजबद्दल तुह्मी पाहिजेल तर त्यांच्यावर फिर्याद करा. पण आतां तुह्मी आत्महत्या करण्याचा प्रयत्न करीत होतां ह्याकरितां तुह्माला कैद करून कोठडींत घालतों. चलतां कीं शिपायाकडून बिड्या आणून तुह्माला त्या घालून नेलें पाहिजे?

**नायकाचें** हें बोलणें ऐकून त्र्यंबकभट त्याच्या हातीं पायीं पडूं लागला व कैदेंत न घालण्याविषयीं फार काकुळती करूं लागला. तेव्हां नाईक त्यास ह्मणाला:—

**भटजी** एक वेळ तुह्मांवर मेहेरबानी करून तुह्माला सो-

डतों. पुनः असा वेडेपणा कराल, तर बिन भाड्याच्या घरांत जाल.! आतां मींच ह्मणून तुह्माला सोडिलें. दुसरा कोणी असता तर कधीं सोडताना. जा आतां, निघा येथून. असें बोलून नायकानें त्याचा हात धरून त्याला हांकून लाविलें, आणि आपण रामभाऊ जवळून कांहीं चिरीमिरी घेऊन निघून गेला.

त्र्यंबकभट जो तेथून निघाला, तो तसाच ही हकीकत गोपाळरावास सांगावी, ह्मणून त्याजकडे गेला आणि त्याला मोठमोठ्यानें हांका मारूं लागला. परंतु रामभाऊनें गोपाळरावाचे कान पूर्वींच फुंकून ठेविलेले असल्यामुळें त्यानें त्र्यंबकभटास पाहिल्याबरोबर, आपल्या पुरभय्या शिपायाकडून त्याला धक्के मारवून हांकून दिलें, व सांगितलें कीं नोटिशीप्रमाणें रामभाऊजवळ तीन दिवसांत रुपये दे नाहीं तर विचार पहा. त्र्यंबकभटानें पुष्कळ आकांत करून रामभाऊची लबाडी त्याला कळविण्याचा प्रयत्न केला, पण त्याचें ऐकतो कोण? त्याला चार धक्के मात्र मिळाले. तेव्हां तो बिचारा तसाच रडत आपल्या घरीं गेला.

बाराशें रुपये खचित अंगावर पडले, असें त्र्यंबकभटास वाटलें. त्यामुळें त्याला फार दुःख होऊन तो झुरणीस लागला. तथापि त्याला एक आशा होती. ती ही कीं, गोपाळरावानें कोर्टांत फिर्याद केली ह्मणजे आपण ही सर्व खरी हकीकत कोर्टास सांगूं. ह्मणजे कोर्ट बहुतकरून आपणास साडेचारशें रुपये सूट देईल. वास्तविक पाहतां ही आशा व्यर्थ होती. परंतु त्याच्या भट्टी समजुतीमुळें त्याला ती सफळ होईल असें वाटत होतें. ही आशा मनांत असल्यामुळें त्यानें नोटिशींत लिहिलेली मुदत होऊन गेली तरी गोपाळरावाचे रुपये परत केले नाहींत. तेव्हां अर्थातच गोपाळरावानें त्याजवर कोर्टांत फिर्याद केली. चालीप्रमाणें

वादी, प्रतिवादी व साक्षी यांस समानें लागलीं, व नेमलेल्य तारखेस खटला चालला. त्र्यंबकभटानें आपली सर्व खरी ह कीकत कोर्टास सांगितली. परंतु त्याजकडून त्या हकीकती च्या खरेपणाबद्दल कांहींच पुरावा झाला नाहीं. गोपाळरावा कडून उत्तम पुरावा झाला. तेव्हां अर्थातच त्र्यंबकभटावर मुद्दल रुपये, नोटिशीच्या मुदतीच्या दिवसांनंतरचे नि वाड्याच्या तारखेपर्यंत झालेलें व्याज, फिर्यादीचा व वकि लाचा बयाणा व कमिशन वगैरे एकंदर, चवदाशें नऊ रुप ये बारा आणे आठ पै, इतक्या रकमेचा निवाडा झाला. मु नसिफाच्या तोंडचा शेवटचा हुकूम ऐकिल्याबरोबर त्र्यंबक-भटास ताप भरला, त्याच्या एका स्नेहानें त्यास घरीं पोंच-विलें. त्या दिवसापासून तो अगदीं अजारी पडला. इकडे गोपाळरावानें दरखास्त दिली, आणि कारकून व शिपाई घेऊ-न त्र्यंबकभटाची जिनगी जप्त करण्यास आला. तेव्हां आतां आपल्या घरादाराचा लिलांव होणार असें त्र्यंबकभटाच्या बायकोस वाटलें. तेव्हां तिनें त्या कोर्टाच्या कारकुनासमक्ष निवाड्याप्रमाणें रुपये मोजून दिले आणि निवाडा फाडून घेतला. बायकोनें रुपये दिले, ते वेळेस त्र्यंबकभट हांतरु-णावरच होता. त्याला हें रुपये दिल्याचें वर्तमान समज-ल्याबरोबर त्याचें दुखणें फारच वाढलें, व त्याला भ्रम झाला. त्यामुळें तो दिवस रात्र रुपये! रुपये! रामभाऊ ! रामभाऊ ! गोदी ! गोदी ! अशी बडबड करूं लागला. पुढें एकदोन दिवसांनीं त्यानें यमनगरीचा रस्ता धरिला.

मागें सांगितल्याप्रमाणें माजिस्त्रेटानें नारायणराव व गोदावरी ह्यांस रजा दिल्यावर नारायणराव तिला घेऊन घरीं गेला. त्या उभयतांसही आपण संकटांतून पार पडलों व आतां आपला विवाह संबंध होण्यास कोणतीही अडचण राहिली नाहीं, ह्यामुळें मनावरचें ओझें कमी झाल्यासारखें

वाटून अत्यानंद झाला, हें सांगावयास नकोच. त्यांनीं ती त्या दिवसाची रात्र आनंदाच्या गोष्टी सांगण्यांत घालविली, त्यांनीं परस्परांस मनानें वरिलेंच होतें. त्यामुळें वास्तविक पाहतां त्यांचें लग्न झालेंच होतें. परंतु लोकाचाराप्रमाणें लग्नाचे सर्व विधि मात्र व्हावयाचे होते. त्याकरितां दुसरे दिवशीं नारायणरावानें आपले स्नेह्यांच्या मदतीनें लग्नाची सर्व तयारी केली. कन्यादान वगैरे करण्यास मनुष्य पाहिजे तो त्र्यंबकभटाचे दाईजांपैकींच एकजण मिळाला. नंतर मुहूत पाहून त्या दिवशीं चालीप्रमाणें नारायणराव व गोदावरी ह्यांचें लग्न झालें. लोकसंप्रदायाप्रमाणें लग्नाचे सर्व सोहळे झाले. नारायणरावानें गांवभोजनही दिलें. गोदावरीचें सासरचें नांव लक्ष्मी ठेविलें. परंतु ह्या गोष्टीस एकदां जें 'नारायणराव आणि गोदावरी' हें नांव दिलें आहे; तेंच नांव कायम ठेवावें हें बरें दिसतें. ह्मणून ह्या पुढें गोदावरीचें नांव न बदलतां अखेरपर्यंत तेंच कायम ठेविलें आहे.

ह्याप्रमाणें सर्व अडचणी दूर होऊन तीं दोघें एकत्र राहूं लागलीं. लग्न झाल्यावर सुमारें एक महिन्यानें गोदावरीस ऋतु प्राप्त झाला, तेव्हां गर्भाधान वगैरे संस्कार विधीपूर्वक नाराय.रावानें केले. तीं दोघेंही, सुशिक्षित, चतुर, रसिक, तरुण व एकमेकांच्या पसंतीस उतरलेलीं असल्यामुळें, संसारांत कामक्रोधादि मनोविकार ह्यांच्या योगानें होणारीं जीं दुःखें तीं त्यांच्या स्वप्नींही नसत. तीं दोघें, एकमेकांविषयीं सकाम असत, त्यांच्या मनांत एकमेकांच्या ठिकाणीं फार राग [ प्रीति ] असे, व एकमेकांच्या सहवासाविषयीं फार लोभ असे. त्यांच्यांत कलह ह्मटला ह्मणजे प्रेमकलह; वांकडेपणा ह्मटला ह्मणजे एकमेकांच्या विनोदांतील भाषणांत जी वक्रता असेल, तोच. मतभेद ह्मटला ह्मणजे, एकमेकांची एकमेकांवर अतिशय प्रीति असल्या-

मुळें, एकानें दुसऱ्यास सुख होण्याकरितां एकादें काम करूं लागावें, परंतु दुसऱ्याची पहिल्यावर अतिशय प्रीति असल्यामुळें त्यानें पहिल्यास सांगावें कीं, ह्या कामांत तुला फार श्रम होतात, ते मला पाहवत नाहींत, याकरितां तूं हें करूं नको. त्यावर पहिल्यानें उत्तर द्यावें कीं, तुमच्यासाठीं काम करण्यांत मला श्रम मुळींच वाटत नाहींत. ह्या बोलण्यांतच काय मतभेद असेल तो! सारांश तीं उभयतां प्रीतीनें, आनंदानें, व एकमतानें राहूं लागलीं, दिवसेंदिवस त्यांची प्रीति वाढत चालली. व त्याच्या योगानें त्यांच्या सुखाचीही वृद्धि होत चालली. तेणेंकरून संसारांतच स्वर्गसुख आहे असें जें ह्मणतात, त्या सुखाचा अनुभव त्यांस येऊं लागला. अशा स्त्रीपुरुषांस एकमेकांपासून किती सुख, किती व कसा प्रेमानंद होतो, ह्याचें वर्णन करून वाचकांच्या मनांत भरून देण्याविषयीं प्रयत्न करण व्यर्थ आहे. त्या प्रेमानंदाचा ज्याला प्रत्यक्ष अनुभव असेल त्यालाच त्याची योग्यता समजेल. आतां ह्या आनंदी जोडप्यास कांहीं वेळ त्यांच्या आनंदाचा उपभोग घेत राहूं देऊन, दुसरीकडे वळूं.

---

## भाग ७ वा.

मागील भागांत सांगितल्याप्रमाणें रामभाऊनें **गोपाळरावास गोदावरी** प्राप्त करून देण्याचें कबूल केल्यावर, त्यानें तिचें मन **गोपाळरावाकडे** किंवा आपल्याकडे, कोणाकडे तरी वळावें ह्मणून खटपट चालविली होती. त्यानें थाटाचा पोषाख करून तिच्या दारावरून, **नारायणराव** घरीं नसेल

अशा वेळेस, उगीच इकडून तिकडे तिकडून इकडे दोन तीन खेपा घालाव्या. कदाचित् ती माडीच्या खिडकींत उभी असून तिची दृष्टि रस्त्याकडे असली, तर ह्यानें उगीच हसरें तोंड करून तिजकडे पहावें. कधीं संध्याकाळच्या वेळीं ती देवळांस जाऊं लागली ह्मणजे त्यानें तिच्या मागून जावें व तिला ऐकूं जाई अशा रीतीनें 'तिचें मन आपल्याकडे लागेल तर तिला सर्व सुखें मिळतील' अशा अर्थाचे शब्द बोलावे. कधीं तिच्या देवळांस जाण्याच्या वेळेस तिच्या जाण्याच्या रस्त्यानें-च तिच्या समोरून आपण व गोपाळराव, गोपाळरावाच्या दमणी गाडींत तक्याशीं टेंकून बसले आहेत, गाडीला छानदार पांढरे बैल जुंपले आहेत, त्यांच्या गळ्यांत घुंगरमाळा खळाळत आहेत, पाठीवर झुली फडकत आहेत, अशा थाटानें जावें. ती देवदर्शनास गेली ह्मणजे ह्यानें गोपाळरावास घेऊन दर्शनास जावें, व त्या वेळेस तिच्या नजरेस येई अशा रीतीनें, तेथें जे भिकारी वगैरे असतील, त्यांस भराभर पैसे वांटावे, व पैसा खर्चण्याविषयीं आपणांस कांहीं वाटत नाहीं व आपणाजवळ पैशाचा तोटाही नाहीं; खाण्यास मात्र कोणी पाहिजे. असे प्रकार नित्य नवे नवे करावेत; पण ह्यापासून कितीसा उपयोग झाला असेल याची कल्पना वाचकांनींच करावी. त्यापासून तादृश उपयोग झाला नाहीं. असे सर्व प्रयत्न फुकट गेल्यावर मध्यस्थी करणाऱ्या एका बाईकडून-(कुंटणीकडून) ही प्रयत्न चालविला, पण त्यांतही यश आलें नाहीं! त्या बाईनें येऊन सांगितलें कीं, तुमची मसलत सिद्धीस जाणें नाहीं. मीं मार खाल्ला नाहीं हेंच मी आपलें नशीब समजतें.

नंतर रामभाऊनें विचार केला कीं, सर्व प्रयत्न निष्फळ झाले तरी हात टेंकून बसतां उपयोगी नाहीं. कारण मग गोपाळरावाचे पैसे लुबाडावयास सांपडतात ते मुळींच सांपड-

णार नाहींत. याकरितां दुसरी कांहीं तरी मसलत लढविली पाहिजे कीं जेणेंकरून पुष्कळ पैशांवर हात मारावयास सांपडेल. एके दिवशीं **गोपाळरावानें रामभाऊस** विचारलें कीं, तुमचे सर्व बेत फसलेना! त्यावरच **रामभाऊनें** उत्तर दिलें कीं, "ही गोष्ट घडून येण्यास संधी लागत असते. त्याप्रमाणें तिलाही आपल्या मनांतली गोष्ट तोंडाबाहेर काढण्यास, किंवा करण्यास तरी संधी मिळाली पाहिजे कीं नाहीं? तुह्मी कल्पना करा कीं, तिच्या मनांत आपणास एकांतीं भेट देण्याचें आलें, किंबहुना तिनें कबूलही केलें, तरी देखील वर्षावर्षांत तिला तसें करण्यास संधी मिळणें कठिण आहे; कारण तो **नारायण** शाळेंतून आला, ह्मणजे तिच्या भोंवतींच असतो. रात्रीं तर तो मुळीं घराबाहेर पडतच नाहीं. तेव्हां दिवसास काय तो पांच सात तास नोकरीवर जातो तेवढा वेळ मात्र तो तिच्याजवळ नसतो. तरी त्या पांच सात तासांत देखील तो कांहीं तरी निमित्तानें घरीं दोन तीन खेपा घालतोच. संध्याकाळीं ती कधीं कधीं देवळांस जाते, तेव्हां तिच्याबरोबर तें अत्याबाईचें मढें असतें. तेव्हां तिच्या मनांतील गोष्ट घडून यावी कशी? आतां ती पटाईत बायको असती तर इतक्याही बंदोबस्तांतून नवऱ्याच्या डोळ्यांना पडदे बांधून तिला काय पाहिजे तें करती. परंतु ती अल्पवयी असल्यामुळें अजून तिचा धीर तितका चेपला नाहीं. या कारणांनीं तिच्या प्राप्तीला बराच वेळ लागण्याचा संभव आहे. आतां ह्या अडचणी दूर करण्यास एक युक्ति आहे. ती जर आपण कबूल कराल, आणि पार पडेल तर दुसऱ्या दिवशीं आपलें काम फत्ते झालें असें समजा!

**गोपाळराव**—अरे ह्या कामांत तूं काढलेली युक्ति मी कबूल करीन कीं नाहीं ह्याविषयीं तुला अजून संशय येतो, हें मोठें आश्चर्य आहे. मीं तुला एकदां सदर परवानगी

दिली आहेना! कीं तिच्या प्राप्तीसाठीं तूं जें करशील तें मला कबूल! मग कबूल कराल कीं नाहीं असें काय विचारतोस?

**रामभाऊ**--रावसाहेब रागावूं नका. तुह्मीं जरी सदर परवानगी दिलेली असली, तरी मला तसें विचारणें योग्य आहे. कसें झालें तरी, पैसे खर्च करणार मालक आपण आहां, तेंव्हां मला तुह्माला विचारिल्याशिवाय एकदम कोणतीही गोष्ट करितां येत नाहीं आणि ह्या कामांत तर कोणतीही गोष्ट करावयास तुमची अगदीं जरूरच असावयाची.

**गोपाळराव**—काय युक्ति सांगतोस ती सांग पाहूं. प्राण देण्यापेक्षां तर कांहीं अधिक नाहीं? फार तर काय पण त्या गोदावरीच्या मनोरम देहाचा उपभोग मिळून मग जरी प्राण गेला, तरी चिंता नाहीं! आपण त्याला देखील खुपी आहों.

**रामभाऊ**—छेः हें काय भलतेंच! यःकश्चित् एका तरुणीसाठीं ह्मणें मी प्राण देण्यास तयार आहें! आपल्या सारख्याच्या पायांपाशीं अशा शेंकडों स्त्रिया लोटांगणें घालीत येतील! मी ह्मणतों ती युक्ति कांहीं इतकी संकटाची नाहीं. तिला फक्त थोडा बहुत खर्च आणि थोडीशी मेहनत केली पाहिजे ह्मणजे झालें.

**गोपाळराव**—पण ती ऐकूं दे तर खरी एकदां!

**रामभाऊ**—युक्ति मिळून इतकीच कीं, गोदावरी आपणास प्राप्त होण्यास अडथळा काय तो नारायणरावाचा. तेंव्हां त्याला येथून नाहींसा करावा ह्मणजे झालें.

**गोपाळराव**-ह्मणजे त्याला मारूनच टाकावयाचा कीं नाहीं? छत्! ही युक्ति मी नाहीं कबूल करणार! त्याचा प्राण घेण्याचें कठिण किंवा तो घेणें हें पातक आहे असें मी ह्मणत नाहीं. कारण आजपर्यंत अशा खटल्यांत दोन तीनजणांस आपण यमाजी भास्कराकडे पोहोंचविले आहेत. त्याचें कांहीं नाहीं. पण तो मेल्याबरोबर त्या सुंदरीचे वपना-

दि विघी होतील ! मग तिच्या सौंदर्याचें मातेरें होईल! मग काय उपयोग? छे: छे: छे: ही युक्ति कांहीं उपयोगी नाहीं. त्यापेक्षां मला ती न मिळून, तिच्याकरितां झुरझुरून माझा प्राण गेला तरी चिंता नाहीं. कारण तिच्या ठिकाणीं हेतु ठेवून मेलों, ह्मणजे पुढच्या जन्मीं तरी ती मला मिळेल. हें पुरवेल पण तिचें मनोहर रूप विछिन्न झालेलें आपल्याच्यानें पाहवणार नाहीं.

**रामभाऊ**--अहो रावसाहेब, पण किंचित् माझें तर ऐकून घ्या. आपणच बोलून संपवूं नका. अहो, मी जी युक्ति काढीन, त्या युक्तीनें तिचें विछिन्न झालेलें रूप तुमच्या हातांत यावें, अशी कशी काढीन ? अशी काढिली तर मग मी पशूच ह्मणावयाचा ! मी असें ह्मणतों कीं, **नारायणाला** येथून नाहींसा करावयाचा ह्मणजे मारून टाकावयाचा नव्हे. तर त्याच्या वरिष्ठ अधिकाऱ्यास ह्मणजे शाळातपासनिसास सांगून त्याची येथून बदली करवावयाची ह्मणजे तो येथून नाहींसा झाला कीं नाहीं ?

**गोपाळराव**-अरे पण त्याची जर बदली झाली, तर तो बायकोला बरोबर घेऊन नाहींका जाणार? तिला तो घटकाभर विसंबत नाहीं. तिला महिनेच्या महिने मागें कसा ठेवील?

**रामभाऊ**-मग तो तिला मागें ठेवील, अशाच युक्तीनें बदली करवावयाची ! ह्मणजे असें कीं भर पावसाळ्याचे दिवस ज्या ठिकाणीं जाण्यास मध्यें नद्या, डोंगर, रानें, चिखल, नद्यांना नावा नाहींत वगैरे अडचणी, व त्यामुळें त्या ठिकाणीं तशा दिवसांत बायकोस तर नेतांच येऊं नये, अगदीं रानटी व वाईट हवेचा गांव अशा ठिकाणीं भर पावसाळ्यांत बदली झाली ह्मणजे तो तिला पावसाळा संपेपर्यंत येथेंच ठेवील. बरोबर नेणार नाहीं. मग तो जाऊन येथें ती एकटीच राहील. तसें झालें ह्मणजे थोडक्याच दिवसांत आपला कार्यभाग झाला ह्मणून समजा. कारण तो गेला ह्मणजे एक तर ति-

च्यावरील ताबा व जपणी कमी होईल. शिवाय ती तरुण असल्यामुळें तिला पुरुषावांचून दिवस कंठवणार नाहींत आणि तसें झालें ह्मणजे आपला सुरू असलेला प्रयत्न सफळ होण्यास किती उशीर? कां आहे कीं नाहीं चांगली युक्ति!

**गोपाळराव**—साधली तर ठीक आहे. पण तो त्याचा तपासनीस वळला पाहिजे ना?

**रामभाऊ**—हात्तिच्या! त्याला वळविण्याला हो किती उशीर! तो आतां थोड्या दिवसांतच येथें येणार आहे. आला ह्मणजे ज्या गोष्टीचा त्याला शोक असेल तिच्याविषयीं आपण त्याची ओळख करून,—तरतूद ठेवावी ह्मणजे झालें. जरा पिशवीचें तोंड सईल केलें पाहिजे. त्याला खाण्यापिण्याचा, नाच रंगाचा, कसलाही शोक असला तरी आपण पुरा करूं. आणखी वरतीं कांहीं दक्षिणा पाहिजे तरी आपणाकडून तयारीच आहे. मग कायहो! क्षणांत तो आपल्या मुठींत येईल. मग कान धरून बोकडाप्रमाणें पाहिजे तिकडे वळवावा! शेंकडों सरकारी अधिकारी वश करून आपण नाहीं नाहीं तीं कामें करून घेतलीं आहेत मग हाच कांहीं त्यांच्यापेक्षां अधिक आहे कीं काय?

ह्याप्रमाणें बेत झाल्यावर कांहीं दिवसांनीं शाळांचा तपासनीस एक दोन दिवसांनीं वसईस येणार असें रामभाऊस समजलें. त्याच्या येण्याच्या दिवसाची बातमी त्यानें ठेविली होती. तेव्हां तो यावयाचा त्या दिवशीं सायंकाळचे वेळेस तो ज्या रस्त्यानें येणार होता, त्याच रस्त्यावर रामभाऊ गोपाळरावास बरोबर घेऊन त्यांची मोठी स्वारीची गाडी जोडून, पोषाख वगैरे उत्तम करून फिरावयाच्या निमित्तानें गेला. गांवाबाहेर गाडी उभी करून दोघेजण खालीं उतरून इकडे तिकडे फिरत आहेत इतक्यांत त्या तपासनिसाची गाडी आली. तो त्या वर्षी नवीन-

च त्या जिल्ह्यावर आलेला होता. त्यामुळें ह्यांनीं त्याला व त्यानें ह्यांना कधीं पाहिलेलें नव्हतें. गाडी जवळ आल्यावर गोपाळराव व रामभाऊ पुढें झाले आणि त्यांनीं नमस्कार केला. व आपण कोण, कोठून आलां, काय निमित्तानें आलां वगैरे चौकशी केली. व तिचीं 'मी शाळांचा तपासनीस आज घोडबंदराहून येथें शाळा तपासावयास आलों वगैरे उत्तरें मिळालीं.

**गोपाळराव**—आपण उतरावयास कोठें जाणार ? ह्या गांवांत आपली कोणाची ओळख आहे काय ?

**तपासनीस**—येथें माझी कोणाची ओळख नाहीं. उतरण्याविषयीं काय कोठें तरी देवळांत किंवा एकाद्या धर्मशाळेंत उतरूं.

**गोपाळराव**—आपण मेहेरबानी करून येण्याची तसदी घ्याल तर येथें जवळच बागेंत माझा बंगला आहे. त्यांत आपली उतरण्याची वगैरे सर्व सोय होईल. व मलाही आपण मान दिला असें मी समजेन.

**तपासनीस**—पण मी तेथें आल्यानें आपणास अडचण होईल, व तसदी पडेल !

**गोपाळराव**—तसदी नाहीं आणि अडचणही नाहीं. आपल्या सारख्या थोर गृहस्थांस उतरण्याकरितांच मीं तो बंगला बांधिला आहे. व सर्व सरकारी कामगार जेव्हां येथें फिरावयास येतात, तेव्हां तेथेंच उतरत असतात. व आह्मी यथाशक्ति जो त्यांचा पाहुणचार करितों, तोही ते मेहेरबानीनें ग्रहण करितात. त्याप्रमाणें आपणही कराल तर मेहेरबानी होईल. आपला माझा परिचय नाहीं, त्यामुळें आपणास तेथें येण्यास संकोच वाटत असेल; परंतु तो वाटण्याचें कारण नाहीं, हें आपणास एक दोन दिवसांत अनुभवानें कळून येईल. तो तपासनीसही प्रांतांत फिरणारे बहुतेक इतर स-

रकारी अंमलदार जसे फुकटखाऊ असतात, तसाच होता. त्यामुळें व शिवाय गोपाळरावाचा पोषाख, त्याची गाडी वगैरे श्रीमंती थाट व त्याचें गृहस्थाईचें व नम्रतेचें बोलणें हीं पाहून त्यानें त्याचें बोलणें कबूल केलें, व त्याच्या बागेंतील बंगल्यांत उतरावयास गेला. त्या ठिकाणीं गोपाळराव व रामभाऊ हे त्याचा आदरसत्कार व उठाबस करण्यास होतेच. शिवाय गोपाळरावानें एक आचारी, एक पाणक्या, दोन गडी, व एक शिपायासारखा पोऱ्या त्याच्या तैनातीस दिला. रात्रीस जेवणास मेजवानीचा थाट केला. ह्यांच्या मनांत त्याला अनुकूल करून घ्यावयाचा होताच, त्याकरितां ह्यांनीं त्याजपाशीं आपली वर्तणूक उत्तम प्रकारची ठेविली. त्याच्या तोंडांतून अमुक पाहिजे असें निघण्याचा उशीर, कीं तें तयार आहेच. शिवाय तो तपासनीस जातीचा सोनार होता, आणि अशा जातींच्या लोकांस बहुतकरून आपणास जातीच्या संबंधानें ब्राह्मणांनीं आपणासारखें मानावें, आपणाबरोबर खाण्यापिण्यास यावें, ह्या गोष्टींची फार उत्सुकता असते व ती पूर्ण होण्याचा प्रसंग आला असतां ते आपल्या पदरचा खर्च करण्यास देखील मागें पुढें पहात नाहींत. आणखी त्यांजबरोबर अशा रीतीनें वागणाऱ्या ब्राह्मणांवर ते लोभ करितात, असा साधारण नियम आहे. तेव्हां अर्थात हा तपासनीसही त्याच समजुतीचा होता. गोपाळराव व रामभाऊ ह्यांसही शास्त्राशास्त्र, भक्ष्याभक्ष्य ह्यांचा विधिनिषेध नव्हताच. त्यामुळें रात्रीं जेवणाखाण्याच्या वेळेस ते त्या तपासनिसास आपल्या पंक्तीस घेऊन जेवावयास बसले. जेवण झाल्यावर गोष्टी निघतां निघतां त्या तपासनिसानें ह्यांची वतर्णूक आपल्यास अनुकूळ अशी पाहिल्यावरून हळूच वारुणीपानाची गोष्ट काढिली, त्यानें गोष्ट काढिल्याबरोबर—ह्यांच्याकडून सर्व तयारी होतीच—बाटल्या

रिकाम्या करून पेले भरण्याचें काम सुरू झालें. यथेच्छ वारुणीपान झाल्यावर सर्वजण रंगांत आले. मोठमोठ्यानें बोलूं लागले, हंसू लागले व एकमेकांच्या गळ्यास मिठ्याही मारूं लागले! अशा रीतीनें तो तपासनीस थोडक्याच वेळांत ह्यांचा अगदीं जिवलग मित्र होऊन गेला.

दोन किंवा अधिक मनुष्यांचें सख्य पुष्कळ प्रकारांनीं व पुष्कळ द्वारांनीं होतें. परंतु हें कादंबरीसख्य जितकें लवकर जमतें तितकें दुसरें कोणत्याही रीतीनें जमत नाहीं. आपण एखाद्या मनुष्यावर पुष्कळ उपकार करावे, संकटसमयीं त्याच्या कामीं पडावें, त्याला मदत करावी; असें केलें असतां तो आपणावर जितकी प्रीति करील, व आपल्या ठिकाणीं जितका स्नेह ठेवील, त्यापेक्षां त्याच्याबरोबर फक्त एक दोन वेळां वारुणीपान केलेल्या मनुष्यावर तो अधिक प्रीति करील, व त्यांच्या ठिकाणीं स्नेहही अधिक ठेवील, हें खचित आहे. ह्याच रीतीनें त्या तपासनिसाचें व गोपाळराव, व रामभाऊ ह्यांचें एका रात्रींत उत्तम सख्य होऊन गेलें! दुसऱ्या दिवशीं सकाळीं तो तपासनीस नारायणरावाचे शाळेंत जाणार होता, परंतु रात्रीचें जागरण, अति मद्यपान व गोपाळरावाचा त्या दिवशीं शाळेंत न जाण्याविषयीं आग्रह, ह्यामुळें तो दुसरे दिवशीं शाळेंत गेला नाहीं. ह्या दिवशीं सकाळच्या प्रहरीं गोपाळरावानें चाहाकाफीची उत्तम तयारी ठेविली होती. व दोन प्रहरीं मेजवानीचा बेत केला. जेवण झाल्यावर तिघेही बिछान्यावर पडले असतां—

**रामभाऊ**—बिछान्यावर एकटेंच पडणें बरें वाटत नाहीं! कांहीं नाजूक साजूक जवळ असलें ह्मणजे बरें वाटतें!

**गोपाळराव**—खरें आहे! ‘ शयने स्त्रीरत्नानि ’ असें

टलें आहे तें कां खोटें ! (तपासनिसास) कां आपली ाहे का मर्जी !

तो तपासनीस कुटुंबाशिवाय आठ महिने बाहेर फिरणा- ा, व तरुण होता. तेव्हां ज्याप्रमाणें अशा प्रकारचे तरुण ानी मनुष्य सरकारी नोकरीवर असून एकटेच बाहेर फिरत ासले ह्मणजे इंद्रियजन्य सुखाविषयीं खाखावलेले असतात व ापली इच्छा तृप्त करण्याची कशीही संधि आली असतां ुकट जाऊं देत नाहींत, त्या प्रकारचाच हा तपासनीस अ- ल्यामुळें त्यानेंही तसाच विचार करून उत्तर दिलें–

'माझी मर्जी आपल्या बाहेर नाहीं.'

**गोपळराव**—ठीक आहे. रामभाऊ आज रात्रीं तज- वीज ठेवावयाची.

**गोपळरावानें** सांगितल्याप्रमाणें त्यानें त्या रात्रीं अखंड सुवासिनीस तेथें आणिलें व तिघेजणही सजोड झाले, व त्यांनीं ती रात्र खाण्यापिण्यांत व त्या वेश्यांबरोबर क्रीडा करण्यांत घालविली. ह्याप्रमाणें त्या तपासनिसाचे पाहुणचार झाल्यामुळें तो गोपाळरावाचा अगदीं बंदा गुलाम होऊन गेला. सकाळीं शाळेंत परीक्षा घ्यावयास जावयाचें, त्याच्या अगोदर सर्वजण चहा काफी घ्यावयास बसले असतां गोपाळरावानें नारायणरावाची गोष्ट काढिली. व तो उन्मत्त झाला आहे त्यानें एका गरीब ब्राह्मणाची मुलगी बापाच्या घरांतून काढून तिला आपल्या घरांत ठेवून तिच्याशीं लग्न लाविलें व दिवसभर तिचेच नादांत असल्यामुळें शाळेकडे तो अगदीं लक्ष देत नाहीं. कालपासून आपण येथें आहां तरी आपणास भेटावयासही आला नाहीं इत्यादि प्रकारच्या गोष्टी सांगून नारायणरावाविषयीं त्याचें मन अगदीं दूषित करून टाकिलें, व शेवटीं सांगितलें कीं, त्याचा आमचा अतिशय द्वेष आहे, व तो ज्या त्या ठिकाणीं आमची मान-

हानि करितो. आतां आपण आह्मास स्नेही ह्मणवितां त्यापेक्षां आमची मानहानि ती आपलीच आहे असें समजून त्याच्याविषयीं योग्य तजवीज करावी.

तो तपासनीस अविचारी, जगदनुभवशून्य व ह्यांचा गुलाम होऊन गेलेला असल्यामुळें, त्यानें लागलेंच सांगितलें ‘ कांहीं चिंता नाहीं आज त्याची खबर घेतों, व पुढें तुह्मीं सांगाल त्याप्रमाणें त्याला शिक्षा करीन. ’

चहा पिणें झाल्यावर तपासनीस साहेबांची स्वारी शाळेंत निघाली. गोपाळरावानें त्याच्या मनांत नारायणरावाविषयीं वाईट भरून दिलें होतेंच आणि शिवाय आज दोन दिवस आपण गांवांत आलों असतां आपल्या हाताखालचा नौकर नारायणराव आपणास भेटावयास आला नाहीं ह्याविषयींही त्याला फारच राग आला होता. वास्तविक पाहिलें असतां, हा तपासनीस गांवांत आला त्याच्या दुसऱ्या दिवशीं सकाळीं तो आल्याची बातमी नारायणरावास समजल्याबरोबर तो—जरी तो त्याच्या शत्रूच्या बंगल्यांत उतरला होता तरी—त्यास भेटावयास गेला. परंतु गोपारावाचा शिपाई त्याला बागेंतच जाऊं देईना तेव्हां नाइलाज समजून त्यानें एका चिठ्ठींत आपण भेटीस आल्याविषयींची हकीकत लिहून ती तपासनिसास द्यावयाकरितां एका गड्याजवळ दिली ती चिठ्ठी त्या गड्यानें रामभाऊजवळ दिली. त्यानें वाचून फाडून टाकिली, त्यामुळें ती तपासनिसास पोंचलीच नाहीं असा खरा प्रकार झालेला होता. अस्तु. वर सांगितल्याप्रमाणें तपासनीस साहेबांची स्वारी नारायणराच्या शाळेंत गेली. पूर्वीं सांगितल्याप्रमाणें त्याचें मन नारायणरावाविषयीं अगदीं वाईट झालेलें असल्यामुळें-त्याची शाळा जरी उत्तम स्थितींत होती, तरी ह्या तपासनिसानें त्या शाळेंतील अमुक एक गोष्ट बरी आहे इतकेंही ह्मटलें नाहीं इतकेंच नव्हे,

तर आणखी प्रत्येक गोष्टीस अगदीं वाईट ह्मटलें! शिवाय हात-पाय आपटणें, नारायणरावास, मूर्ख, गद्धा, लुच्चा, पाजी इत्यादि दुर्भाषणांनीं ताडण करणें, हा कारखाना चालला होता. अशा प्रकारचे उल्लू वरिष्ठ अधिकारी असले, ह्मणजे हाताखालच्या कामगारांच्या कामाची तपासणी कशी होत असते, हें आमच्या मार्मिक वाचणारांस सांगावयास नकोच. त्याप्रमाणेंच ह्या तपासनिसानें दोन कलाकांत एवढ्या मोठ्या शाळेची तपासणी केली. आणि हातपाय आपटीत फणफणत तेथून निघून गोपाळरावाच्या बंगल्यांत गेला. नारायणरावही त्याजबरोबर बंगल्यापर्यंत गेला. परंतु त्या तपासनिसानें तुह्मी येथून जा, आणि पुन्हां आमच्यासमोर येऊं नका असा हुकूम केला. नारायणरावानें 'माझी काय चूक असेल ती सांगावी, तिजबद्दल मी माफी मागतों.' इत्यादि पुष्कळ विनवण्या केल्या परंतु त्या निर्दय व उन्मत्त तपासनिसास दया आली नाहीं. त्यानें येथून निघून जा ह्मणून पुन्हां हुकूम केला. नारायणराव बिचारा गरीब ताबेदार पडला, तो काय करणार? नाइलाज समजून मुकाट्यानें निघून गेला. त्याला या जुलमी वर्तणुकीचा अतिशय संताप आला. परंतु गरीब मनुष्य नोकरींत असला आणि त्याचा मूर्ख व निर्दय वरिष्ठ त्याला अतिशय छळीत असला, तर त्या गरिबाच्या मनांत राग येऊन जसा त्या रागाचा कांहीं उपयोग होत नाहीं, घटकाभर ज्याचा त्याला मात्र त्रास होतो, तसेंच त्याच्या रागाचें झालें. हा चांगला सुशिक्षित असल्यामुळें, त्या तपासनिसाच्या दांडग्या व अपमानकारक वर्तणुकीचें त्याला फार वाईट वाटलें, तथापि आपली स्थिति मनांत आणून ईश्वरावर भरंवसा ठेवून त्याला स्वस्थ बसणें भाग पडलें.

दोन प्रहरीं जेवण झाल्यावर त्या तपासनिसानें शाळेंतील सर्व हकीकत गोपाळरावास सांगितली. व ह्मणालाः—

आतां ह्या नारायणरावाची काय तजवीज करूं ती तुह्मी सांगा. त्याला सहा महिनेपर्यंत सर्व पगार दंड करूं कीं अर्जीच निमे पगार करूं, कीं कमी पगारावर बदली करूं, कीं अगदींच बडतर्फ करूं, कीं बडतर्फ करून त्याजवर फौजदारींत खटला करूं? काय करूं तें सांगा. त्याप्रमाणें करण्यास मी तयार आहें.

**गोपाळराव**—आह्मीं त्याचा सर्वस्वी नाश करावा, असे जरी त्यानें आमचे अपराध केले आहेत, तरी आमचें मन त्याच्या सारखें दुष्ट नसल्यामुळें आह्मी त्याचा मोठाही नाश करूं इच्छित नाहीं. आपण आमचें काम करणार तर त्याची येथून सरासरी चाळीस पन्नास कोशांवर रानटी गांवांत वाईट हवेच्या ठिकाणीं बदली करावी. मग पगार कमी ज्यास्ती असला तरी कांहीं हरकत नाहीं.

**तपासनीस**—मग लिहूं आतां त्याला हुकूम? कीं तुमची बदली पेठ गांवीं केली आहे ह्मणून? तो गांव येथून आपण ह्मणतां तितका दूर आहे. व तेथें जाण्यास रस्ताही फारच अडचणीचा व वाईट आहे आणि तेथील हवा तर उंदीर देखील अजारी पडतील अशी आहे. तेथें वस्ती ह्मटली ह्मणजे कोळी कातवडी लोकांची! अशा ठिकाणीं सरकारानें शाळा ठेविली ह्मणजे काय? कीं त्या ठिकाणचे लोक अगदीं रानटी पशुतुल्य आहेत, ते वारंवार दंगाधोपा करितात, ह्याकरितां त्यांस विद्येची गोडी लागून त्यांनीं शिकावें व सज्ञान व्हावें, दंगेधोपे करूं नयेत ह्मणून त्या ठिकाणीं शाळा ठेविली आहे. त्या गांवांस ह्याची बदली करितों ह्मणजे झालें.

**रामभाऊ**—आपण सांगितलेलें ठिकाण आह्मांला पाहिजे तसें आहे. परंतु आपण त्यास इतक्यांतच बदलीचा हुकूम देऊं नये. तर पाऊसकाळ सुरू झाल्यावर जिकडे तिकडे पाऊस पडून नद्या ओढे वगैरे भरून गेले ह्मणजे त्या

संधीस त्याची बदली करावी असें आमचे मनांतून आहे.

**तपासनीस**—(गोपाळरावास) का रावसाहेब, भाऊ-साहेब ह्मणतात असेंच करावयाचें ना?

**गोपाळराव**—हो माझेंही मत तसेंच आहे.

**तपासनीस**—ठीक आहे, तसें करीन, आह्माला काय केव्हांही हुकूम देण्याला कांहीं अडचण नाहींच, आतां निघण्याची वेळ झाली.

**गोपाळराव**—आज आपण जाणारच ह्मणतां, त्यापेक्षां माझें कांहीं बोलणें नाहीं, आणखी एक दोन दिवस मुक्काम होता तर बरें झालें असतें, असो आपण तरी ताबेदार पडलां त्यामुळें मलाही फार गळ घालवत नाहीं, आपलें सदरस्टेशन येथून फार लांब आहे असें नाहीं, तेव्हां कधीं मनांत आल्यास भेट होण्यास कांहीं फार श्रम लागणार नाहींत, असो, आतां निघायचेंच ह्मणतां? आमच्या कामाची विस्मृति होणार नाहींच.

**तपासनीस**—विस्मृतीची गोष्टच बोलूं नका, मी ती गोष्ट आपल्या स्मरण-वहींत लिहून घेतली आहे, थोडकेच दिवसांनीं काम झालेलें आपल्या नजरेस येईलच.

ह्याप्रमाणें बोलणें झाल्यावर त्या तपासनिसानें ह्या मित्रयुग्माचा प्रेमपूर्वक निरोप घेतला, व गाडींत बसून दुसऱ्या गांवाकडे चालता झाला.

तो तपासनीस निघून गेल्यावर नारायणराव कांहीं दिवस सचित होता, परंतु तितक्या दिवसांत कांहीं हुकूम वगैरे आला नाहीं त्यामुळें त्याची चिंता कमी झाली आणि मन स्वस्थ झालें. इतक्यांत पावसाळा सुरू झाला. पर्जन्यानें जिकडे तिकडे झोड उठवून पाणीच पाणी करून सोडिलें. नद्या, ओढे ह्यांस मोठमोठे पूर येऊन ज्या ठिकाणीं जाण्यास चांगले रस्ते नाहींत व मधील नद्यांवर पूल नाहींत,

किंवा त्या उतरून जाण्यास नावा नाहींत अशा ठिकाणीं जाण्याचे मार्ग बहुतकरून बंद झाल्यासारखे झाले आहेत, अशा वेळीं " तुमची बदली पेठ प्रांतांत पेठ गांवच्या शाळेवर ९ रुपये बढतीवर करण्यांत आली आहे तर देखत-हुकूम कोणतीही सबब न सांगतां, आपल्या कामाचा सर्व चार्ज असिस्टंटजवळ देऊन नेमलेल्या ठिकाणीं जाऊन हजर व्हावें. हा हुकूम अमान्य केल्यास तुह्मास नोकरीवरून एकदम दूर केलें जाईल " असा तपासनिसाकडून नारायरावास हुकूम आला. हा हुकूम पाहून त्याला मोठी काळजी पडली व फार दुःख झालें, त्यानें हुकुमाप्रमाणें त्याच दिवशीं शाळेचा सर्व चार्ज असिस्टन्टचे स्वाधीन केला, व त्या दिवशीं दुःखित होत्साता घरीं आला. गोदावरीनें रोज घरीं येतात तेव्हां हंसतमुख असून आल्याबरोबर कांहीं तरी गोडसें बोलणें होत असतें तें आज नाहीं, मुख चिंतातुर आहे, असें पाहिलें. तेव्हां तिच्या पोटांतही धस्स झालें, परंतु ती तें बाहेर न दाखवितां लागलीच कांहीं फारळाचें घेऊन माडीवर गेली व रोजच्या क्रमाप्रमाणें त्याच्याजवळ बसून फराळाचें ताट पुढें ठेविलें आणि ह्मणाली;---

आज माझ्या सख्याचें कपाळबिपाळ का दुखतें आहे ? का भूक लागली आहे ! खरें काय झालें आहे !

**नारायणराव**---सखे, कपाळबिपाळ कांहीं दुखत नाहीं. आज एक मोठी दुःखाची गोष्ट झाली आहे. त्या दुःखानें व काळजीनें मला कांहीं सुचत नाहींसें झालें आहे.

**गोदावरी**---खरेंच कीं काय हें ! काय तें सख्या असें झालें ? मला नाहीं का सांगत ?

**नारायणराव**---लाडके, तुला सांगावयाचें नाहीं असें काय बरें आहे ? परंतु तें ऐकून तुला फार दुःख होईल ह्मणून बोललों नाहीं. हा पहा ( असें ह्मणून तपासनिसकडून

न आलेला बदलीचा हुकूम खिशांतून काढून तिच्या हातीं देतो. गोदावरी तो वाचिते. )

**गोदावरी**—( सभय ) हें काय असें ? असा कां हा हुकूम आला ? आपल्या हातून कांहीं चूकबीक का झाली?

**नारायणराव**—चूकबीक कांहीं नाहीं. हें त्या गोपाळरावाचें सगळें कंत्राट आहे. त्याचें आमचें तर बोलून चालून वांकडेंच पडलें आहे, आणि आमचा तपासनीस आला होता त्याला त्यानें आपल्या बागेंतील बंगल्यांत उतरावयास जागा देऊन, मेजवान्या, नाच रंग ह्यांची अगदीं चंगळ करून सोडिली होती, त्यामुळें अर्थातच तो तपासनीस त्याचा अगदीं गुलाम होऊन गेला होता. त्यावरून त्या गोपाळरावानें त्याला हें कृत्य करण्याविषयीं सांगितलें. दुसरें कांहीं नाहीं. आतां तें कांहीं असो, गेलें पाहिजे खरें. नोकरी सोडून तर नाहींना उपयोग ?

**गोदावरी**—भर पावसाचे दिवस आहेत, तेव्हां हुकूम फिरविण्याविषयीं कांहीं खटपट केली तर नाहीं कां चालणार?

**नारायणराव**—छेः तें कांहीं बोलावयास नको, त्या हुकुमावरून साफ दिसतच आहे. मुळीं मुद्दामच जें केलें, तें फिरविण्याविषयीं कोण ऐकणार? मला तेथें जाण्याचें कांहीं फारसें वाटत नाहीं; परंतु ह्या अशा दिवसांत नेमलेल्या ठिकाणीं जाण्यास चांगला रस्ता नाहीं, सर्व रानचा रस्ता. मध्यें लागणाऱ्या नद्या उतरण्यास पूल किंवा नावा नाहींत, गाडी, घोडें मिळण्याविषयीं बोलावयासच नको, कारण गाडी तेथें जात नाहीं आणि हल्लींच्या दिवसांत तेथें जाण्यास घोडें मिळावयाचें नाहीं. शिवाय ह्या दिवसांत त्या ठिकाणची हवा अतिशय वाईट असते. ह्या सर्व अडचणींमुळें तुला बरोबर कसें न्यावें हा मोठा विचार आहे, आणि मुख्यत्वेंकरून ह्याच गोष्टीबद्दल मला काळजी पडली आहे.

**गोदावरी**—ह्यांत काळजी करण्याचें कांहीं कारण नाहीं. तेथें जाण्यास कितीही अडचणी व कितीही संकटें आडवीं आलीं, तरी आपली वाट ती माझी वाट. जिकडे आपला जीव तिकडे माझा. आपल्यांना जें संकट तेंच मला संकट. मी आपली सुखदुःखाची सर्वस्वी भागीदारीण आहें. तेव्हां मला आपणाबरोबर येण्यास कांहीं संकट वाटत नाहीं. याकरितां मला बरोबर नेण्याच्या संबंधानें काळजी करावयास नलगे. आणि आपणावांचून मी येथें एकटीं कधीं रहाणार नाहीं.

**नारायणराव**–लाडके, ही का हट्ट धरण्याची वेळ आहे? पहा, तुला येथें ठेवून आपण जावें ह्यांत मला सुख वाटत आहे काय? आपणा दोघांमध्यें जर एक वस्त्राचा पदर किंवा फुलांची माळ आड आली तर ती आपणास सहन होणें कठिण पडतें, मग एवढाले मोठे डोंगर, पर्वत, अरण्यें नद्या ह्या मध्यें आड आलेल्या सहन होणें किती कठिण आहे हें मला समजत नाहीं काय? पण करावें काय? आधीं बायका माणसांना प्रवासांत नेणें कठिण. पाय वाटेनें तर त्याहून कठिण, आणि त्यांत हल्लीं मला ज्या ठिकाणीं जावयाचें, तशा ठिकाणीं—ह्मणजे जेथें जाण्यास रस्ते अगदीं खराब—नेणें तर फारच कठिण. त्यांतून उन्हाळ्याचे दिवस असते ह्मणजे कांहीं बरें असतें, पण अशा भर पावसाच्या दिवसांत नेणें ह्मटलें ह्मणजे बोलावयासच नको! ! ह्याकरितां मी ह्मणतों एवढें पावसाळ्याचे दोन महिने तुला येथें ठेवावें, आणि दोन महिन्यांनीं पाऊसकाळ संपला ह्मणजे लागलेंच घेऊन जावें.

**गोदावरी**—सख्या, तें सगळें खरें, पण एक दिवस जर आपण दिसलां नाहीं, तर माझा जीव व्याकूळ होतो, अन्नपाणी सुचेनासें होतें. मग हे वियोगाचे तीस आणि तीस

साठ दिवस मीं कसे घालवावे, ह्याचा आपण विचार करावा.

**नारायणराव**—मला तुझें तोंड एक दिवस दिसलें नाहीं तर तुझ्यासारखेंच करमेनासें होतें, हें तर तुला ठाऊक आहेना ? मग मीं तरी ते साठ दिवस तुजवांचून कसे कंठावे बरें ? एकमेकांच्या वियोगाचे दिवस घालविणें हें कठिण आहे खरें, पण इलाज नाहीं. त्याला काय करावें ? मन घट्ट करून कसे तरी दिवस लोटिले पाहिजेत.

**गोदावरी**—पण मी ह्मणतें वियोगाचे दिवस लोटावयास नकोतच. मला बरोबर न्यावी ह्मणजे सगळें झालें.

**नारायणराव**—छेः छेः तसें नव्हेग मी ह्मणतों मी जर अति दुःसह विरहदुःख दगडाचें हृदय करून दोन महिने सोसण्यास तयार होत आहें, तर तूंही त्याला अनुमोदन दे. सखे, पहा, तुला जर बरोबर नेण्याची सोय असती तर मीं काडीमात्र तरी मागें पुढें केलें असतें काय ?

**गोदावरी**—आपण ह्मणतां तें मी खोटें ह्मणत नाहीं, पण काय करूं ? जीव रहात नाहीं. काय करावें आणि काय न करावें हें कांहीं सुचत नाहीं. इकडे आड आणि तिकडे विहिर असें झालें आहे! बरोबर येईन ह्मणतें, तर जाण्याची सोय नाहीं ह्मणतां. घरीं राहीन ह्मटलें, तर आपणांवांचून एक घटका मला वर्षासारखी होईल. अन्नपाणी गोड लागणार नाहीं. शिवाय बरोबर आपल्या जिवाला कोणी जपणारें नसल्यामुळें आपले हाल होतील व माझ्याशिवाय आपणास करमणार नाहीं. येथें एकादे दिवशीं संध्याकाळीं शाळेंतून घरीं यावयाचें झालें आणि मी घरीं नसलें, तर आपणास वेड्यासारखें होतें, मग तेथें तर मी दोन महिन्यांत दृष्टीस पडावयाची नाहीं, मग कसें होईल ह्याची मला मोठी काळजी वाटते. ह्या विचारांनीं माझी अगदीं गाळण होऊन गेली आहे.

**नारायणराव**—प्रिये, ज्या गोष्टीला कांहीं उपाय नाहीं

त्या गोष्टीविषयीं दुःख करून कांहीं उपयोग नाहीं. मी तुला सुखानें सोडितों ? हाच विचार कर ह्मणजे झालें. उभयपक्षीं वियोग दुःख सारखेंच आहे.

असें बोलणें झाल्यावर दोघेंही जेवावयास गेलीं ह्यांचें जेवण आटपत आहे, इतक्यांत नारायणरावाचा मित्र वकील तेथें आला, नारायणरावानें त्याला तो हुकूम दाखविला त्यानें वाचून पाहिला आणि ह्मणतोः—

**वकील**—तुह्माला बहडती दिली आहे, पण ही बहडती घेऊन तेथें जाण्यास तुह्मी खुषी आहां कां ?

**नारायणराव**—पाहिजे होती कोणाला बहडती ? येथें ब.डतीला कोण सुजला होता ? पण ही देण्याचा हेतु ह्मणून इतकाच कीं, कोणीकडून तरी मला येथून काढावयाचा. तक्रार करण्यास जागा ठेवावयाची नाहीं. ह्मणून बहडती दिली असें दाखवावयाचें !

**वकील**—पण यंदा तपासनिसानें तुमच्याविषयीं वाईट रिपोर्ट केला होताना ? मग बहडती कशी देतो ?

**नारायणराव**—वाहवा! अहो ही बहडती नव्हे. मला ज्या ठिकाणीं नेमिलें आहे तें ठिकाण ह्मणजे पेठ प्रांत फार रानवट वस्तीचें व वाईट हवेचें असल्यामुळें तेथें जाण्यास, लहान पगारावर कोणी तयार होत नाहीं; त्यामुळें तेथें जरा अधिक पगाराची जागा ठेविली आहे इतकेंच. आजपर्यंत कितीएकांनीं त्या जाग्यावर नेमिल्यामुळें भडाभड नोकऱ्या सोडून दिल्या आहेत. पण प्रस्तुत मला तर तसें करवत नाहीं ! तेव्हां गेलें पाहिजे. त्यानें मला दिली ही बहडती ह्मणून नव्हे. शिक्षा ह्मणून दिली आहे.

**वकील**—मग तुह्मी आतां जाणार कीं काय ?

**नारायणराव**—न जाऊन कसें चालेल ? चाकरी करावयाची तर गेलें पाहिजे, नाहींतर सोडून द्यावी.

**वकील**--पण तुह्मी तपासनिसास लिहा कीं, हल्लीं भर पावसाळ्यांत मला जाण्यास सवड नाहीं व आज गेल्यानें माझें फार नुकसान होत आहे. शिवाय नेमिलेल्या ठिकाणीं जाण्यास हल्लीं वाटेच्या अडचणीही फार आहेत व त्या ठिकाणची हवाही फार वाईट आहे, तर मला बहडती दिली आहे ती न देतां मला येथेंच कांहीं दिवस राहूं द्यावें.

**नारायणराव**--त्या लिहिण्याचा कांहीं उपयोग व्हावयाचा नाहीं. कारण त्या तपासनिसानें मुद्दाम समजून उमजून गोपाळराव व रामभाऊ ह्यांच्या नादीं लागून माझी अशा दिवसांत अशा ठिकाणीं बदली केली आहे. तेव्हां तो माझ्या ह्मणण्याकडे लक्ष कशाला देईल ? बरें त्याच्या विरुद्ध तक्रार करून त्याच्या वरिष्ठाकडे लिहावें, तर ह्याला राग येणार. बरें आला तर येऊं द्या, असें ह्मणून तसेंच नेटानें लिहावें तर सरकारचा असा कांहीं चमत्कारिक नियम आहे कीं, ज्या कामगाराच्या मताविरुद्ध एकादा अर्ज किंवा एकादी तक्रार वरिष्ठ अंमलदाराकडे करावयाची, तो अर्ज किंवा ती तक्रार ज्याच्या विरुद्ध असेल त्याच्याच द्वारें पाठविली पाहिजे. त्याच्या द्वारें पाठविली ह्मणजे तो बहुतकरून ती मध्येंच दाबून टाकितो; पुढें पाठवीतच नाहीं. कदाचित् पाठविली तरी त्याबरोबर अर्जदाराच्या अर्जाविरुद्ध किंवा तक्रारीविरुद्ध पाहिजे तितकें खोटें नाटें लिहावयाचें ! मग ह्याच्या अर्जाचा वरिष्ठ अंमलदाराकडे उपयोग तो काय होणार ? तो अर्ज कदाचित् वरिष्ठ अंमलदाराकडे गेलाच तर त्याच्या कचेरींतील कारकून वगैरे ह्या खालच्या अंमलदाराचे बांधलेले असल्यामुळें ते मध्येंच तो नाहींसा करून टाकितात. आणखी बहुतेक मोठमोठे अंमलदार आपल्या हाताखालच्या कामगारांनीं त्यांच्या हाताखालच्या गरीब नोकरांवर कितीही जुलूम केला तरी त्या गरीब नोकरांची

दादच घेत नाहींत. आपल्या हाताखालच्या कामगारांनीं केलें तें उत्तमच केलें असें ह्मणून, ह्या गरीब नोकरांचा अर्ज झोंकून देतात. वरिष्ठ प्रतीचे कामगार ह्मणजे सर्व सुगुणसंपन्न! अशी सरकारची ठरीव समजूत असावी असें वाटतें ! तशी समजूत ठेवणें हें ठीक, पण त्या समजुतीच्या विरुद्ध प्रकार घडून येत असतां, व त्यापासून गरिबांवर अतिशय जुलूम होत असतां त्याची दाद घेत नाहीं, हा मोठा अन्याय आहे. पण त्याला करणार काय? निरुपाय, ह्मणून होईल तें नुकसान सोसून स्वस्थ बसावें. दुसरा कांहीं इलाज नाहीं. त्याप्रमाणेंच मीं जरी आमच्या तपासनिसाविरुद्ध वरिष्ठ कामगाराकडे तक्रार केली, तरी तिचा परिणाम मीं सांगितल्याप्रमाणेंच व्हावयाचा! हें आपणास माहित असून "दांत चावून अवलक्षण" ह्यासारखें कशाला करा? हुकुमाप्रमाणें नेमलेल्या ठिकाणीं जाण्याचा विचार करावा हें चांगलें.

**वकील**—मग कधीं निघण्याचा विचार केला आहे? गोदावरीस बरोबर नेणार कीं काय?

**नारायणराव**—उद्यांच निघावयाचा बेत आहे. तिला तूर्त बरोबर नेतां येत नाहीं. कारण तेथें ह्या दिवसांत बायकांस नेण्याची सोय नाहीं. ह्याकरितां दोन महिन्यांनीं मागाहून नेईन, तेव्हां पावसाळाही जाईल मग कांहीं अडचण राहणार नाहीं. तिला येथें ठेवून जाणें तरी कठिणच. परंतु तुह्मी आहां ह्मणून ठेवण्याची तजवीज करावयाची. मी आतां तुह्माकडे येणारच होतों. इतक्यांत तुह्मीच इकडे आलां. तुह्माला आमची सर्व स्थिति ठाऊक आहेच. आमचे दुष्ट कोण, सुष्ट कोण,त्यांच्या माझ्या वांकडेपणाचा हेतु काय,हेंही तुह्मास ठाऊक आहे. शिवाय ती तर तुह्मी प्रत्यक्ष बहीणच मानिली आहे. तेव्हां मागें सांभाळ करण्याविषयीं कांहीं विशेष सांगावयास नको.कारण तुमच्या आमच्यामध्यें तसा भाव नाहींच

**वकील**—त्याविषयीं तुह्माला काळजी नको. **गोदावरी**-च्या केंसाला धक्का, तो माझ्या जिवाला धक्का, असें समजून मी तिचा बहिणीप्रमाणें सांभाळ करीन. तुह्मीही पुढें तिला न्यावयास येणार ह्मणतां तर तसें न येतां सहा महिन्यांची रजा—मग ती कशीही मिळो—घेऊन या आणि येथें ते सहा महिने वकिलीच्या परीक्षेचा अभ्यास करा. तुह्मी बुद्धिवान् आहां तुह्माला तो अभ्यास कांहीं कठिण जाणार नाहीं. एकदां ती परीक्षा उतरली, ह्मणजे कोणाची ताबेदारी करावयास नको.

**नारायणराव**—हा बेत चांगला आहे. आतां तेथें जाऊन थोडे दिवस झाले, ह्मणजे तें रजेचेंच प्रकरण चालवितों. भर पगार कापून रजा दिली तरी चिंता नाहीं. मग वकिलीच्या परीक्षेचा अभ्यास करून पाहूं. पण रजा मिळण्यास तरी अजून दोन महिने लागतील. तेथपर्यंत तुह्मीं सर्व सांभाळ केला पाहिजे, व होईल तितकें करून लवकर लवकर पत्र पाठवून समाचार कळविला पाहिजे.

**वकील**—तुह्मी बेफिकीर असा. ह्मणाल तर **गोदावरी** व आत्याबाई ह्यांस आपल्या घरीं देखील नेऊन ठेवीन, व तुह्माला प्रत्येक चवथ्या दिवशीं पत्र पाठवीन. तुह्मीं **गोदा**-वरीस किती दिवसांनीं पत्र पाठविण्यास सांगितलें आहे ? दररोज एक, कीं दिवसांतून दोन ?

**नारायणराव**—दिवसांतून चार ! तुह्मी आपलें कांहीं तरी बोलतां ! असो आतां सकाळीं भेट होईलच. तो मित्र निघून गेल्यावर मग **नारायणराव** व **गोदावरी** हीं एकांतीं बसलीं असतां, त्यानें तिला मांडीवर घेतलें. तीं एकमेकांचे खांद्यांवर हात टाकून आनंदानें विडा खात एकमेकांकडे प्रेमपूरित नजरेनें पहात बसलीं आहेत इतक्यांत—

**गोदावरी**—सख्या, उद्यां मी अशी कोणाच्या मांडी-

वर बसूं ! मला तोंडांतील विडा कोण देईल ? मजजवळ गोड गोड गोष्टी कोण सांगेल ? मी कांहीं तरी निमित्त काढून बळेंच कोणावर रुसूं ? मला उद्यां कसें करमेल तें नकळे. असा वियोग होण्यापेक्षां हा जीव जाता तरी बरें होतें.

**नारायणराव**—( तिची हनुवटी धरून ) लाडक्ये हें काय बरें असें भलतेंच बोलतेस ! तुझ्यासारखें मला नाहीं-का वाटत ? मी उद्यां कोणाला मांडीवर घेऊं ? तोंडांतील अर्ध्या विड्यासाठीं मजबरोबर कोण भांडेल ? उगीच रुसू-न बसल्यावर ओ हो हो ! केवढा तरी राग हा ! पुरें तें आतां रुसणें ! असें मी कोणाला ह्मणूं ? अशा पुष्कळ गोष्टी माझ्या मनांत येऊन मला देखील फार दुःख होतें. पण करावें काय ? "आलिया भोगासी असावें सादर" ह्या वाक्याकडे लक्ष देऊन मनाचें समाधान करावयाचें ! एवढे दोन महिने कसे तरी घालविले पाहिजेत खरे. अशा प्रकारच्या गोष्टी झाल्यावर तीं दोघें एकमेकांस प्रेमालिंग-न देऊन झोंपीं गेलीं.

**गोदावरीनें**—पहाटेस लवकर उठून जेवणाची तयारी केली. **नारायणरावानें** स्नान करून भोजन आटोपून बरो-बर नेण्याच्या सामानाचें बोंचकें बांधिलें, आणि **गोदाव-रीची** रजा घेण्याकरितां तिजजवळ गेला. तिनें त्याच्या तों-डांत विडा दिला, व त्याला मिठी मारून स्फुंदस्फुंदून र-डूं लागली. त्याचे डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. अ-शा स्थितींत कोणाच्यानेंच कांहीं वेळ बोलवलें नाहीं. नंत-र कांहीं वेळानें **नारायणरावानें** आपले व गोदावरीचे डोळे आपल्या उपरण्याच्या पदरानें पुसून ह्मणालाः—

"प्राणसखे, आतां जाण्याची वेळ झाली, तुला कांहीं अधिक उणें सांगावयास नकोच. तुला सर्व ठाऊक आहे व तूं शहाणी आहेस. बेतानें जपून वाग. कांहीं करणें झा-

ळें, तर वकील साहेबांच्या विचारानें कर. बाहेर जाणें येणें बेतापुरतेंच असूंदे. एक दोन दिवशीं पत्र पाठवीत जा. आतां येतों." असें सांगून गोदावरीस पोटाशीं धरून अनेक वार तिचें चुंबन केलें. गोदावरीनेंही त्याचें चुंबन घेण्याचा प्रयत्न केला, परंतु तिचे ओंठ थरथरत असल्यामुळें तो सिद्धीस गेला नाहीं. नंतर नारायणराव माडीवरून निघून खालीं आला. त्याचा मित्र वकील व दुसरे एक दोन स्नेहीही त्याजकडे आले होते. त्यानें देवास नमस्कार करून आत्याबाईस नमस्कार केला. नंतर आपल्या मित्रांस नमस्कार करून आतां येतों, मागें संभाळा, असें बोलून चालूं झाला. आत्याबाई घराबाहेर शेंपन्नास पावलें पोंचवावयास गेली. त्याचे मित्रही कांहीं अंतरावर पोंचवून त्याचा निरोप घेऊन मागें फिरले. गोदावरी नारायणराव दिसेनासा होईपर्यंत माडीच्या खिडकींतून त्याजकडे पहात होती, व तोही वारंवार तिजकडे पहात होता. शेवटीं त्यानें मानेनें (जातों) अशी खूण करून पुढें चालूं लागला, व तीही तो अश्रूंनीं भिजलेला चेहेरा पुसून आपल्या खोलींत गेली.

**नारायणराव** वाटेनें हाल भोगीत भोगीत, निघाल्यापासून दहावे दिवशीं नेमलेल्या ठिकाणीं पोहोंचला, व त्यानें तेथील जाग्याचा चार्ज घेतला. तेथें पोहोंचल्याबरोबर घरीं आपल्या प्रिय पत्नीस व आपल्या मित्रास पत्र पाठवावयाचें, परंतु त्या गांवांत पोस्टहापीस नव्हतें. तेथून दहा बारा कोशांवर तालुक्याचें ठाणें होतें, तेथें पोस्टहापीस होतें. तेथून आठ पंधरा दिवसांनीं पोस्टाचा शिपाई लखोटे वांटावयास येत असे, व त्याप्रमाणें तेथून कोठें बाहेर पत्र पाठवावयाचें झालें तर नारायणरावाची नेमणूक झाली होती त्या गांवांत लखोटे टाकण्यास एक पेटी होती, तींतून आठ पंधरा दिवसांनीं पोस्टाचा शिपाई लखोटे घेऊन जात असे. हीं पत्रें जाण्याये-

ण्याची गैर सोय पाहून नारायणरावास फार वाईट वाटलें. परंतु निरुपाय समजून स्वस्थ बसावें लागलें. त्यानें आपल्या पत्नीस व मित्रास तेथें पोंचल्याबरोबर पत्रें लिहिलीं होतीं, परंतु तीं पोस्टाचा शिपाई येईपर्यंत आठ दहा दिवस तेथेंच राहिलीं हो ाी. त्यानें त्यांत तेथील पत्रें जाण्यायेण्याचे अडचणीविषयीं लिहिलें होतें, व एक दोन दिवसांनीं पत्रें न पाठवितां आठ दहा दिवसांनीं पाठवीत जावीं असेंही त्यांत सुचविलें होतें.

त्या ठिकाणीं नारायणरावास बिलकूल करमत नसे. कारण तो गांव रानटी लोकांच्या वस्तीचा होता. शिवाय त्याच्या मनाचें समाधान करण्यासही जवळ कोणी नव्हतें. त्यामुळें त्याचा वेळ फार कंटाळवाणा जाई, ह्याकरितां वेळ जावा ह्मणून तेथें रहाणारे कोळी, भिल्ल वगैरे लोक होते, त्यांजपाशीं पट्टा खेळणें, तीर मारणें, बंदूक मारणें, ह्या गोष्टी तो शिकूं लागला. शाळेच्या वेळाशिवाय रिकामा वेळ तो वरील गोष्टीच्या अभ्यासांत घालवीत असे. ह्याप्रमाणें त्या ठिकाणीं तो आपल्या प्रियेच्या वियोगाचे दिवस काढीत होता.

---

## भाग ८ वा.

आतां वाचकांस गोदावरीकडील हकीकत कळवितों. नारायणराव पेठेस निघून गेल्यावर रामभाऊनें आपला हेतु सिद्धीस जाण्यासाठीं गोदावरीचे दारावरून नेहेमीं जात असावें, व त्या रस्त्यावर उगीच इकडून तिकडे खेपा घालून कोणाशीं तरी मोठ्यानें बोलत असावें! अशासाठीं कीं तें ऐकून, बाहेर रस्त्यांत कोण मोठ्यानें बोलतें, हें पहाण्या-

करितां तरी ती खिडकींतून तोंड बाहेर काढील आणि तेणें-करून तिचें आपणास दर्शन होईल. परंतु तें कांहीं साधत नसे. एके दिवशीं तो रस्त्यांतून फिरत असतां पोष्टाचा शिपाई नारायणरावाच्या घरांतून, हंसतमुख कांहीं बोलत बाहेर आला. तो ह्यानें पाहिला. तेव्हां ह्यानें, त्याला जवळ बोलावून " काय हो शिपाईबोवा हांसतसे बाहेर आला ? काय झालें ? कोणापाशीं काय बोलत होतां हो ? " असें विचारलें.

**शिपाई**—नाहीं ती नारायणरावांची बायको, त्यांच्या नवऱ्याचा कागद आज पंधरा वीस दिवसांत आला नव्हता, ह्मणून फार काळजी करीत होती. तो आज कागद आला, तेव्हां त्यांना फार आनंद झाला, आणि त्यांनीं मला एक आणा दिला, आणि सांगितलें कीं, जेव्हां तिकडून कागद येईल, तेव्हां लौकर आणून देत जा. तेव्हां मीं सांगितलें कीं ठीक आहे बाईसाहेब, पत्र आल्याबरोबर तुह्मांस आणून देईन.

**रामभाऊ**—हात्तिच्या ! एक आणा दिला, त्यानेंच कां तूं इतका खुषी झालास.

**शिपाई**—भाऊ साहेब मला गरिबाला काय एक आणा देखिल पुष्कळ आहे. तेवढ्यानें माझी चार दिवसांची भाजी सुटेल !

**रामभाऊ**—बरें आहे. मला देखील एक असेंच पत्राविषयीं काम तुला सांगावयाचें आहे. तें केलेंस तर तुला एक आणा तर काय, पण एक रुपया किंबहुना दोन तीन रुपये देखील मिळतील.

**शिपाई**—मला गरिबाला काय ? कोणी तरी आपल्या सारख्यानें पोटाला दिलें, तर माझ्या हातून होण्यासारखें असेल तें काम मी करीन.

**रामभाऊ**—बरें आहे. उद्यां मला मजकडे येऊन भेट. ह्मणजे काय सांगयाचें तें मी तुला सांगेन.

**शिपाई**—बरें उद्यां सकाळीं आठ वाजतां आपणाकडे येतों. आतां राम राम.

हें वरील बोलणें झालें त्याच दिवशीं संध्याकाळीं **रामभाऊ** व **गोपाळराव** ह्यांचें खालीं लिहिल्याप्रमाणें बोलणें झालें:—

**गोपाळराव**—कां रामभाऊ, काम येतें कीं नाहीं ताळ्यावर ? तुझ्या मसलतीप्रमाणें नारायणरावाला तर येथून घालविलाच! आज त्याला जाऊन सरासरी वीस बावीस दिवस झाले असतील, तरी अद्यापि कांहींच दाद लागत नाहीं हें काय!

**रामभाऊ**—अगदींच दाद लागत नाहीं असें नका समजूं. आज चार पांच दिवस ती मजकडे पाहून जरा हसूं-बिसूं लागली आहे. तिला मी तुमचा मित्र हें ठाऊक आहे. तसेंच काल मी तुमच्या धमनीगाडींत बसून तिच्या दारावरूनच फिरावयास गेलों. तेव्हां गाडीचा आवाज ऐकून ती आपल्या माडीच्या खिडकींत आली, व बाहेर तोंड काढून उत्कंठेनें गाडींत कोण आहे तें पाहूं लागली ! त्या वेळेस तुह्मी गाडींत असतां तर बरें झालें असतें ! तसेंच परवां ती देवदर्शनास जात होती, तेव्हां मीहि तिच्या मागून गेलों; आणि तिला ऐकूं जाई अशा स्वरानें जसें कोणाजवळ बोलतच आहें अशा रीतीनें "अरे गोपाळरावजींना काय ! ते अशा रत्नाला एका घटकेसाठीं हजार रुपये देखील देतील" असें बोललों. तेव्हां ती हळूच खालच्या मानेनें वांकड्या नजरेनें मजकडे पाहून जरा हंसली. तेव्हां मी लागलाच तिच्या जवळ जाऊन बोलणार होतों, परंतु इतक्यांत ती देवळाजवळ पोहोंचली. येतांना बोलावें ह्मणून वाटेवर उभा राहिलों होतों. परंतु ती परत आली ते-

व्हां तिजबरोबर दोन तीन बायका होत्या, त्यामुळें बोलण्यास सवडच झाली नाहीं.

**गोपाळराव**--अरे वाः ! इतक्या थरास ही गोष्ट येऊन, तूं मला कशी कळविली नाहींस ? हें तर बहुतेक काम झाल्यासारखेंच दिसतें !

**रामभाऊ**--तें खरें, पण मीं ह्मटलें कीं इतक्यांतच आपल्याला कशाला कळवा ? पुरें काम होऊन वेळ आणि स्थळ, ह्यांची योजना झाली ह्मणजे आपणांस कळवावें असा माझा हेतु होता, परंतु आज एक दोन दिवस तुमच्या मनःप्रियेची तबेत जराशी फिरल्यासारखी दिसली. त्याच्या कारणाचा आज दोन दिवस तपास करीत होतों.

**गोपाळराव**--काय ! तबेत फिरली ? ती कां ? कारण काय झालें ? कांहीं समजलें कीं नाहीं ?

**रामभाऊ**--समजलें तर काय झालें ! कारण मिळून इतकेंच कीं, नारायणराव तिकडे गेल्यावर तिच्या मनावरचा प्रतिबंध कमी होऊन, तिच्या मनांत मजा मारण्याचें येत होतें. इतक्यांत तिला त्याचीं दोन पत्रें आलीं. तीं नारायणरावानें लिहिलेलीं पत्रें ! तीं गोड व रसभरित असावयाचींच ! तीं पाहिल्यावर तिचें कोमल मन द्रवलें असावें. आणि तिच्या मनांत जो कांहीं आपल्याविषयीं विचार आला असेल तो गेला असावा. आणखी त्याचीं पत्रें ह्मटलीं ह्मणजे त्यांत आमच्या विरुद्ध गोष्टींचा सुकाळ असावयाचाच ! त्यामुळें आज एक दोन दिवस पूर्वी जो रंग दिसत होता तो जरा कमी झाला आहे. अशा बायका आधींच मर्यादशील असतात, त्यामुळें त्यांच्या मनांत जरी एखादी गोष्ट पूर्णपणें भरलेली असली, तरी त्या ती बाहेर दाखवीत नाहींत. तसेंच एखाद्या पुरुषाविषयीं जरी त्या रात्रंदिवस झुरत असल्या, तरी तें बाहेर बिलकुल दिसूं देत

नाहींत. असाच हा खटला आहे त्यामुळें आज दोन दिवसांत कांहीं बोलावयास साधलें नाहीं.

**गोपाळराव**—मग ह्या गोष्टीला काय उपाय करावयाचा तो तूंच शोधून काढ. सर्व काम तुजवर सोंपविलें आहे.

**रामभाऊ**—मी उपाय काढल्याशिवाय राहिलों नाहीं. मी त्या पोष्टाच्या शिपायाजवळ संधान लाविलें आहे. त्याजकडून **नारायणरावांचीं गोदावरीस** व त्या वकिलास जीं पत्रें येतील तीं, व **गोदावरी** व वकिल ह्यांजकडून **नारायणरावास** जातील तीं, पत्रें पोष्टांतून काढून घेण्याची तजवीज करणार आहें. अशीं एकमेकांचीं पत्रें एकमेकांस येत नाहींतशीं झालीं ह्मणजे **गोदावरी** व **नारायणराव** ह्यांच्या मनांत एकमेकांच्या इमानीपणाविषयीं संशय येऊं लागेल. इतक्यांत आपण एक बाई तयार करून तिला,—ती **नारायणरावाच्या** गांवाकडून आली असा बहाणा करून **गोदावरीकडे** पाठवूं. व तिजकडून तिच्या मनांत असें भरवून द्यावयाचें कीं, **नारायणरावानें** तिकडे एक अंगवस्त्र ठेविलें आहे; व त्याची तुजवरची प्रीति उडाली आहे! तिनें हें ऐकिलें ह्मणजे तिचें मन त्याच्याविषयीं विटेल व त्याचा तिला त्रास येईल. मग ती आपल्याकडे वळण्याला किती उशीर? कां कसा बेत आहे?

**गोपाळराव**—अरे तूं जो बेत करशील तो भलतासा असावयाचाच नाहीं! ती पत्रांची व्यवस्था मात्र नीट करून टाक.

**रामभाऊ**—त्याची तुह्माला काळजी नको. मी ती सर्व तजविज यथास्थित करितों. त्या शिपायाला मात्र दर एक पत्रास एक रुपाया दिला पाहिजे.

**गोपाळराव**—अरे दिला पाहिजे तर दे! ह्या कामांत तूं जे पैसे खर्च करशील, त्याला माझें पूर्ण संमत आहे असें समज.

गोपाळराव व रामभाऊ ह्यांचें हें बोलणें झाल्यावर दुसऱ्याच दिवशीं रामभाऊनें त्या पोष्टाच्या शिपायाशीं संधान बांधून तीं पत्रें नाहींतशीं करण्याचें त्याजपासून कबूल करून घेतलें, व त्याबद्दल दर पत्रास आठ आणे देण्याचें कबूल केलें.

अशा रीतीनें एकमेकांचीं पत्रें एकमेकांस पोंचत नाहींतशीं झाल्यावर, गोदावरी व तो वकील हीं नारायणरावाविषयीं काळजी करूं लागलीं. तिकडे नारायणरावही ह्यांच्याविषयीं काळजी करूं लागला. गोदावरीनें पोष्टाच्या शिपायास नारायणरावाच्या पत्राविषयीं रोज विचारावें. तेव्हां त्यानेंही "बाईसाहेब तिकडून आतांशीं महिन्या महिन्यांतही पत्रें येत नाहींत, कारण तिकडे जाण्यास मध्यें नद्या ओढे आडवे असल्यामुळें, व हल्लीं तर ते अगदीं भरून गेले असल्यामुळें, तिकडे पोष्टाचे शिपाई फारसे जातच नाहींत. शिवाय थोडक्याच दिवसांपूर्वी एका नदींत एक दोन डांका वाहून गेल्या. त्यांत कदाचित् तुमचीं पत्रें असतील, तर तीं गेलीं असतील," अशा थापा देत असे. गोदावरी मोकळ्या मनाची असल्यामुळें तिलाही त्या खऱ्या वाटत, व त्या वकिलासही तें कांहींसें खरें वाटे, परंतु ती रात्रंदिवस पत्रासाठीं काळजींत पडलेली असे. नारायणरावाकडे मुद्दाम गडी पाठवावा,तर अशा दिवसांत कोणी जाण्याला तयार होईना. ह्यामुळें तिला तसेंच काळजी करीत रहावें लागलें.

मागें सांगितल्याप्रमाणें रामभाऊनें गोदावरीचें मन वळविण्याकरितां तिच्या किंवा तिच्या जवळच्या माणसांच्या ओळखीची नाहीं अशी एक कुंटणीचा धंदा करणारी विधवा बाई पाहिली. तिला एक लुगडें घेऊन दिलें व आमचें काम झाल्यावर आणखी चांगलें बक्षीस देऊं असें कबूल केलें. तिला गोदावरी व नारायणराव ह्यांची सर्व हकीकत सांगित-

ली, व गोदावरीचें मन नारायणरावरून उठून आपणाकडे (गोपाळरावाकडे) वळण्याकरितां काय युक्ति, व कसा बहाणा केला पाहिजे व कसें बोललें पाहिजे हेंही तिला समजावून दिलें. त्या विधवेनेंही, आपण हें काम खचित सिद्धीस नेऊं असें सांगितलें. कुंटणी बायका कोणत्या प्रकारच्या असतात, हें आमच्या वाचकांस फोडून सांगण्याची जरूर दिसत नाहीं.

वर सांगितल्याप्रमाणें बेत झाल्यावर दुसरे दिवशीं संध्याकाळीं सूर्यास्ताच्या सुमारास, ती विधवा—एक मळकटसें पांढरें पातळ नेसली आहे, अंगावर एक पातळाची चौघडी घेतली आहे, डोकीवर पांढऱ्या धाबळीची खोळ घेतली आहे, गळ्यांत तुळशीच्या मण्यांची माळ, कपाळीं गोपिचंदनाचा टिळा, हातांत एक बोचकं, व दुसऱ्या हातांत एक उंचशी बांबूची काठी, अशा थाटानें—नारायणराव मास्तरचें घर विचारीत विचारीत त्याचे घरीं आली. कोणी बाई आपलें घर विचारीत आहे, असें ऐकून गोदावरी ओसरीवर आली, तिनें त्या विधवेस या बसा केलें. ती बाई थोडा वेळ बसल्यावरः—

**गोदावरी**—आजीबाई, तुह्मी कोठून आलांत ?

**विधवा**—मी यात्रेकरू सर्व काळ देश फिरत असतें फिरतां फिरतां पेठ तालुक्यांत एक देवी आहे, तिच्या दर्शनास तिकडे गेलें होतें. तेथें चार सहा दिवस राहिलें होतें तेथें एक नारायणराव ह्मणून मास्तर आहे, त्याची माझी सहज ओळख पडली होती. मी जेव्हां तेथून निघालें तेव्हां मी वसईवरूनच जाणार असें त्यास समजलें, तेव्हां त्या सांगितलें कीं बाई, तुह्मी वसईवरून जाणार आहां, ज गांवांत गेलां तर माझ्या घरीं उतरावयास जा, व माझी शाली घरीं कळवा. तेव्हां मी आज येथें आलें, ती धर्मशाळेंतच उतरणार होतें. पण इतक्यांत त्यानें सांगितलेल्या ग

ष्टीचें स्मरण झालें ह्मणून तुमचें घर विचारीत विचारीत येथें आलें. (गोदावरीस) मुली, नारायणरावजींची तूंच का बायको?

**गोदावरी**—( मानेनें 'होय' ह्मणते. )

**विधवा**—अगबाई, तूं तर चांगली न्हातीधुती बायको दिसतेस? मला वाटलें होतें कीं, तूं अगदीं लहान असशील! मग हें कसें?

**गोदावरी**—आजीबाई, हें कसें तें काय? मी लहान असेन असें तुह्माला कशावरून वाटलें होतें?

**विधवा**—नाहीं तें आपलें उगीच वाटलें. पण आधीं ह्या गोष्टी राहूं द्या. मग रात्रभर पाहिजे तर बोलत बसूं. आधीं मला माझ्या बाळकृष्णाला धूपदीप करूं दे. असें ह्मणून ती उठली आणि हातपाय धुवून सोंवळें नेसून तिनें बाळकृष्णास धूपदीप केला. इतक्यांत त्या विधवेनें मी रात्रीं धान्य-फराळ करीत नाहीं असें सांगितल्यावरून गोदावरीनें तिला एक पेलाभर दूध प्यावयास दिलें तें तिनें प्यालें. नंतर हातांत तुळशीच्या मण्यांची माळ घेऊन थोडा वेळ जप करीत बसली. जप आटोपल्यावर गोदावरीस हांक मारून ह्मणाली, मुली, माझें आटोपलें. आतां तुला काय विचारावयाचें तें विचार.

**गोदावरी**—विचारावयाचें ह्मणून फारसें कांहीं नाहीं. तिकडील खुशाली विचारावयाची, आणि मघां तुह्मीं बोलतां बोलतां ह्मटलें होतें कीं, 'तूं ( मी ) अगदीं लहान असशीलसें मला वाटलें होतें, मग हें कसें!' तर ह्मणतें तसें तुह्माला कशावरून वाटलें होतें, व 'मग हें कसें' तें काय?

**विधवा**—खुशालीविषयीं ह्मणशील, तर नारायणराव चांगला खुशाल आहे. त्याची कांहीं काळजी करावयास नको. त्याला तेथें कोणत्याही गोष्टीची अडचण ह्मणून नाहीं. आतां तूं लहान असशील असें मला कशावरून वाटलें होतें,

असें मला तूं विचारतेस, तर त्याविषयीं मला कांहीं अधिक सांगतां येत नाहीं. इतकेंच सांगतें कीं, त्याची जी मीं तेथें वर्तणूक पाहिली, तिजवरून त्याची बायको अगदीं लहान किंवा वेडीविद्री कुरूप असावी असें मला वाटलें होतें. पण येथें आतां पहातें तर तूं चांगली ( बायको ) पणांत आलेली, गोरी गोमटी सुरेख बायको दिसतेस, ह्मणून मला फार आश्चर्य वाटलें, व माझ्या तोंडांतून तूं ऐकिलेस ते शब्द निघाले. तरी त्याविषयीं तुला कांहीं वाटावयास नको. माझा स्वभाव भोळवट ह्मणून सहज बोलून गेलें.

**गोदावरी**—मी त्याविषयीं कांहीं मनांत आणीत नाहीं, आणि मनांत आणणें योग्यही नाहीं. पण तुमचें बोलणें संशय येण्यासारखें दिसलें. ह्मणून िचारावेंसें वाटलें.

**विधवा**—एखाद्या मनुष्याचें मन त्याला कोणत्याही प्रकारें न शोभे अशा वस्तूच्या ठिकाणीं जर लुब्ध झालेलें पाहिलें, तर त्या जातीची वस्तु त्याला कधीं मिळाली नाहीं किंवा त्याच्याजवळ नाहीं, असा आजमास करण्यास कांहीं हरकत नाहीं. हाच आजमास मीं केला होता. त्यावरून मघां बोललेले शब्द माझ्या तोंडून निघाले.

**गोदावरी**—आजीबाई, मी तुमच्या बोलण्याचा कल कांहींसा समजलें आहें. पण काय असेल तें तुह्मी एकदां उघड सांगाल तर बरें होईल. मग त्याच्या खरे खोटेपणाविषयीं किंवा बरें वाईटपणाविषयीं विचार करण्यास ठीक पडेल. असें मुग्ध समजल्यानें जिवास चुरचूर मात्र लागते.

**विधवा**—खरी गोष्ट उघड सांगण्यास माझें काय जातें? पण ती गोष्ट ऐकून तुला फार वाईट वाटेल ह्मणून सांगत नव्हतें. आतां तुझा आग्रहच आहे तर मी सांगतें.

**गोदावरी**—मला कांहीं वाईट वाटणार नाहीं. काय असेल तें सांगा एकदां, आजीबाई.

**विधवा**--ऐक तर--तुझा नवरा **नारायणराव** ज्या घरांत बिऱ्हाडाला रहातो, त्याच घरांत मी पांच सहा दिवस बिऱ्हाडाला होतें. तेथें राहून एक दोन दिवस झाल्यावर त्याची माझी बरीच ओळख पडली. तेव्हां तेथें त्याची जी वर्तणूक माझ्या दृष्टीस पडली, ती पाहून मला फार वाईट वाटलें होतें. परंतु आतां तुला पाहिल्यापासून मला फारच वाईट वाटत आहे. आतां उघड सांगतें कीं, **नारायणराव** तेथें एका तरुणीच्या फारच नादीं लागला आहे. ती तरुणी कोण ह्मणशील तर तुझ्या नवऱ्याच्या पूर्वी जो त्या जाग्यावर होता त्याची ती बायको. तुझा नवरा तेथें गेल्यावर त्या पहिल्या मनुष्यानें त्याच्या स्वाधीन सर्व सरकारी काम करून तो आपल्या बदली झालेल्या ठिकाणीं गेला. पावसाळे दिवस असल्यामुळें त्यानें आपल्या बायकोस बरोबर नेलें नाहीं. तिला तेथेंच ठेविलें. तिचेंही घर तुझ्या नवऱ्याच्या बिऱ्हाडाजवळच आहे. तुझा नवरा बहुत करून रात्रंदिवस त्या बायकोजवळ असतो. कधीं कधीं शाळेंत देखील जात नाहीं. बरें ती बायको तरी सुंदर असेल ह्मणावें तर तेंही नाहीं. शुद्ध कोळशांतलें माणीक! तुझी ती दासी देखील शोभणार नाहीं.असें असतां हा सूर्यासारखा पुरुष तिच्या नादांत वेडा होऊन गेला आहे, असें पाहून मला आश्चर्य वाटलें. पण त्या वेळेस पहिल्यानें मनांत असा विचार आला कीं, ह्याचें कदाचित् लग्न झालेलें नसेल. आणि हा ज्वानींत आलेला आहे, तेव्हां ह्याचें मन ह्याला आवरत नसल्यामुळें हा अशा फंदांत पडला असेल. पण पुढें त्याचें लग्न झालें आहे असें जेव्हां समजलें, तेव्हां असें वाटलें कीं, ह्याची बायको अगदीं लहान किंवा कुरूप असेल. आणि मी तुला तूं नारायणरावाची बायको काय, ह्मणून विचारलें आणि तूं होय ह्मणून सांगितलेंस, तोंपर्यंत मला तसेंच वा-

टत होतें; परंतु तूं त्याची बायको असें जेव्हां समजलें, तेव्हां त्याच्या तेथील वागणुकीविषयीं मला मोठा चमत्कार वाटला. तुझ्यासारखी अप्सरा बायको असून त्याचें मन त्या वेश्याविद्या ध्यानाकडे लागलें तरी कसें? हा विचार मनांत आल्यावरून तूं मघां ऐकलेले शब्द माझ्या तोंडांतून निघाले.

हें विधवेचें बोलणें ऐकून गोदावरीस मोठा विस्मय वाटला. व कांहीं वेळ तिचें मन नारायणरावाच्या वर्तणुकीविषयीं दूषित झालें, व त्याच्या ठिकाणची तिची प्रीति क्षणमात्र डळमळूं लागते न लागते इतक्यांत त्याची आपणावरील अतुल प्रीति, त्याच्या मनाचा निर्मळपणा, त्याची नीतीच्या ठिकाणीं श्रद्धा, त्याची आपणापाशीं शुद्ध वागणूक व त्याच्या सुखदायक सहवासाचा अनुभव, हीं तिच्या डोळ्यांपुढें मूर्तिमंत उभीं राहिलीं. त्यामुळें तिचें मन पूर्ववत् निर्मळ झालें. आणि आपल्या पतीविषयीं पूर्ववत् प्रेम व पूज्यबुद्धि हीं तिच्या मनांत उत्पन्न झालीं आणि ह्मणालीः—

"आजीबाई, तुह्मी सांगतां अशी गोष्ट होईल असें माझ्या स्वप्नांत सुद्धां वाटत नाहीं. मग काय असेल तें असो."

**विधवा**—मी सांगतें असें ज्यापक्षीं हल्लीं झालेलें आहे, त्यापक्षीं तें होईल कीं नाहीं ह्याविषयीं संशय नकोच. आणि मीं तरी जी गोष्ट सांगितली ती ऐकीव सांगितली असें नाहीं, प्रत्यक्ष ह्या डोळ्यांनीं पाहून सांगितली.

**गोदावरी**—तुह्मी प्रत्यक्ष पाहिली ह्मणतां, त्याला माझा कांहीं उपाय नाहीं. परंतु ईश्वरानें आमचें ऐक्य केल्यापासून, आह्माला जो एकमेकांचा अनुभव आहे त्यावरून एकाचे मनांत दुसऱ्याविषयीं कोणतीही कुकल्पना स्वप्नांतही येणार नाहीं, व एकमेकांशीं बेइमानपणाची गोष्टही एकमेकांचें हातून कधीं होणार नाहीं, अशी माझी पक्की खातरी आहे.

**विधवा**—मुली तूं अजून लहान आहेस, त्यामुळें पुरुषांचीं मनें कशीं असतात हें तुला चांगलें समजूं लागलें नाहीं. तुझ्यासारख्या ज्या मुली असतात, त्यांना नवऱ्यानें वरवर प्रीति दाखविली व माझी लाडकी माझी लाडकी, असें वारंवार ह्मटलें ह्मणजे खरोखरच नवऱ्याची आपणावर उत्तम प्रीति आहे व आपण त्याची खरोचरच लाडकी आहों असें त्या समजतात व तशीच प्रीति जन्मभर चालेल असेंही त्यांस वाटत असतें आणि तसें वाटावयास कारणही असतें. कारण, पुरुष हे पहिल्या पहिल्यानें जों पर्यंत स्त्रीचे तारुण्याचा नवीन बाहार असतो, तोंपर्यंत फारच लाडीगोडी दाखवितात. परंतु तो बाहार एकदां गेला–तोही जाण्यास फार काळ लागत नाहीं ह्मणजे, जसें उत्तम अन्न असलें तरी तें पुष्कळ अधाशीपणानें खाल्लें ह्मणजे त्याचा वीट येतो, त्याप्रमाणेंच ह्यांनीं नवीन बाहाराचा ओ येईपर्यंत उपभोग घेतला असल्यामुळें ह्यांना त्याचा वीट येतो. मग ज्याप्रमाणें रोज पंचपक्वान्नें मिळत असलीं तरी, तीं रोजचीं ह्मणून बेचव वाटून चिंच देखील खावीशी वाटते, त्याप्रमाणेंच पुरुष स्त्रियांच्या तारुण्याचा अधाशीपणानें उपभोग घेतात, त्यामुळें कांहीं दिवसांनीं त्याचा त्यांस त्या पंचपक्वान्नांप्रमाणें कंटाळा येतो. मग त्यांचीं मनें जशीं पंचपक्वान्नें खाणारांचीं चिंचेकडे वळतात तशींच एखाद्या वेश्याविद्या स्त्रीकडे वळतात. आणि अशाच संधीस जर त्या स्त्रीपुरुषांचा वियोग झाला, तर मग काय ! ‘ आधींच उल्हास आणि त्यांत फाल्गुन मास ’ ह्याप्रमाणें त्या विटलेल्या पुरुषाची अवस्था होते. मग तितक्यांत जरी त्याला एखादी कशीही कर्कशा व कुब्जा मिळाली, तरी तो आपले तनमनधन तिला बेलाशक अर्पण करितो. मग ती पहिल्या बायकोपेक्षां रूपानें व गुणांनीं कितीही वाईट असली तरी चिंता नाहीं. मग

त्याच्या मनांतून उतरलेली बायकोही कांहीं कमी करीत नाहीं ! त्याला जरी तिचा कंटाळा आलेला असतो, व तिलाही मनांतून त्याचा कंटाळा आलेला असतो, तरी त्या दोघांसही विषयाचा कंटाळा आलेला नसतो. मात्र पुरुषास बायकोपेक्षां अधिक मोकळीक असल्यामुळें त्याला लागलेंच दुसरें ठिकाण पाहण्यास सांपडतें. बायकोस जरा मोकळीक कमी असते व पुरुषापेक्षां जरा लज्जाही अधिक असते त्यामुळें तिला दुसरें ठिकाण पाहण्यास जरा वेळ लागतो. परंतु तिचें रूप वगैरे जरा चांगलें असलें ह्मणजे फार वेळ देखील लागत नाहीं. तिच्या मनांत आल्याबरोबर तिनें तज ीज केली तर, पहिल्यापेक्षां दसपट देखील चांगलें ठिकाण मिळतें. मग तिचीही चैन होते. आणि खरोखर पाहिलें तरी रोज रोज कोणतीही वस्तु मिळत असली, ह्मणजे ती कितीही उत्तम असली तरी–तिचा कंटाळा येतो. मग तींत बदल करावासें वाटतें, असें आहे. त्याप्रमाणेंच तुझ्या नवऱ्यानें केलें आहे. त्यांत कांहीं अधिक नाहीं. तिकडून व्हावयाचें तें झालेंच, इकडची मात्र मला कांहीं माहिती नाहीं. त्यामुळें कांहीं फारसें बोलवत नाहीं.

**गोदावरी**—आजीबाई, तुह्मी सांगतां ह्या गोष्टी कदाचित् इतर दुर्व्यसनी पुरुषांविषयीं, व तशाच प्रकारच्या बायकांविषयीं खऱ्या असतील, पण आह्मा उभयतांस त्या गोष्टी अगदीं लागू नाहींत व तिकडून भलतशी गोष्ट होणार नाहीं अशी माझी बालंबाल खातरी आहे.

**विधवा**—मुली, मी कां खोटें सांगतें ? माझ्या वयाला आज साठ वर्षे झालीं, मी बहुतेक तीर्थें केलीं, आणि आतां मी खोटें बोलेन ? तुझा नवरा बाहेरख्याली निघाला तर माझें काय गेलें ! पण तुझ्याकडे पाहून मला फार वाईट वाटलें. तो बाहेरख्याली निघाल्यामुळें त्याला तर सुख मि-

ळतच आहे, तूं मात्र त्याच्या कृत्यांचा विचार न करितां डोळ्यांवर कातडें ओढून उगीच दुःख करीत बसतेस. बायकांचें दुःख बायकांना माहीत. तुला नवऱ्याचा समागम नसल्यापासून काय दुःख होत असेल हें मला समजत आहे, तर अशा दुःखांत ज्याच्या ठिकाणीं निष्ठा ठेवून दिवस काढावयाचे, तोच जर बेइमान झाला तर 'वांकड्याला वांकडें' ह्याप्रमाणें आपणही कां कमी करावें ? आपणही सुखप्राप्तीचा रस्ता पहावा ह्मणजे झालें !

**गोदावरी**--शिव शिव शिव ! आजीबाई तुह्मी ह्मणतां अशा प्रकारची गोष्ट ईश्वरानें माझ्या स्वप्नांत देखील आणूं नये, आणि तुह्मी सांगतां तशी गोष्ट तिकडूनही झाली असेल असें माझ्या स्वप्नीं देखील येत नाहीं. आतां तुमच्याकरितां तिकडून तशी गोष्ट झाली असें जरी मानिलें, तरी 'एकानें गाय कापिली ह्मणून दुसऱ्यानें वांसरूं कापूं नये' ह्या ह्मणीप्रमाणें माझी जी त्या ठिकाणीं निष्ठा व प्रीति आहे ती कधीं कमी होणार नाहीं आणि माझ्या हातून बेइमानीपणाचें कामही कधीं होणार नाहीं. आणि आतां तुह्मीही ह्या गोष्टी पुढें चालवूं नका.

**विधवा**—मुली, तुझी माझी चांगली ओळख नाहीं, ह्मणून तूं अशीं निश्चयाचीं उत्तरें मजजवळ बोलतेस. हें मला नाहीं का समजत ? हीं उत्तरें नुसतीं तोंडानें बोलावयाच्या मात्र उपयोगीं ! परंतु ह्या पावसाळ्या दिवसांच्या थंड रात्रीं बिछान्यावर पडलें ह्मणजे जेव्हां पतिसुखाची आठवण होऊन जिवाला तळमळ लागते व वेड्यासारखें होतें त्या वेळेस ती तळमळ शांत करण्यास हीं उपयोगीं पडावयाचीं नाहींत ! त्या वेळेस शांति करण्यास प्राणसख्याचीच जरूर आहे. तेव्हां आपला नेमलेला प्राणसखा जर आपणास अनुकूल नाहीं.--मनाची शांति तर झाली

पाहिजे—तर आपणास योग्य असा दुसरा कोणी तरी विलासी पुरुष पहावा.

**गोदावरी**—आजीबाई तुह्मी हा चावटपणा मजजवळ लावूं नका. तशाच ज्या कोणी असतील त्यांजपाशीं लावा. तुमच्या वयाला व यात्रेकरूपणाला हें बोलणें शोभत नाही. शिवाय मी तुह्माला आणखी एकदां निक्षून सांगतें कीं, मीं ज्याला एकदां आपलें काया वाचा मन अर्पण केलें, त्याच्या शिवाय इतर पुरुष मात्र मला पिता बंधुसारखे आहेत.

**विधवा**—तूं जशीं हीं नेमाचीं वचनें बोलतेस तशीं बोलणाऱ्या शेंकडोंजणी असतात, पण त्यांचीं तीं नेमाचीं वचनें कोठपर्यंत टिकतात ह्मणशील, तर जोंपर्यंत तसाच एखादा पंची त्यांना मिळाला नाहीं तोंपर्यंत! तसाच एखादा तरुण, श्रीमंत, सुंदर विलासी पक्ष्या मिळाला ह्मणजे त्यांचीं पहिलीं बोलणीं जागच्या जागींच रहातात! तसेंच तुझें आहे. तुला अजून तसा कोणी लाल आढळला नाहीं, आणि माझ्यासारखी तरुण मुलींना सुखी करणारीही कोणी तुला मिळाली नाहीं, ह्मणून तूं ह्या नेमाच्या गोष्टी बोलत आहेस! पण तशा लालाची कां एकदां गांठ पडली, ह्मणजे मुंगी जशी गुळाला चिकटते तशी त्याला चिकटशील व त्याच्या तारुण्याची सर्व गोडी चोखून घेशील! तुझ्या मनांत ह्या सगळ्या गोष्टी वागत आहेत, पण तूं मजजवळ चोरतेस! पण पहा तूं मजजवळ कांहीं चोरूं नको. माझ्याकडून तुझे सर्व हेतु पूर्ण होतील. मी तुला असा एक पंची पाहून देतें कीं, ह्याच्या पुढें सर्व जग तुच्छ आहे असें तुला वाटेल! तुझ्या मनांत आहे तेंच नुस्तें बाहेर काढून होय ह्मण ह्मणजे झालें!

**गोदावरी**—ह्मातारडे, एवढा वेळ मी तुला खरोखर तूं कोणी चांगल्या स्वभावाची यात्रेकरीण आहेस असें स-

मजत होतें. परंतु आतां माझी खातरी झाली कीं, तूं खचित कुंटण आहेस कोणाकडून तरी माझें मन वळविण्याकरितां आली आहेस. तिकडून आलें ह्मणून सांगतेस तें सगळें खोटें. थेरडे आतां येथून चालतीहो! उचल अगोदर तुझें बोचकें उठतेस कीं नाहीं ? कीं शेजारीं वकील भावोजी आहेत त्यांना सांगून शिपायाकडून तुला धक्के मारून देऊं हांकून ? उठ लवकर कीं मारूं हाक ? ( ओटीवर निजलेल्या देवपूजेच्या ब्राह्मणास ) भास्कर भटजी, अहो भास्कर भटजी, त्या वकील भावोजींस आणा बोलावून, आणि ह्या कुंटणीला ठेवा बांधून.

**विधवा**—( बोचकें घेऊन उठते ) बाई, मी उठतें, जातें, मला धक्के मारण्याची किंवा बांधून ठेवण्याची गरज नाहीं ! मी तुझ्या हिताची गोष्ट सांगत होतें, पण तुला ती आवडत नाहीं. पहा तो गोपाळराव त्याच्या बरोबर तुझें लग्न होणार होतें, पण तूं त्या वेळेस वेडेपणानें त्या नारायणरावाच्या नादीं लागून त्याचा धिःकार केलास. आतां पस्तावली आहेस. अजून तो गोपाळराव तुझ्याकरितां झुरत आहे ! पहा, होय ह्मणशील तर राजाच्या राणीसारखे सर्व सुखसोहळे भोगावयास मिळतील, हवाशीर बागेतील सुंदर बंगल्यांत वाळ्याचे पडदे लाविलेल्या खोलींत शिसवीच्या छपरपलंगावर गुडघाभर मऊ बिछान्यावर निजावयास मिळेल, हजारों रुपयांचे दागिने मिळतील; पंचपक्वान्नी खाणें मिळेल, सेवेला चाकर, कुणबिणी मिळतील; मदनासारखा पुरुष गोपाळराव तुझ्या अर्ध्या वचनांत वागेल, सारांश तूं सर्वस्वी स्वर्गातील सुखाप्रमाणें सुखांत पडशील ! आणखी ही गोष्ट इतर कोणाला समजूं नये अशीही तजवीज आह्मी करूं. पहा सांगतें आहें, 'होय' ह्मण. नाहींतर मग झुरझुरशील.

**गोदावरी**—नकट्ये, चालती होतेस कीं नाहीं ? कीं

घालूं तें मुसळ डोक्यांत ? करूं मोक्ष तुझा ? वैश्या कुंटण कोठची ! निघ ! ( मुसळ उचलते. )

विधवा भयानें घाबरून बोचकें उचलून कांपत कांपत उठली आणि तोंडानें हळू हळू पुटपुटत चालती झाली, ती नीट आपल्या बिऱ्हाडीं गेली. इकडे गोदावरीही तिचा संताप जरा कमी झाला तशी आपल्या आंथरुणावर जाऊन निजली. दुसरे दिवशीं तिनें रात्रींची त्या कुंटणीची हकीकत, तींत कांहीं अर्थ नाहीं असें समजून ती त्या वकिलास सांगितली नाहीं. मात्र तिनें नारायणरावास जें पत्र पाठविलें त्यांत सर्व हकीकत लिहिली.

त्या विधवेनें दुसरे दिवशीं सकाळीं रामभाऊकडे जाऊन त्याला झालेली सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून त्यालाही हें प्रकरण वठतें कसें ह्याविषयीं—मोठी काळजी पडली. त्यानें त्या विधवेस त्या गोष्टीची परिस्फुटता कोणापाशीं न करण्याविषयीं सांगून निरोप दिला. दोन प्रहरीं जेवण झाल्यावर तो गोपाळरावाकडे गेला. गोपाळरावाचें ध्यानमन गोदावरीकडे लागलें होतें, त्यामुळें हा गेल्याबरोबर त्यानें तीच गोष्ट त्याला विचारली. तेव्हां ह्यानें त्या विधवेविषयीं तांत्रिक हकीकत त्याला सांगितली. ती ऐकून तो तिजविषयीं अगदीं निराश झाल्यासारखा झाला. परंतु रामभाऊनें पूर्वीप्रमाणें त्याला धीराच्या व गोड गोड गोष्टी सांगून त्याचें मन कांहींसें बेतावर आणिलें,आणि त्याला सांगितलें कीं, आतां मीं आणखी एक प्रयत्न करण्याचें योजिलें आहे. तो खचित सफळ होईल अशी माझी पक्की खात्री आहे. पूर्वेचा सूर्य पश्चिमेस उगवेल, पण हा प्रयत्न व्यर्थ जाणार नाहीं. आजपर्यंत चाललेल्या क्रमाप्रमाणें खर्चाच्या संबंधानें मात्र परवानगी असावी. हा प्रयत्न सफळ झाल्यानें गोदावरी

आपणास कधीं कधीं मिळेल असें नाहीं, तर ती सर्वकाळ तुमची अंकित होऊन राहील !

**गोपाळराव**—आतां मला तर कांहीं धीर येत नाहीं कारण आपण कितीएक वेळां प्रयत्न केले, पण ते सगळे व्यर्थ गेले. तेव्हां हा तरी सफळ होईल कीं नाहीं हें कोणी सांगावें ?

**रामभाऊ**—अहो प्रत्येक कामांत आपला प्रयत्न जर सफळ होता, तर मग आपण राजे झालों असतों, पण तसें कोठें होत आहे ? एकेक काम सिद्धीस नेण्याकरितां कधीं कधीं शेंकडो प्रयत्न करावे लागतात. ह्या कामांत तर आपले काय ते एक दोनच प्रयत्न फसले आहेत !

**गोपाळराव**—बरें तुझ्या ह्मणण्याप्रमाणें होऊं दे. कोणीकडून तरी एकदां माझें काम झालें पाहिजे. आतां कसा काय प्रयत्न करावयाचें योजिलें आहेस ? तें तरी ऐकूं दे.

**रामभाऊ**—तें काय करावयाचें त्याविषयीं भाकडकथा सांगत बसत नाहीं. सर्व गोष्टी हळू हळू आपणास कळतीलच. पण आतां थोडक्यांत तात्पर्य सांगतों. ती मसलत अशी आहे कीं, आपणाकडून कोणी तरी एक **नारायणरावाच्या** ओळखीचा नाहीं असा, शहाणा, कावेबाज, धूर्त, समयसूचक मनुष्य प्रवाशाच्या मिषानें **नारायणरावाकडे** पाठवावा. त्याच्या बरोबर **नारायणरावाच्या** घरांतील एक दोन वस्तू ज्या त्याला पाहिल्याबरोबर आपल्याच आहेत ह्मणून ओळखितां येतील त्या—हस्तगत करून द्याव्या. त्या मनुष्यानें **पेठ** गांवीं जाऊन, त्याच्या मनांत हरएक युक्तीनें **गोदावरी** जारिणी निघाली असें भरवावें; व ती **गोपाळरावाशीं** लागू आहे असेंही त्याच्या मनांत भरवावें. नुसत्या सांगण्यानें त्याची खात्री होणार नाहीं तर त्याच्या बरोबर दिलेल्या वस्तू तिजकडून **गोपाळरावजींच्या** द्वारें आपणास मिळाल्या असें त्यानें सांगावें. शिवाय त्याचें मन तिच्याविरुद्ध

लोभ्यास जें जें करणें व सांगणें जरूर वाटेल, तें तें त्यानें करावें व सांगावें. असें केल्यानें त्याचें मन तिजविषयीं अगदीं दूषित झालें ह्मणजे अर्थातच तो तिचा त्याग करील. त्यानें तिला हांकून दिलें ह्मणजे ती निराश्रित होऊन कोठें तरी आश्रय पाहूं लागेलच. तिला आश्रयाकरितां माहेरही राहिलेलें नाहीं; आणि आपण तर तिला आश्रय देण्याला तयारच ! तेव्हां अर्थातच तें संधान जुळेल. मग घ्या गोदावरी आणि बसा चमन करीत.

गोपाळराव—काय रामभाऊ किती थट्टा करितोस ? तिच्या प्राप्तीच्या संबंधानें आमचे ग्रह कधीं शुभस्थानीं येतील तेव्हां खरें ! असो, पण तिकडे पाठविण्यास जो मनुष्य पाहिजे तो तूं कोण तयार करणार ? आणि नारायणरावाच्या घरांतील वस्तू त्या मनुष्याबरोबर देण्याकरितां पाहिजेत, त्या कशा हस्तगत होतील ?

रामभाऊ—तिकडे पाठविण्यास उत्तम व योग्य मनुष्य ह्मटला ह्मणजे आपले घरचे पुराणीकबोवा आहेत. ते आधीं चतुर व धूर्त आहेतच, त्यांत आणखी मी त्यांना पढवून ठेवितों. ह्या कामांत त्यांचा महिना सवा महिना मोडेल. तितके दिवस ते कोठें पुराण वाचतील तर त्यांना वीस पंचवीस रुपये मिळतील. त्याच्या दुप्पट, तिप्पट, किंवा चौपट रुपये आपण त्यांना देऊं. शिवाय काम झाल्यावर चांगलें इनाम देऊं करूं ह्मणजे झालें. ही मनुष्याविषयीं तजवीज झाली; आतां नारायणरावाच्या घरांतील वस्तू हस्तगत झाल्या पाहिजेत, त्याविषयीं तुह्माला काळजी नको. त्याविषयीं मी तजवीज करितों. त्या वस्तू हस्तगत करण्यास त्यांची किंमत व आणखी कांहीं खटपट करणाराला इनाम, इतकाच कायतो खर्च येईल.

गोपाळराव—युक्ति ठीक आहे. सिद्धीस जाईल तेव्हां

खरी, आणि सिद्धीस गेली तरी अजून महिना दीड महिना वाट पहात बसलें पाहिजे! हेंच फार कठिण आहे.

**रामभाऊ**—सिद्धीस जाण्याविषयीं शंकाच नको! आतां कांहीं दिवस वाट पहात बसलें पाहिजे हें मात्र खरें. पण पुढील अत्युत्तम सुखाकडे लक्ष देऊन, त्याच्या प्राप्तीकरितां तपच करीत आहों असें समजून हे दिवस काढावे! हा बेत ठरल्यावर त्या दिवसापासून रामभाऊ गोपाळरावाकडे जो पुराणीक रहात होता त्याला रोज आपल्या घरीं नेऊन व बाहेर कोठें फिरावयास नेऊन गोपाळराव व गोदावरी ह्यांची सर्व हकीकत सांगूं लागला. व एके दिवशीं त्याला, "तुह्मी नारायणरावाच्या घरांतील आह्मी एक दोन वस्तू देतों त्या घेऊन प्रवाशाच्या बाहण्यानें नारायराव आहे त्या ठिकाणीं जाऊन, त्याची गोदावरी गोपाळरावाशीं जारकर्म करिते अशी खातरी करून देऊन, व इतर तुह्माला चांगल्या वाटतील त्या युक्ति योजून तो गोदावरीला घरांतुन हांकून देईल असें करावें" असें सांगितलें. आणखीही ह्या कामांत काय काय करावयाचें, कसें वागावयाचें, नारायणरावाचा स्वभाव कसा आहे, वगैरे सर्व गोष्टी त्याला सांगितल्या. आणखी त्याला ह्या कामांत महिना दीड महिना मोडेल त्याबद्दल शंभर रुपये देऊं केले, व काम झाल्यावर 'तुह्मास चांगलें इनाम देऊं' व हें गोपाळरावजींचें फार महत्वाचें व नाजूक काम तुह्मीं कराल तर तुह्माला जन्मपर्यंत निर्वाहाकरितां कोणाच्या तोंडाकडे पाहण्याची गरज राहणार नाहीं. असेंही सांगितलें.

साधारणपणें असे पुराणिक लोक ह्मटले ह्मणजे पैशाचे फार लोभी असतात, त्यामुळें पैसा मिळविण्यासाठीं कोणतेंही

काम करण्यास ते पापाचा विचार करीत नाहींत. त्यांना जन्मापासून शिक्षण ह्मणून काय तें पुराण सांगण्यापुरतें मिळालेलें असतें. शिवाय लोकांस खुष करून याचकवृत्तीचें अवलंबन करून उपजीविका करण्याचा त्यांचा धंदा असल्यामुळें, श्रीमंत लोकांची खोटीच स्तुति करणें, तोंडापुरतें बोलणें,ह्या दात्याच्या तोंडावर आपण खुषी झालों असें दाखविणें, त्यांना दोन पैसे पोंचविणारा दुराचरणी असला तरी त्याच्या दुराचरणास सदाचरणाचें रूप देऊन त्याचें वर्णन करणें, एखाद्या श्रीमंताच्या घरीं राहत असतील त्या घरांतील निरनिराळ्या मनुष्यांशीं निरनिराळ्या रीतीनें वागणें व बोलणें,ह्या गोष्टींत तर ते अगदीं घटलेले असतात.विठ्ठल सुवासिनींस उपदेश करून शिष्यिणी बनविणें हेंही एक पुराणिकांचें काम असतें हें पुष्कळांस माहीतच आहे. ह्या प्रकारचाच हा पुराणीक होता. हा गोपाळरावाकडे महिना दीड महिना राहिलेला होता. त्यामुळें गोपाळरावाची सर्व वागणूक त्याच्या लक्षांत आली होती. त्यामुळें त्याची आपणावर मर्जी बसली असतां आपणास चांगला लाभ होईल असेंही त्यास वाटत होतें.परंतु इतके दिवस त्याची मर्जी बसवून घेण्याची त्याला संधीच मिळाली नव्हती. कारण गोपाळरावास खुष करणें ह्मटलें ह्मणजे तें भक्तिमार्गाचा उपदेश करून किंवा शृंगाररसयुक्त सुभाषितें त्याला ऐकवून होण्यासारखें नव्हतें. त्याला प्रत्यक्ष शृंगारदेवतेचीच गरज होती. ती मिळवून देण्याचें इतके दिवस पुराणिकाच्या हातांत नव्हतें. तें, आतां रामभाऊनें त्याला नारायणरावाकडे जाऊन गोपाळरावाला गोदावरी प्राप्त करून देण्याकरितां खटपट करण्यास जेव्हां सांगितलें, तेव्हां त्याला आपल्या हातांत आलेंसें वाटलें, व त्यावरून त्यानें रामभाऊचें ह्मणणें कबूल केलें, व तिकडे जाण्याच्या पूर्वीं आपणास घरीं खर्चास

पाठविलें पाहिजे. असें सांगून रामभाऊजवळून पन्नास रुपये घेतले, व चार पांच दिवसांनीं नारायणरावाकडे जाण्यास निघावयाचें असा बेत केला.

रामभाऊनें पुराणिकबोवांबरोबर देण्यास नारायणरावाच्या घरांतील वस्तू हस्तगत करण्याचा उद्योग चालविला. त्यानें त्याच गांवांत राहणारी एक गरीब ब्राह्मणाची जराशी वृद्ध बायको–जिचें गोदावरीकडे कधीं कधीं जाणें येणें असे अशी–पाहिली, आणि तिला एक दोन दिवस गोपाळरावाकडे सुवासिनी ह्मणून जेवावयास बोलाविलें, व तिला चार आणे दक्षणा व एक आठ आण्याचा खण पोंचविला. अशी त्या बाईस ओशाळी करून एक दोन दिवस तिजकडे जाण्यायेण्याची व तिशीं अघळपघळ बोलण्याची वहिवाट पाडून, तिजपाशीं एक दिवस गोष्ट काढिली; आणि तिला ह्मणालाः–"आह्माला त्या नारायणरावाच्या घरांतील एखादें लुगडें, चोळी व मिळाली तर शालजोडी अशा जिनसा कांहीं कारणाकरितां पाहिजे आहेत. तुमचें जाणें येणें त्यांच्या घरीं बरेंच आहे. तेव्हां ह्या सांगितलेल्या वस्तू तुह्मीं कसें तरी करून आह्माला मिळवून दिल्या पाहिजेत. त्या मिळविण्यास तुह्माला चोरी करण्याची गरज नाहीं. फक्त कांहीं तरी निमित्त सांगून गोदावरीजवळून त्या मागून आणाव्या, आणि परत करावयाच्या तेव्हां त्या सांडल्या ह्मणून सांगावें. त्यांची किंमत तिनें भरून मागितली तरी ती आह्मी देऊं त्याविषयीं तुह्माला काळजी नको. फक्त इतकी खटपट मात्र तुह्मीं केली पाहिजे, व ही गोष्ट अगदीं गुप्त ठेविली पाहिजे. पहा, हें जर तुह्मीं आमचें काम कराल तर गोपाळरावाकडून तुह्माला वर्षाकांठीं पंचवीस तीस रुपये पोंचतील, अशी मी तजवीज करीन. शिवाय फक्त कामाबद्दल ह्मणून तुह्माला काम झाल्याबरोबर दहा रुपयांचें

चोळी लुगडें देऊं. आतां नवरात्राचे दिवस जवळच आले आहेत. त्या नऊ दिवस गोपाळरावाकडे एक सुवासिनी लागत असते, त्या नऊ दिवसांत तिला दहा रुपये मिळतात. ती सुवासीन तुह्मालाच सांगूं, हें ऐकून त्या गरीब बाईच्या तोंडास पाणी सुटलें; व तिनें त्याच्या सांगण्याप्रमाणें करण्याचें कबूल केलें. दुसरे दिवशीं सकाळीं ती बाई गोदावरीकडे जाऊन तिजजवळ मोठ्या गरिबीनें ह्मणाली कीं, आज माझ्या भावाच्या बायकोचें गर्भाधान आहे. त्याची फार गरिबी असल्यामुळें गर्भाधानाच्या दिवशीं तिला नेसण्याला चांगलेंसें लुगडें किंवा अंगांत घालावयास चांगलीशी चोळी देखील नाहीं. तिच्या माहेराहून लुगडें वगैरे येईल ह्मणावें, तर तिकडचें कोणी मनुष्य राहिलेलें नाहीं, बरें मीं द्यावें, तर मजजवळ तरी दीड रुपयापेक्षां अधिक किमतीचें लुगडें नाहीं. तेव्हां त्या मुलीचा आज मोठा आनंदाचा व शुभ दिवस असून, तिला आज दीड रुपयाचा सुताडा नेसावा लागणार आहे, व अंगांत तीन आण्यांच्या खणाची चोळी घालावी लागणार ! ह्मणून तुजकडे आलें आहें. तुला गरिबाची काकळूत येऊन आजचा दिवस जर आपलें एखादें जरा चांगलेंसें लुगडें आणि चोळी देशील, तर तेवढी वेळ साजरी करून उद्यां मोठ्या पहाटेस तुझीं चिरगुटें परत आणून देईन. तुझें लुगडें रात्रीं निजावयाच्या वेळेस देखील हवें तर परत आणून देईन.

गोदावरीचा स्वभाव दयाळू व सरळ होता. तिला त्या बाईचें गरिबीचें बोलणें ऐकून दया आली, आणि तिनें लागलेंच आपलें बोचकें सोडून त्यांतून एक सांळ्याचें जुनें लुगडें व चोळी तिला दिली. इतक्यांत त्या बाईची दृष्टि त्या बोचक्यांत एक जुनी शालजोडी होती तिजकडे गेली. तेव्हां ती जरा वांकडें तिकडें तोंड करून गोदावरीस ह्मणाली—ही जुनी-

पानी शालजोडीही आजचा दिवस देशील तर बरें होईल. मी तिला जिवापलीकडे जपेन आणि सकाळीं परत आणून देईन. तें ऐकून गोदावरीनें ती जुनी शालही तिला दिली; आणि सांगितलें कीं, "ह्या चिरगुटांना नीट जपा, डागबिग पाडूं नका, आणि सकाळीं लवकर आणून पोंचतीं करा." ती बाईही आपण गोदावरीची फार आभारी झालें असें दाखवून तीं वस्त्रें खाकेंत घेऊन आपल्या घरीं गेली. त्याच दिवशीं सायंकाळीं रामभाऊ तिजकडे आला; तेव्हां त्या बाईनें त्याला लुगडें, चोळी व शालजोडीची हकीकत सांगून तीं वस्त्रें त्याच्या पुढें ठेविलीं, आणि ह्मणाली:—

आजपर्यंत ह्या तोंडानें कधीं खोटें बोललें नव्हतें, व ह्या हातांनीं लबाडी केली नव्हती; पण आज तीं दोन्हीं तुमच्या भिडेखातर करावीं लागलीं.

**रामभाऊ**—त्याबद्दल मी तुमचे उपकार विसरणार नाहीं. मी तरी तुमच्या सारखीं परोपकारी माणसें पाहूनच भीड घालीत असतों. उगाच भलत्याच माणसास मी विश्वासाचें काम सांगणार नाहीं. आतां मी हीं वस्त्रें घेऊन जातों. तुह्मी सकाळीं गोदावरीकडे जाऊन, तिला तुझीं वस्त्रें चोरीस गेलीं असें सांगा. त्यावर ती काय ह्मणते तें ऐका. तिनें तुह्माला तीं वस्त्रें सोडिलीं तर ठीकच झालें. न सोडिलीं तर त्यांचीं किंमत काय ते विचारा. आणि आपण घरदार विकून किंमत भरून देणार, असें दर्शवा. ह्मणजे ती अवाच्या सवा किंमत सांगणार नाहीं व तिला चोरी झाली ह्याविषयीं संशय येणार नाहीं. मी उद्यां दोन प्रहरीं येईन तेव्हां काय होईल तें मला कळवा, ह्मणजे त्याप्रमाणें तजवीज करीन.

**बाई**—तिच्या चिरगुटांची तजवीज होईल, पण मीं एवढी दलाली केली ती फुकटच का?

**रामभाऊ**—आः फुकट कशी? त्याबद्दल मी कबूल केल्यापेक्षां तुह्माला दोन पैसे अधिक पोंचवीन, हें खचित समजा.

**रामभाऊनें** सांगितल्याप्रमाणें ती बाई दुसरे दिवशीं मोठ्या सकाळीं, एक मळकटसें लुगडें नेसली आहे, तोंडही बरोबर धुतलेलें नाहीं, डोकीचे केश तसेच उखरवाखर झालेले आहेत, कंठ सद्गदित झाला आहे, डोळे पाण्यानें भरले आहेत, व मनास मोठें दुःख झाल्यासारखी मुद्रा दिसत आहे, असें सोंग करून **गोदावरीच्या** घरीं गेली.

**गोदावरी**—कां बाई झालें तुमचें काम? माझीं चिरगुटें आणलींत का?

**गोदावरीचे** हे शब्द ऐकिल्याबरोबर ती बाई स्फुंदस्फुंदून रडूं लागली. तें पाहून **गोदावरी** अचंब्यांत पडली, आणि ह्मणालीः —

बाई रडायला काय झालें? काय झालें असेल तें सांगा. तुह्माला दुःखी पाहून मलाही वाईट वाटतें.

**बाई**—काय सांगूं बाई? 'भिकाऱ्याचें नशीब भिकारी' ह्मणतात त्यांतली गत! कोठून मला जळली ती बुद्धि झाली आणि कोठून मी दुसऱ्याच्या वस्तू नेण्याच्या भानगडींत पडलें? हा मानेला फांस लावून घेतला! मला कांहीं या उठाठेवीची गरज होती? 'कोणाची कोण आणि पितळेची होन' ह्मणतात त्यांतली अवस्था! कोठचा भाचा आणि कोठची भाचेसून!! आणि कोठचें गर्भाधान? मला कांहीं गरज होती ह्या गोष्टीची? पण नाहीं. कर्मासारखी मला वासना झाली!

**गोदावरी**—बाई, पण झालें काय तें अगोदर सांगाल कीं नाहीं?

**बाई**—काय सांगूं? काल मला ती वाईट बुद्धि झाली आणि मीं तुझ्या जवळून तीं चिरगुटें नेलीं. मी एथून गेलें

तशीच भाच्याकडे गेलें, आणि तीं चिरगुटें त्याच्या बायकोजवळ दिलीं, आणि तिला त्यांना नीट जपण्याविषयीं सांगून मी आपल्या घरीं आलें. मीं मनांत ह्मटलें कीं, ती भाचेसून आतां कांहीं लहान नाहीं, तेव्हां ती तीं चिरगुटें संभाळील. पण कर्मासारखी बुद्धि! त्या पोरीनें तीं माजघरांत दांडीवर ठेविलीं; आणि ती कोठें इकडे तिकडे गेली. दोन घटकांनीं तेथें येऊन चिरगुटें नेसावयास पाहूं लागली, तों लुगडें, चोळी, व शालजोडी यांतून कांहींच तेथें नाहीं! तेव्हां इकडे तिकडे तिनें पुष्कळ शोधिलें व घरांतल्या व शेजारच्या मनुष्यांसही विचारिलें. पण त्या चिरगुटांचा ह्मणून कांहीं ठिकाण लागला नाहीं. तीं कोणी तरी उचल्यानें नेलीं असावीं. गेल्याची गोष्ट काल रात्रीं मला कळली पण मला कळून मी तरी काय करणार? काल माझा लहान मुलगा अजारी होता, ह्मणून मला दिवसास तिकडे जाण्यास फावलेंच नाहीं. रात्रीं चिरगुटांची गोष्ट समजल्यावर तिकडे गेलें, पण जाऊन उपयोग काय? रडत बसलें, इतकेंच! आतां आज सकाळीं तुझीं परत आणून द्यावयाचीं होतीं, तेव्हां तूं वाट पहात बसशील ह्मणून ही हकीकत सांगावयास आलें.

**गोदावरी**—झालें हें फार वाईट झालें. मला घरांतून जावयाचें तेव्हां सांगून जावयाचें कीं, आपल्या घरची वस्तू कोणाला देण्याच्या भानगडींत पडूं नको. असें सांगितलें असून, मागें मी ही तुमची काकळून करून तुह्माला चिरगुटें दिलीं हेंच मुळीं गैर केलें. आतां घरीं आल्यावर मला काय ह्मणतील; तें कांहीं असो. माझीं चिरगुटें मला मिळालीं पाहिजेत. तुह्मी तीं कोठें पहा, किंवा त्यांचा पाहिजे त्या रीतीनें शोध करा. कोणीकडून तरी माझीं चिरगुटें मला मिळालीं पाहिजेत.

बाई—तुझें ठीकच आहे. मींच तुझीं चिरगुटें न्यावीं कशाला? आतां शोध करून तरी तीं कोठें मिळणार? तींच चिरगुटें आतां कांहीं मिळावयाचीं नाहींत. त्यांची किंमत सांग; ह्मणजे मी कसें तरी करून आपला जीव गहाण ठेवून ती भरून देईन.

गोदावरी—( माझ्या अमदाबादी चंद्रकळेला पंचवीस रुपये पडले होते, चोळीला सात रुपये खर्च आला होता; व ती शालजोडी घेतली तेव्हां तिला पंनास रुपये पडले होते, असें मीं एकदां बोलतांना ऐकिलें होतें. तें लुगडें व ती चोळी घेऊन सगळे अडीच महिने झाले आहेत तेव्हां ती नवींच आहेत. आतां शालजोडी मात्र जराशी जुनी आहे तरी आज गेला बाजार तिची किंमत चाळीस रुपये धरण्याला कांहीं हरकत नाहीं, इतकी सांगितली ही किंमत तुह्मास भरून दिली पाहिजे. )

बाई—बरें आहे, मग करणार काय? आज संध्याकाळपर्यंत कसेंही करून तुझे रुपये आणून देतें असें ह्मणून ती बाई आपल्या घरीं निघून गेली.

त्या दिवशीं संध्याकाळीं रामभाऊ तिजकडे आला, तेव्हां तिनें गोदावरीकडील झालेलें वर्तमान त्याला सांगितलें, तें ऐकून त्यानें लागलेच बहात्तर रुपये तिच्या स्वाधीन केले व तिला चोळी लुगड्याबद्दल ह्मणून दहा रुपये दिले. त्यानें आपल्या स्वभावाप्रमाणें ह्मटलें ह्मणजे त्या बाईजवळून चिरगुटें काढून घेऊन तिला कांहींच द्यावयाचें नव्हे. परंतु त्याच्यानें तसें करवलें नाहीं, कारण ती बाई जर त्याच्याशीं बिनसली असती तर त्याच्या गुप्त बेताची प्रसिद्धी झाली असती. व तसें झालें असतें ह्मणजे, योजलेल्या कामास अडथळा येईल असें त्यास वाटत होतें; त्यामुळें त्यानें बोलल्याप्रमाणें त्या बाईस रुपये दिले. त्या बाईनेंही

लागलेच ते रुपये गोदावरीस नेऊन दिले. गोदावरीला, आपण त्या बाईस चिरगुटें दिलीं त्याविषयीं वाईट वाटलें. पण आतां त्या वाईट वाटण्याचा कांहीं उपयोग नाहीं असा विचार करून तिनें मनाचें समाधान केलें व पुन्हां अशा भानगडींत आपण पडावयाचें नाहीं असा निश्चय केला. ह्या गोष्टीची बचबच व गाज्याबाज्या करणें चांगलें नाहीं असें समजून तिनें ती गोष्ट नारायणरावाचा मित्र वकील यासही कळविली नाहीं. नारायणरावास पत्र पाठविलें त्यांत मात्र ती हकीकत साग्र लिहिली. पण तिचीं पत्रें पोस्टाचा शिपाई मध्येंच काढून घेत असे, त्यामुळें अर्थातच ती हकीकत त्यास समजली नाहीं.

मागें सांगितल्याप्रमाणें नारायणरावाचे घरांतील वस्तू रामभाऊचे हस्तगत झाल्यावर, त्यानें त्या पुराणिकाच्या स्वाधीन केल्या. त्याला वाटखर्चास चाळीस रुपये दिले व बरोबर सोबतीकरितां एक बिगारी करून दिला, आणि सांगितलें कीं,:—

आतां तुह्मी सकाळीं निघण्याची तयारी करा. आणि तेथें गेल्यावर, आपलें सर्व चातुर्य, कल्पना व धूर्तता खर्चून त्या नारायणरावाचे मनांत गोदावरी गोपाळरावाशीं जारकर्म करिते, ह्याविषयीं असा पक्का संशय बिंबवून द्या, कीं तो तावडतोब तिचा त्याग करील. हें काम तुमचे हातून झाल्यास तुह्मास जन्मपर्यंत भिक्षुकी करण्याची गरज पडणार नाहीं. तुमच्या सर्व चातुर्याची, व तुह्मी गोपाळरावांचे ठिकाणीं जें प्रेम दाखवितां त्याची परीक्षा ह्या गोष्टीनें होणार आहे.

**पुराणीक**—भाऊसाहेब, तोंडानें बोलून काय दाखवावें ? करून दाखवावें. नाहीं तर उगाच तोंडाची वाफ घालविण्यांत कांहीं अर्थ नाहीं. मात्र काम झाल्यावर मा-

ह्मा विसर पडूं नये ह्मणजे झालें.

रामभाऊ—पुराणीकबोवा, तेंही अनुभवानेंच कळणार आहे ! पण आजपर्यंत तुह्मी येथें आल्यापासून जो गोपाळरावांचा तुह्माला अनुभव आहे त्यावरून तुमच्या मनांत ही शंका राहूं नये. असो. त्या बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं, अखेरीस तुह्माला अनुभव येईल तो खरा.

ह्याप्रमाणें रात्रीं बोलणें झाल्यावर दुसरे दिवशीं सकाळीं पुराणिकानें गोपाळराव व रामभाऊ ह्यांचा निरोप घेतला, आणि मार्गस्थ झाला.

---

## भाग ९.

पुराणीक वसईहून निघाला तो मजल दरमजल करीत कांहीं दिवसांनीं पेठ तालुक्यांत नारायणरावाच्या गांवीं जाऊन पोहोंचला. तेथें गेल्यावर एक मारुतीचें देऊळ होतें त्यांत उतरला. त्या गांवांत बहुतेक सर्व अडाणी लोकांचीच वस्ती होती, तरी त्या पुराणिकानें तेथें दंभ माजविण्याचें सुरू केलें. त्यानें सकाळीं रोज प्रातःस्नान करून स्वच्छ धोतर नेसून, अंगास व तोंडास भस्म फांसून, गळ्यांत, हातांत, दंडांत, रुद्राक्षांच्या माळा घालाव्या, व आसन मांडून पूजेचा थाट मांडून त्यावर शंकराचा बाण ठेवावा. व बाजूस पूजेचीं उपकरणीं चक्क घांसून थाटानें मांडून ठेवावीं. नंतर सावकाशपणें संध्या व देवपूजा करून, अर्ध्या अंगावर शालजोडी पांघरलेली आहे, पोटाला भस्म फांसलेलें आहे, व दोंदाखालीं त्या कठडेदार धोतराच्या चुण्या लागून गेल्या आहेत, अशा थाटानें लाल भडक गोमुखींत हात घालून,

किंचित् डोळे मिटून पुराणीकबोवांचा जप चालत असे ! हा वरील थाट, व त्याचा मूळचा जरासा स्थूल आकार, हीं पाहिलीं ह्मणजे पाहणारा जरासा भोळसर, व असल्या लोकांचीं ढोंगें न जाणणारा असा असला ह्मणजे त्याची ह्याचे ठिकाणीं कांहीं पूज्यबुद्धि होत असे. ह्याप्रमाणें पुराणीकबोवांचा क्रम सुरू झाल्यावर एक दोन दिवसांतच त्यांची सगळ्या गांवभर प्रसिद्धी झाली, व तेथील अज्ञानी लोक त्यांस भजूं लागले. नारायणरावासही तो आल्याची बातमी समजली. तेव्हां एके दिवशीं संध्याकाळीं तो देवदर्शनास गेला. दर्शन घेतल्यावर पुराणीक पोथी सोडून पहात बसले होते, त्यांस नमस्कार केला. पुराणिकानें हातांतील पत्र खालीं ठेविलें आणि नारायणरावास, जवळ पांढरी घोंगडी हांतरली होती तिजवर बसावयास सांगितलें.

**पुराणीक**—आपण येथेंच असतां काय ?

**नारायणराव**—हो येथेंच असतों.

**पुराणीक**—आपलें घर कोठें? येथें काय उद्योग करितां?

**नारायणराव**—माझें घर वसईस. येथें शाळेवर मास्तर असतों.

**नारायणराव**—आपण कोठचे रहाणार ? इकडे काय उद्देशानें आलां ?

**पुराणीक**—माझें वास्तव्य काशीक्षेत्र आहे. मी पुराण सांगत असतों. तेव्हां उदरनिर्वाहार्थ कोठें तरी देशपर्यटण करावें लागतें. सालमजकुरीं मुंबइकडे गेलों होतों. तिकडून आतां हळू हळू फिरत फिरत परत चाललों आहें. तेव्हां जातांना ह्मटलें ह्या तालुक्यांतून जाऊं. येथें पूर्वी जे तुमच्या जाग्यावर होते, ते आमचे नातलग होते. तेव्हां ह्मटलें ह्यांनाही भेटावें, आणि एकदां ही रानटी मुलूखही पहावा. अशा हेतूनें इकडून चाललों आहें, त्यांत आमचे कृष्णराव

( नारायणरावाच्या पूर्वीचा त्या जाग्यावरील मनुष्य ) तर भेटलेच नाहींत. तेव्हां आतां फक्त इकडील रानटी वस्ती मात्र पहावयाची !

**नारायणराव**–ह्या जंगलांत काय पहावयाचें आहे ?

**पुराणीक**–अहो पाहणाराला ह्या अरण्यांत देखील पाहण्यासारख्या अशा शेंकडों गोष्टी असतात. अशा ठिकाणीं ज्या गोष्टी आहेत त्या शहरांत राहून किंवा फिरून दृष्टीस पडावयाच्या नाहींत. शहरांत आहेत त्या अशा ठिकाणीं राहून दृष्टीस पडावयाच्या नाहींत. ह्याकरितां शहरेंही पाहिलीं पाहिजेत, व अशा रानटी वस्तींतील गांवढींही पाहिलीं पाहिजेत. आणखी मला पूर्वींपासून अशीं निरनिराळीं स्थळें पाहण्याचा नाद आहे.

**नारायणराव**–हा तुमचा नाद कांहीं वाईट नाहीं, पण हल्लीं पाऊसकाळ असल्यामुळें वाट चालण्यास त्रास पडतो.

**पुराणीक**–हें पहा! सगळेंच कसें साधतें ? मौज पाहण्याला पाहिजे तर श्रमही केले पाहिजेत व त्रासही सोसला पाहिजे.

**नारायणराव**––तेंही खरेंच. आतां येथें किती दिवस मुक्काम व्हावायचा आहे ?

**पुराणीक**–येथें येण्यास वाटेंत बरेच श्रम पडले आहेत, तेव्हां पांच सहा दिवस येथें विसावा घेऊन पुढें जाऊं असें ह्मणतों.

**नारायणराव**–बरेंच झालें ! तुह्मी चार दिवस बोलण्याचालण्यास तरी मला मिळालां. ह्या अशा रानटी गांवांत कोणी सुशिक्षितसा मनुष्य बोलण्याचालण्यास मिळत नाहीं; त्यामुळें सगळा दिवस कंटाळवाणा जातो !

**पुराणीक**–खरेंच तें, मलाही ह्या रानटी वस्तींत तुमच्या सारखे गृहस्थाचा सहवास झाला. हें मी आपलें भा-

ग्यच समजतों.

अशा कांहीं गप्पा गोष्टी झाल्यावर नारायणराव आपले बिऱ्हाडीं गेला. त्या दिवशीं तीनसांजची वेळ असल्यामुळें पुराणिकबोवांचे अंगावरील शालजोडीकडे त्याचें लक्ष विशेष गेलें नाहीं. नारायणरावास त्या ठिकाणीं कोणी चांगलासा मनुष्य कधीं संभाषण करण्यास मिळत नसे; त्यामुळें हा पुराणीक तेथें आल्यानें त्याला बरें वाटलें. हा गोड बोलणारा असल्यामुळें दुसरे दिवशीं दोन प्रहरीं जेवण झाल्यावर नारायणराव त्याजकडे गेला. आदल्या दिवशीं झालेल्या बोलण्यावरून गोपाळरावानें सांगितलेला व ज्यापाशीं आपणास काम आहे तो नारायणराव हाच अशी पुराणिकाची खातरी झाली होतीच. त्यामुळें नारायणराव उठून गेला तेव्हां ' उद्यां जेवण झाल्यावर सवड सांपडली तर या घटकाभर ' असें पुराणिकानें त्याला सांगितलें होतें, व त्यानेंही येण्याचें कबूल केलें होतें. तेव्हां आज नारायणराव खास येईल, असें समजून त्यानें त्या दिवशीं सकाळपासूनच ती शालजोडी अंगावर घेतली होती, व तिचे कांठ व पदर हे बाहेर दिसत अशा रीतीनें ती पांघरली होती. नारायणराव आल्यावर दोघांच्या गप्पा सुरू झाल्या. त्यांत कांहीं सुभाषितही निघालें. नारायणरावास सुभाषिताचा पहिल्यापासूनच छंद होता, व पुराणिकाजवळही त्याचा बराच संग्रह होता, त्यामुळें दोघांसही घटकाभर बरीच करमणूक झाली. असें चाललें असतां पुराणिकबोवा ती शालजोडी नारायणरावानें ओळखावी ह्मणून वारंवार सांवरीत असतां त्याचे इच्छेप्रमाणें नारायणरावाचें लक्ष्य त्या शालजोडीकडे गेलें. तो घरीं असतां बहुतकरून ती रोज अंगावर वापरीत असे; त्यामुळें त्याला ती आपलीच शालजोडी आहे असें वाटलें. परंतु त्या वेळेस त्यानें आपल्या म-

नांत आलेल्या संशयाविषयीं पुराणिकास कांहींच दर्शविलें नाहीं. तथापि त्याचे मनांत शालजोडीविषयीं कल्पना आली, हें पुराणिकास समजलें. व त्याच्या योगानें त्याला आनंद झाला. कारण तसें झाल्याशिवाय तो याच्या कपटपाशांत सांपडणार नव्हता. त्यानें त्या शालजोडीकडे लक्ष्यपूर्वक वारंवार पाहिलें, तेव्हां त्याची, ही आपलीच शालजोडी आहे अशी मनांत खातरी झाली. तरी त्याविषयीं कांहीं न बोलतां फक्त ' आतां शाळेची वेळ झाली आतां मी जातों, संध्याकाळीं येईन ' असें सांगून तो निघून गेला. नारायणरावाच्या मनांत त्या शालजोडीविषयीं अनेक कल्पना आल्या. एकदां त्याला असें वाटावें कीं, हा पुराणिक कोणी भामट्या किंवा उचल्या असावा. ह्यानें ती शालजोडी आपल्या घरांतून चोरून आणली असावी. कारण माझी प्रिया माझ्या परवानगीशिवाय कोणाला कांहीं देणार नाहीं. आणि त्यांत एवढी मूल्यवान वस्तू तर नाहींच देणार. तेव्हां ह्यानें ती चोरिलेली खचित. पुन्हां त्या पुराणिकाच्या बोलण्यावरून व त्याच्या एकंदर मुद्रेवरून व आचरणावरून—त्याला तसें नसावें असें वाटे. एकदां वाटे कीं, कोणी तरी चोरानें ती आपल्या घरून चोरून आणून ह्याला विकली असावी. पुन्हां असें वाटे कीं, हा पुराणिक गोदावरीचा कोणी नातलग असेल, व त्यामुळें ह्याची दया येऊन तिनें ह्याला ती दिली असेल. पण पुन्हां ती आपल्याला विचारल्याशिवाय देणार नाहीं हें मनांत येई. तिनें कांहीं वाईट हेतूनें ती ह्याला दिली असेल, हें तर त्याच्या स्वप्नांतही आलें नाहीं. त्याच्या प्रियेकडून बरेच दिवस पत्र आलें नव्हतें त्यामुळें त्याला फार काळजी लागलीच होती; त्यांत तें शालजोडीचें प्रकरण आढळलें त्यामुळें त्याला दिवसभर अगदीं चैन पडलें नाहीं. त्यानें ती शालजोडी नीट

पाहिली होती, त्यामुळें ती आपली नसेल, असें त्याच्या मनांत बिलकूल येईना. तेव्हां त्यानें विचार केला कीं, ह्या गोष्टीविषयीं पोलीसच्या नायकास वर्दी देऊन, त्या पुराणे-काजवळ ती शालजोडी कशी आली ह्याविषयीं चौकशी करवावी. पण पुन्हां त्यानें विचार केला कीं, एकदम पो-लिसास खबर न देतां, आज संध्याकाळीं आपणच त्यास युक्तीनें विचारावें. लागला शोध तर बरेंच झालें. नाहींतर त्याजवर पोलीसकडे चोरीची फिर्याद करावी ह्मणजे झालें. असा बेत ठरवून संध्याकाळीं शाळा सुटल्याबरोबर तो त्या पुराणिकाकडे गेला. पुराणीक ही शालजोडी पांघरून ह्या-ची वाट पहातच बसला होता. या बसा झाल्यावरः—

**नारायणराव**—पुराणिकबोवा, आज दिवसभर शालजो-डीच पांघरून बसलां आहां. थंडीबिंडी वाजते कीं काय ?

**पुराणीक**—छेः छेः विशेष थंडीबिंडी नाहीं वाजत. आपली पावसाळ्यामुळें स्वाभाविक थंडी लागते. त्यामुळें पांघरूण घेतलें आहे.

**नारायणराव**—ह्या दिवसांत कांहीं तरी उबेचें वस्त्र अंगावर पाहिजे. ही शालजोडी जुनी आहे. कधीं घेतली होती ही, केवढ्याला ?

**पुराणीक**—वः नारायणराव, आमच्या सारख्या या-चकवृत्तीवर उपजीवन करणाऱ्यांना विकत घेऊन नित्य शालजोडी पांघरणें हें शोभतें तरी काय ? आह्मी आपले याबळीवर निर्वाह करणारे ! कोणी तुमच्यासारख्यानें दिली एखादी जुनीपानी तर पांघरली. आपल्यांना विकत घ्यावयास लागली नसली ह्मणजे मग ती वस्तू मौल्यवान असली तरी पाहिजे तशी वापरण्यास कांहीं शंका वाटत नाहीं.

**नारायणराव**—मग तर तुह्माला ही मिळालेली आहे!

वः बराच जाडा यजमान मिळाला ! दिली तेव्हां अशी जुनी होती कीं नवी होती ?

पुराणिक—छेः हो ! नवी कोठची ? एवढी वस्तु आमच्या सारख्याला नवी कोण देतो ? आणि नवी दिली असती तर मी तेव्हांच विकून टक्के केले असते !

नारायणराव—ही कोठें मिळाली ? कधीं ?

पुराणिक—आतां पंधरा दिवस झाले मिळून ! ही बसईस मिळाली.

नारायणराव—असा यजमान तरी कोण ?

पुराणिक—तेथें एक गोपाळराव ह्मणून श्रीमंत गृहस्थ आहेत. यंदां मी श्रावण महिना तेथें लक्ष्मीनारायणाच्या देवळांत पुराण सांगत होतों, त्या वेळीं त्यांच्याच घरीं बिऱ्हाडाला होतों. तेव्हां त्यांचा मजवर कांहींसा लोभ होता. तेव्हां तेथून निघतांना त्यांच्या अंबू, त्यांनीं ही शालजोडी मला दिली.

गोपाळरावानें ही आपल्या घरची शालजोडी ह्या पुराणिकास दिली, हें ऐकतांच नारायणरावास मोठा विस्मय वाटला. आणखी पुराणिकानें ती शालजोडी गोपाळरावानें दिली, हें सांगतांना मध्यें जीभ चावल्यासारखें केलें होतें. त्यामुळें त्याचें मन फार अस्वस्थ होऊन गेलें. त्यानें आपल्या मनाच्या अस्वस्थतेचें चिन्ह बाहेर दिसूं नये ह्मणून पुष्कळ प्रयत्न केला, तथापि तें पुराणिकाच्या लक्षांत आल्याशिवाय राहिलें नाहीं. तरी त्यानें तें आपल्या लक्षांत आलें असें दाखविलें नाहीं.

नारायणराव—तुह्माला गोपाळरावानें ही शालजोडी दिली !

पुराणिक—हो, त्यांनींच दिली.

नारायणराव—त्यांनीं आपल्याजवळून दिली !

**पुराणिक**—कशी तरी दिली खरी. ते कशी कां दे-
नना ! मला काय ! आपले काम झाल्याशीं कारण !

**नारायणराव**—कशी तरी दिली ह्मणजे, त्यांनीं आ-
पणाजवळून दिली नाहीं असें वाटतें तर मग ?

**पुराणिक**—तें कांहीं असो. कोणाचें गृहछिद्र सांगणें चांगलें नाहीं. आणि तुह्माला तरी तें कशाला पाहिजे.

**नारायणरावानें** विचार केला कीं, ह्या वेळेस अधिक खटपटीस बसून उपयोगी नाहीं. आतां जरा आटपतेंच घे-तलें पाहिजे. असा विचार करून त्यानें तेव्हां कांहीं अ-धिक विचारिलें नाहीं. पुराणिकही संध्येची वेळ झाली ह्मणून उठला, व नारायणरावही आपल्या बिऱ्हाडीं गेला. त्याला त्या रात्रीं खाणें पिणें गोड लागलें नाहीं. आपल्या घरची वस्तु आपल्या हाडवैऱ्याच्या हातून ह्याला मिळाली कशी, ह्याविषयीं त्याला मोठें गूढ पडलें. कारण गोपाळराव हा जरी दुराचरणाचा पुतळा होता, तरी त्यानें आपल्या घरून ही शालजोडी चोरून आणिली असावी, अशी कल्पना त्याच्या मनांत येईना. कोणी तरी आपल्या घरून ती चो-रून आणून त्याला विकिली असावी, असें एकदां त्याच्या मनांत आलें; परंतु इतक्यांत त्या पुराणिकाचें, आपल्याला शालजोडी मिळाल्याच्या प्रकाराविषयीं संशयित सांगणें, व त्यावर कोणाचें गृहछिद्र उघड करूं नये इत्यादि भाषणें त्याच्या मनांत येत. त्यामुळें ही शालजोडी पुराणिकाजवळ कशी आली ह्याविषयीं बरोबर अशी कांहीं कल्पना बसेना. अशा कल्पना करण्यांत त्याची बहुतेक रात्र गेली. शेवटीं, आपण उदईक पुराणिकाकडे जाऊन त्याच्याशीं अधिक सलगीचें व मित्रतेचें बोलणें लावून, व त्याला त्याचे येथें एक पुराण सांगवून चांगली पाठवणी करण्याची आशा दाखवून, त्याजपासून त्या शालजोडीची हकीकत काढून

घ्यावी—असा त्यानें निश्चय केला. दुसरे दिवशीं सकाळीं तो शाळेंत गेला. परंतु त्याला एकेक तास एका वर्षासारखा वाटूं लागला. दोन प्रहरीं जेवण झाल्यावर तो पुराणिकाकडे गेला. पुराणिकाच्या मनांत, नारायणरावाचे आपण मोठे मित्र आहों व त्यावर आपली फार प्रीति आहे असें त्याला दाखवून त्याचा आपणावर उत्तम विश्वास बसे असें करावयाचें होतें, व त्याचप्रमाणें नारायणरावाचे मनांतही पुराणिकाच्या ठिकांणीं प्रेमभाव दाखवून, त्याचा आपणावर चांगला विश्वास बसे, व तो आपल्या गुप्त गोष्टी सांगे असें करावयाचें होतें. सारांश दोघांसही आपण एकमेकांचे जिवलग मित्र आहों असें एकमेकांस वाटे असें करावयाचें होतें. मात्र असें करण्यांत दोघांचे हेतु निरनिराळे होते. ते वाचकांस उघड सांगावयास नकोतच.

नारायणराव तेथें गेल्यावरः—

पुराणिक—नारायणराव एखाद्या मनुष्याच्या चेहेऱ्यांत व बोलण्याचालण्यांत परमेश्वरानें असा कांहीं मोहक गुण ठेविला असतो कीं, त्याला पाहिलें व त्याच्याशीं बोलणें चालणें झालें ह्मणजे त्या पाहणाराचें किंवा बोलणें चालणें करणाराचें त्याजकडे मनच वेधून जातें, व हा आपला जिवलग मि. असावा असें वाटूं लागतें. हा गुण ईश्वरानें तुमच्या अंगीं ठेविला आहे, असें मला वाटतें. पहा ! ! माझा तुमचा ह्मटला ह्मणजे आज दोन तीन दिवसांचा कायतो परिचय. पण तितक्या काळांतल्या परिचयानेंही मला, तुमचा माझा चिरकाल सहवास व्हावा व आपण एकमेकांचे परम मित्र व्हावें, असें वाटत आहे. काय अन्य जन्मींचा संबंध असेल तो असो ! !

नारायणराव—पुराणिकबोवा, खरें ह्मणाल तर मलाही तसेंच झालें आहे. तुह्मी आतां दोन तीन दिवसांनीं जा-

णार. हें मनांत येऊन फार वाईट वाटतें ! पण करावें काय? त्याला कांहीं इलाज नाहीं. असो, तुह्मी जाण्याच्या अगोदर तुमचें एक पुराण सांगवून कांहीं संभावना केली पाहिजे, ह्मणजे कधीं तरी माझी तुह्माला आठवण होत जाईल.

**पुराणीक**—दिल्या घेतल्यानेंच आठवण राहते असें नाहीं; मनाचा ओढा एकमेकांकडे पाहिजे. बाकी तुह्मी ह्मणतां तेंही ठीक आहे. आमचा धंदाच तो आहे.

**नारायणराव**—तुह्मी निरनिराळे ठिकाणीं फिरतां, त्यामुळें तुह्मास स्नेहीही पुष्कळच मिळतात. व तुमच्या धंद्याच्या संबंधानें व तुमचा स्वभाव गोड व मनमिळाऊ असल्यामुळें तुह्माला देणारेही पुष्कळ. ही शालजोडी देणारा तरी तुमचा उत्तम स्नेहीच असेल ह्मणावयाचा.

**पुराणीक**—कांहींसा स्नेही तर खराच. शिवाय तो श्रीमंत व सढळ हाताचा असल्यामुळें तिकडे कधीं आलें गेलें तर थोडी बहुत प्राप्तीही होण्याचा संभव आहे. ह्यामुळें तो स्नेही. बाकी तो तुमच्यासारखा चतुर, विद्वान, रसिक, असा नाहीं. त्यामुळें तुमच्याकडे माझें मन जसें ओढ घेतें तसें त्याकडे घेत नाहीं.

**नारायणराव**—अहो पुराणीक बोवा, काल तुह्मी ह्या शालजोडीविषयीं हकीकत सांगितली, ती सर्व जशी आहे तशी सांगितली नाहीं. कांहींशी चोरून ठेविली आहे असें वाटतें. ती मला सविस्तर व यथातथ्य ऐकण्याची इच्छा आहे. जर तुमचा माझा उत्तम स्नेह आहे, व तुमच्या माझ्यामध्यें जर कांहीं परकेपणा नाहीं, व पडदाही राहिला नसेल, तर ती हकीकत तुह्मी मला सांगाल अशी आशा आहे.

**पुराणीक**—हातुतिच्या ! सांगेन तर काय झालें ! जरी ती हकीकत गुप्त आहे, तरी त्या ठिकाणापासून इतक्या अंतरावर आणि त्यांत तुमच्या सारख्या स्नेह्याजवळ

सांगण्यास कांहीं हरकत नाहीं. कारण तुह्मी कोणत्याही गोष्टीचा बभ्रा करणारे गृहस्थ नाहीं पण, नारायणराव, त्या शाळजोडीच्या हकीकतीविषयीं तुह्माला इतकी उत्कंठा कां लागली आहे तें तुह्मीं मला सांगितलें पाहिजे.

**नारायणराव**—तुह्माकडून ती हकीकत ऐकिल्यावर मी तें खचित सांगेन, यांत अंतर करणार नाहीं. पण प्रथम तुमच्या तोंडून हकीकत ऐकिली पाहिजे.

**पुराणीक**—ऐका तर, मीं पर्वां तुह्माला सांगितलेंच आहे कीं वसईस मी एक महिना लक्ष्मीनारायणाच्या देवळांत पुराण सांगत होतों. तेव्हां बिऱ्हाडास व जेवणाखाण्यास गोपाळरावजींकडेच होतों. त्याची वर्तणूक तुह्मास कदाचित् माहीत असेलच.

**नारायण०**—(मध्येंच) छेः छेः मीं त्याला नुसता पाहिला आहे. बाकी त्याच्या आचरणाविषयीं मला कांहीं माहिती नाहीं. कारण मी लहानपणापासून वर्षानुवर्ष एकसारखा तेथें कधीं राहिलोंच नाहीं.

**पुराणीक**—बरें, ते गोपाळराव पराकाष्ठेचे बाहेरख्याली आहेत, व त्यांच्याजवळ पैसाही बराच असल्यामुळें त्यांना आपलीं दुर्व्यसनें पूर्ण करण्यास फारसें कठिण पडत नाहीं. त्यांनीं किती वेश्यांचा उपभोग घेतला असेल, ह्याची तर गणतीच नाहीं ! शिवाय कितीएक गरतीही बिघडविल्या आहेत. हलक्या जातीच्या होत्या त्यांना तर बाहेरच काढिलें आहे. बाकी ज्या पांढरपेशे गृहस्थ लोकांच्या आहेत त्यांच्याशीं चोरून मारून धंदा चालू आहेच. आज ह्या गृहस्थाच्या तरुण स्त्रीच्या पाठीस लाग, ती मिळून आठ चार दिवस झाले ह्मणजे उद्यां दुसरीच्या पाठीस लाग, हा कारखाना चाललेला असतो. हल्लीं ज्याच्याकरितां त्याचा प्रयत्न आज बरेच दिवस चालला होता असें एक

प्रियपात्र त्यांच्या हस्तगत झालें आहे. त्यांच्या सांगण्यांत हल्लीं मिळालेल्या तरुणीकरितां त्यांना फार खर्च पडला, व फार श्रम करावे लागले. ती स्त्री फार सुंदर आहे. तिचा नवरा कोठेंसा बाहेर गांवीं नोंकरीवर आहे. तिच्या घरांतही कोणी फारशीं मनुष्यें नाहींत असें वाटतें. कारण ती तरुणी कधीं कधीं ह्यांच्या बागेंतील बंगल्यांत रात्रींची येत असते.कधीं कधीं हे तिच्या घरीं जात असतात,व सर्व रात्र तेथेंच घालवितात. मी त्यांजकडे असतांना त्यांचा मजवर बराच लोभ जडला होता. त्यामुळें मीं तेथून निघण्याच्या पूर्वी आठ दहा दिवसांवर त्यांना ह्मटलें होतें कीं, पाऊस काळांत थंडी फार वाजते, ह्याकरितां आपल्यासारख्या थोरांची आठवण राही असें एक मला ऊर्णावस्त्र द्यावें. त्यावरून त्यांनीं देईन ह्मणून सांगितलें, परंतु माझा निघण्याचा दिवस येईपर्यंत त्यांनीं कांहीं दिलें नाहीं. मी उद्यां सकाळीं निघणार तर आदल्या रात्रीं जेव्हां ते आपल्या प्रियपात्राकडे जावयास निघाले, तेव्हां सकाळीं त्यांची आपली गांठ पडावयाची नाहीं असें समजून मी त्यांचा निरोप घ्यावयास गेलों, व हळूच त्या कबूल केलेल्या वस्त्राचीही आठवण केली, तेव्हां ते जाण्याच्या घाईंत होते. ते मला ह्मणाले, 'मला आतां घाई आहे, सकाळीं जातांना तें घर तुमच्या वाटेवरच आहे व तुह्माला माहीतही आहे, तेथें मला हांक मारा, ह्मणजे तेथेंच तुमची तजवीज करूं' मी हें त्यांचें बोलणें थापाथापीचें असें समजलों. परंतु आशा ही अमर आहे. त्यामुळें मी सकाळीं मोठ्या पहांटेस जेव्हां निघालों तेव्हां एकदां त्या घरावरून जावें असें मनांत आलें. ह्मणून तसाच पडशी खांद्यावर घेतलेलाच त्या घरीं गेलों, आणि माडीखालीं उभा राहून गोपाळरावजींस हाक मारिली, तेव्हां ते खिडकीजवळ आले, व त्यांनीं मला पाहिलें, तेव्हां खालीं येऊन दर-

वाजा उघडून मला वरतीं नेलें. आणि त्यांच्या अंगावर ही शालजोडी होती ती माझ्या अंगावर टाकिली, आणि आपल्या प्रियकरणीस ह्मणालेः—'हे पुराणिकबोवा फार सज्जन व गरीब आहेत. ह्मणून मीं त्यांना ही शालजोडी दिली आहे, तर त्यांच्या पत्नीस तूंही कांहीं दे,' ह्यावर ती ह्मणालाः— मी काय देऊं? असें ती ह्मणते आहे तोंच गोपाळरावांनीं, तेथें दांडीवर एक तिचें अमदाबादी लुगडें व जरीकांठी चोळी होती ती घेऊन माझ्या अंगावर टाकिली आणि मला ह्मणाले, 'ही आमच्या लाडकीनें तुमच्या बायकोस देणगी दिली आहे बरें कां, तेव्हां मीं त्या उभयतांचे आभार मानिले. इतक्यांत ती तरुणी गोपाळरावास ह्मणालीः—हें काय? माझीं चांगलीं चांगलीं सगळीं चिरगुटें देऊन टाकलीं? हें काय? आतां घरीं आल्यावर हीं चिरगुटें कोठें आहेत ह्मणून विचारिलें, तर मी काय सांगूं? तेव्हां रावसाहेब ह्मणालेः— अग हो, मी आज दोन प्रहरच्या आंत तुला ह्याच जातीचीं नवीं वस्त्रें आणून देईन. हीं जुनीं झालीं आहेत. जाऊंदे तीं. त्यांची बिषाद ती किती? इतकें झाल्यावर त्यांनीं दिलेलीं वस्त्रें मी पडशींत घालून त्यांचा निरोप घेऊन चालू झालों. अशी ह्या शालजोडीची हकीकत आहे. समजलां? आतां तुह्मांला ही हकीकत ऐकण्याची इतकी उत्कंठा कां होती तें सांगा.

ही हकीकत पुराणीक सांगत असतां, नारायणरावाचे मनाची स्थिति कशी झाली असेल, हें लिहून व्यक्त करणें कठिण आहे. त्याची वाचकांनींच कल्पना करावी. त्याच्या मनांत दुःख, क्रोध, विस्मय, संशय यांनीं गडबड करून सोडिली होती, व ते ते मनोविकार त्याच्या मुद्रेवर व्यक्त होत होते, त्याला ती गोपाळरावाची प्रियकरणी आपली प्रिया गोदावरीच असावी असें खास वाटलें. परंतु संशया-

ला जागा राहूं नये ह्मणून तो आपले मनोविकार किंचित् दाबून पुराणिकास ह्मणालाः—

"मला उत्कंठा कां होती तें मी सांगतों; पण एकदां तें लुगडें व ती चोळी पाहण्याची इच्छा आहे. दाखवाल तर फार चांगलें होईल!

**पुराणिक**—तुह्मीं तर शर्थ केलीत बोवा! अहो तुह्माला पाहिजे कशाला तें? बरें चिंता नाहीं. तुमची इच्छा कां मोडा? हें पहा ( असें ह्मणून त्यानें आपल्या पडशींतून तें लुगडें व ती चोळी काढून त्याला दाखविली. )

**नारायणरावानें** तें लुगडें व चोळी हीं आपलींच आहेत असें तेव्हांच ओळखिलें. तेव्हां जरी त्यानें एवढा वेळपर्यंत आपल्या मनोविकारांचा आवेश दाबून ठेवण्याचा प्रयत्न केला होता, व अझूनही करीत होता; तरी ते कांहीं न चालतां त्याच्या डोळ्यांतून टप टप टप अश्रु गळूं लागले. परंतु लागलेच ते अश्रु बंद होऊन त्याचे डोळे रागानें लाल होऊन गेले. व त्यांतून आतां रक्ताचे बिंदु निघतात कीं काय असें वाटूं लागलें. चेहेरा आरक्त झाला. मस्तकाच्या शिरा फुगून गेल्या. व तो दांत ओठ चावत आहे असें दिसूं लागलें. ह्या स्थितींत कांहीं वेळ गेल्यावर तो रागाचा आवेश कांहीं कमी झाला. व तो शुद्धीवर आल्यासारखा होऊन पुराणिकास ह्मणालाः—

पुराणिकबोवा, तें त्या गोपाळरावाच्या पात्राचें घर कोठेंसें आहेहो? त्याच्या कांहीं खुणा सांगा पाहूं.

**पुराणिक**—तें त्या काशीविश्वेश्वराच्या देवळाच्या पुढून जो पूर्वेकडे किल्ल्यांत रस्ता जातो त्या रस्त्यावर देवळापासून दुसरें किंवा तिसरें घर आहे. त्या घराच्या दारांत नागचांफ्याचें झाड आहे. व त्या घराच्या माडीच्या खिडक्यांस हिरवा रंग दिलेला आहे. हें ऐकून आपल्या

पत्नीचें पातिव्रत्य भ्रष्ट झालें, ह्याविषयीं नारायणरावाची अगदीं खातरी झाली. तो कांहीं वेळ तसाच स्तब्ध राहिला. नंतर एक दीर्घ आणि उष्ण असा श्वास टाकून ह्मणालाः– "स्त्रियांचें चरित्र देवांसही समजत नाहीं." असें ह्मणतात तें खरें आहे !

पुराणिक—नारायणराव, ही शालजोडीची हकीकत ऐकिल्यापासून तुमचे मनाची कांहीं चलबिचल झाल्यासारखी दिसते. ह्यावरून ह्या हकीकतीशीं तुमचा साक्षात् किंवा परंपरेनें कांहीं तरी संबंध असावा असें वाटतें; आणि त्यामुळेंच ही हकीकत ऐकिल्यापासून तुमचें मन क्षुब्ध झालें असावें. मला ह्या हकीकतीशीं तुमचा कांहीं संबंध आहे असें पूर्वी समजतें तर ती मांगून तुह्माला त्रास देण्यास कारण मी झालों नसतों. आतां झालें तें झालें. पण तुह्मी जे इतके खोदखोदून ही हकीकत विचारीत होतां त्याचें कारण काय ?

नारायणराव—तुह्मीं जी गोपाळरावाची प्रियकरणी ह्मणून सांगितली, ती माझ्या एका जीवलग मित्राची बायको आहे, अशी आतां खातरी झाली आहे. पहिल्यानें जेव्हां मीं तुह्माजवळ ही शालजोडी पाहिली, तेव्हांच ही आमच्या स्नेह्याच्या घरची असावी असा मला संशय आला. त्यावरून ती तुह्मांजवळ कशी आली, ह्याविषयीं मला हकीकत समजण्याविषयीं उत्कंठा झाली, ह्मणून तुह्मास विचारिलें. तिचा नवरा घरीं नाहीं हें खरें आहे, व तुह्मीं तिच्या घराच्या ज्या खुणा सांगितल्या त्याही खऱ्या आहेत. तिचा नवरा, तो माझा अत्यंत स्नेही असल्यामुळें त्याच्या घरीं माझें–मी तेथें असतां–जाणें येणें फार असे. तेव्हां तिची माझीही चांगली ओळख आहे. तिच्या नवऱ्याची तिजवर प्राणाप्रमाणें प्रीति आहे व तो घरीं होता तेव्हां ती बायकोही,

आपली नवऱ्यावर जिवाप्रमाणें प्रीति आहे असें दाखवीत असे. असें असतां तिनें हा असा बेइमानीपणा केला, तो ऐकून मला अतिशय वाईट वाटलें व राग आला.

**पुराणीक**—शिव, शिव, शिव, ! ! मीं ही हकीकत सांगितली नसती तरी बरें झालें असतें ! मी तुह्माला दुःख देण्याला कारण झालों, ह्याविषयीं मला फार वाईट वाटतें ! त्यापेक्षां मी येथें आलों नसतों तरी बरें झालें असतें. येथें येऊन तुमची ओळख झाली नसती तरी चांगलें ! ओळख झाल्यावर तरी मीं ही हकीकत तुह्माला कां सांगावी ?

**नारायणराव**—पुराणिकबोवा, ह्यांत तुमचा कांहीं दोष नाहीं. तुह्मी आपणास उगीच दूषण देऊं नका. त्या अवदसेचें आचरणच जर तसें नसतें, तर तुह्मी तरी ही गोष्ट कोठून सांगतेत ! असो. तिच्याविषयीं कांहीं तजवीज केली पाहिजे. नाहींतर ती अशा आचरणानें एखाद्या वेळेस माझ्या मित्राचा घात करील.

**पुराणीक**—तजवीज ती काय करावयाची ?

**नारायणराव**—ही गोष्ट तिच्या नवऱ्यास कळवावयाची, ह्मणजे त्याची तिजवर जरी फार प्रीति आहे, तरी ही गोष्ट त्याला समजल्यावर तिची समाप्ति झाल्याशिवाय राहणार नाहीं ! असें बोलणें झाल्यावर **नारायणरावाचे** मनास फारच अस्वस्थता झाली असल्यामुळें, तो पुराणिकाचा निरोप घेऊन आपले बिऱ्हाडीं गेला. ती **गोदावरीची** वर्तणूक ऐकून त्याला भ्रमिष्टासारखें झालें. त्यादिवशीं तो शाळेंत गेला नाहीं. आपल्या खोलींत बिछान्यावर तळमळ करीत पडला. तो आपणाजवळ ह्मणालाः—मीं तिच्या नादीं लागून लग्न केलें ही माझी मोठी चूक झाली. तसाच लग्नावांचून राहिलों असतों तर बरें झालें असतें. परंतु तिला पाहिल्यापासून माझ्या मनाला तिचा ध्यास लागला. तिचें

सौंदर्य, तिचा सुशिक्षितपणा, तिचें चातुर्य हीं पाहून व त्या गोपाळरावाच्या पदरीं पडल्यानें होणारी तिची दैना, हीं मनांत येऊन, व तिची त्याच्याविषयीं नावड पाहून मी तिचा अंगीकार करण्याच्या खटपटींत पडलों. तिनेंही आपलें तनमन माझ्या ठिकाणीं अर्पण केलें, व माझ्याशिवाय इतर पुरुष मात्र पिता-बंधुसमान आहेत अशीही शपथ वाहिली! लग्न झाल्यावरही तिनें किती प्रीति दाखविली! आणि मी इकडे येतांना तरी तिनें वियोगदुःखाच्या वेदना किती होत आहेत असें दाखविलें! आणि आतां मागें अशीं कर्मे अँ!! शिव शिव शिव!! जिच्या पातिव्रत्याविषयीं, चातुर्याविषयीं, व इमानीपणाविषयीं मी अभिमान वाहत होतों, व मनांत संतोष मानीत होतों, तिचीं हीं कृत्यें!! अशा पतिव्रतेपेक्षां वेश्या पुष्कळपट बरी! कारण ती उघडपणें आपण वेश्या ह्मणूनच सांगते. तेव्हां तिनें कितीही पुरुष पाहिले तरी त्यांत कांहीं दोष नाहीं. पण ह्या अशा मानभावणी, वर वर प्रीति व पातिव्रत्याचा डौल दाखवून मागें अशीं दुष्कर्मे करीत असतात! ह्या वेश्यांपेक्षांही नीच होत! आतां आपल्याना या जगांत सुख ह्मणून नाहींसें झालें! आतां ह्या दुःखित अवस्थेंत रहाण्यापेक्षां मरण बरें! परंतु आपण मरण्याच्या अगोदर त्या बेइमानी मानकाप्या वेश्येस तिच्या कर्माप्रमाणें शिक्षा दिली पाहिजे! हिला शिक्षा ह्मटली ह्मणजे मृत्यूची दिली तरी ती थोडकीच! तथापि ज्यापेक्षां दुसरी कडक शिक्षा नाहीं त्यापेक्षां तीच द्यावी हें योग्य. ह्या पुराणिकाच्या दृष्टीस हें फक्त गोपाळरावाचें व तिचें मात्र मूत पडलें आहे. ह्याशिवाय आणखी किती असतील कोण जाणें? हा रांडे, दुष्टे, निर्लज्जे! तुझ्या बेइमानीपणाची कमाल झाली! कांहीं चिंता नाहीं! तूं काय समजली आहेस! थोड्याच दिवसांत तुझ्या दुष्क-

र्माचीं फळें भोगावयास तुला नरकवासांत पाठवितों! ठीक आहे! आतां जाहीर रिपोर्ट करून येथून निघण्याचा बेत करावा. रिपोर्ट करून हुकूम येण्यापूर्वी निघून गेल्यामुळें, वरिष्ठांची मर्जी खप्पा होईल, इतकेंच कीं नाहीं? मर्जी खप्पा झाली तर माझा नोकरीवरील हक्क दूर करतील, एवढेंच कीं नाहीं? करीतना कां हक्क दूर! आतां आपल्याना नोकरी करून तरी काय कर्तव्य आहे? नोकरी करून दोन पैसे मिळवावयाचे ते संसार-सुखाकरितांच कीं नाहीं? तें संसार-सुख ह्मटलें ह्मणजे स्त्रीपासूनच प्राप्त व्हावयाचें. स्त्री केली तिचें हें कपाळ!! प्रत्यक्ष तिला ज्याच्याविषयीं नरका सारखा तिटकारा होता, त्या गोपाळरावाशीं ती रत झाली!! काय करावें ह्या वेळेस तीं दोघें जवळ पाहिजे होतीं! ह्मणजे प्रथम त्यांचे राई राई एवढे तुकडे तुकडे करून टाकिले असते! मग दुसरी गोष्ट! पण त्याला काय ह्मणून शिक्षा द्यावी? आपलाच दाम खोटा, मग दुसऱ्यास कां बोल लावावा? आपली बायको जर त्याच्याकडे लक्ष न देती, तर तो काय करणार होता? आज दोन महिन्यांत जें निच्याकडून पत्र आलें नाहीं त्याचें तरी कारण हेंच असावें. बरोबरच, आतां आह्माला पत्र कशाला येईल? आह्मी आतां आपले नांवाचे नवरे! अवदसे, तूं मला नांवाचा नवरा बनविलास काय? ठीक आहे येतों मी लवकरच तुझा समाचार घ्यावयास! आतां निघण्याचाच बेत करावा. जातांना त्या पुराणिकालाही बरोबर घ्यावा. तो एकदां तो सर्व प्रकार आपणास प्रत्यक्ष दाखवील. ह्मणजे समक्ष पाहिल्यावर आपण परमेश्वराचेही अपराधी राहणार नाहीं. हाच बेत.असा हा बेत ठरवून तो तसाच त्या पुराणिकाकडे गेला.

**पुराणिकः**—कां नारायणराव आज तुह्मी शाळेंत गेलां नाहीं? आज कांहीं तब्येत बिघडलेली दिसत आहे.

काय झालें आहे बरें ?

**नारायणराव**—दुसरें कांहीं नाहीं, त्या आमच्या स्नेह्याच्या बायकोची वाईट हकीकत ऐकिल्यापासून ती मित्राला एकदां केव्हां सांगून तिचें पारिपत्य करवीन असें झालें आहे, व त्याकरितां आपण समक्ष जाऊन ती ऐकिलेली गोष्ट स्वतः पहावी असा हेतु आहे. ह्मणजे मग संशयास ह्मणून तिळमात्र जागा राहणार नाहीं. पण ती गोष्ट नजरेस पडण्यास तुमचें साहाय्य पाहिजे. नाहींतर ती माझ्या दृष्टीस पडण्याचा योग येणें कठिण आहे. ह्याकरितां कृपा करून तुह्मास तेथपर्यंत आलें पाहिजे. तुमचा जाण्यायेण्याचा सर्व खर्च मी देईन व आणखी तुमची चांगली पाठवणीही करीन.

**पुराणिक**—हें पहा ! ‘ विकत श्राद्ध घेऊन तर्पण ’ त्यांतली अवस्था ! मीं आधीं तुह्मांला ती गोष्ट सांगितली कशाला? न सांगावी, तर स्नेह्याजवळ प्रतरणा केल्याचा दोष येतो ! म्हणून सांगितली. जाऊंद्याहो ? आहे काय त्यांत ? दिव्याखालीं अंधार आहेच ! घरोघर मातीच्याच चुली ! तुमच्या स्नेह्याला हें कळवूं नका ह्मणजे झालें. तिला शिक्षाच करावयाची असली, तर तिच्या नवऱ्याला कांहीं तरी सांगून तिला हांकून देववा ह्मणजे झालें. ह्या एवढ्या पंचाईतींत तुह्मी कशाला पडतां ? बाकी मजकडून तुह्माबरोबर तेथपर्यंत येण्यास ह्मणजे हरकत आहे, असें बिलकुल नाहीं. व मी तुह्मांजवळून येण्याजाण्याचा खर्चही बिलकुल घेणार नाहीं. व मला घेणें योग्यही नाहीं. आणखी तुह्मी म्हणतां तेंही एकपक्षीं खरें आहे; कारण कोणालाही त्याच्या संबंधाच्या मनुष्याच्या दुराचरणाविषयीं गोष्ट सांगावयाची असली, तर ती प्रत्यक्ष पाहिलेली असणें हें चांगलें. आणि मीं सांगितलेली गोष्ट नजरेस पडणें ह्मटलें ह्मणजे

तें माझ्याशिवाय होणार नाहीं. कारण ती दृष्टीस पडण्यास गोपाळरावाशीं कांहींसा स्नेह असला पाहिजे, व त्याच्याशीं कांहीं दिवस सहवासही झाला पाहिजे. तें तर तुमच्यानें होणें कठिण. तेव्हां तुमचा हेतु सिद्धीस जाण्यास माझें साहाय्य पाहिजे हें खरें. परंतु मी पुनः सांगतों कीं, तुह्मी ह्या भानगडींत पडूं नका.

**नारायणराव**—पुराणिकबोवा, तें कांहीं व्हावयाचें नाहीं. तिच्या नवऱ्याची व माझी इतकी मित्रता आहे कीं, तुह्मीं सांगितलेली गोष्ट ऐकिल्यापासून ती गोष्ट जणूं काय माझ्याच घरीं झाली आहे असें मला वाटत आहे ! तरी माझें लग्न झालेलें नाहीं ह्मणून बरें ! नाहींतर मला आपल्या बायकोविषयीं देखील असाच संशय आला असता ! मला त्या मित्रस्त्रीचें दुष्कृत्य ऐकिल्यापासून फार दुःख झालें आहे. माझा मित्र फार सत्वशील, स्वस्त्रीशिवाय इतर स्त्री माता, भगिनीसमान मानणारा आहे. असें असतां त्याची स्त्री बेइमानी निघाली ! ह्याकरितां मला ही गोष्ट एकदां प्रत्यक्ष पाहून त्याला तावडतोब कळवून तिला शासन करविलें पाहिजे. ह्याकरितां जर तुह्मी माझे मित्र ह्मणवितां, तर मजबरोबर उद्यां तुह्मीं वसईस जाण्याची तयारी केली पाहिजे.

**पुराणिक**—पण तिला तुह्मी कशी पाहण्यास इच्छितां ? प्रत्यक्ष त्याच्याशीं रत होतांना कां तुह्मी तिला पाहणार ! तशी तर पाहण्यास सांपडणें कठिण. त्याच्याजवळ बसलेली दृष्टीस पडेल, किंवा त्याच्या तिच्या गोष्टी ऐकावयास सांपडतील.

**नारायणराव**—ती त्याच्या जवळ बसलेली पाहिली, तरी पुरें. निदान ती आणि तो एका खोलींत असलेलीं दिसलीं तरी बस आहे. किंवा त्याच्या आणि तिच्या गोष्टी

चाललेल्या ऐकण्यास सांपडल्या तरी चिंता नाहीं.

**पुराणिक**—तसें होईल. तो तिच्या घरीं गेला असला तर तेथें दृष्टीस पडेल, किंवा ती त्याच्या बंगल्यावर आली असली तर तेथें दृष्टीस पडेल. पण कोठें तरी पडेल खास.

**नारायणराव**—बरें आहे. तर मग उद्यां मोठ्या पहाटेस निघावयाचें. मी त्या वेळेस आपलें बोचकेंबिचकें घेऊन येथेंच निघून येतों.

**नारायणराव** बिऱ्हाडीं गेल्यावर पुराणिकानें, "आपण येथें आल्यापासून काय काय केलें व नारायणरावाच्या मनांत गोदावरीविषयीं पूर्वी ठरल्याप्रमाणें कसा संशय आणून दिला, व तो त्याच्या मनांत कसा बिंबला आहे, व त्याला गोदावरी व गोपाळराव हीं एके ठिकाणीं बसलेलीं किंवा गोष्टी बोलत असतांना दाखविण्याचें मीं कबूल केलें आहे. आह्मीं तिकडे यावयास उद्यां सकाळीं निघण्याचा बेत केला आहे. परंतु मी तो एक दोन दिवस लांबणीवर टाकीन, व वाटेनेंही येण्याची त्वरा करणार नाहीं. ह्मणजे, आह्मी तेथें येऊन पोंचेपर्यंत तुह्मास योग्य तजवीज करण्यास अवकाश मिळेल. आह्मी बहुतकरून आश्विन शुद्ध अष्टमीचे दिवशीं तेथें येऊन पोंहचूं, ह्मणजे त्या दिवशीं गांवांत महालक्ष्मी [illegible]तात. तेथें सर्व बायका हळदीकुंकवास व फुंकावयास जातात. त्यामुळें त्या दिवशीं गोदावरीही महालक्ष्मीला जाईल. ह्मणजे नारायणराव जर पूर्व रात्रीं तिला पहावयास गेला, तर ती घरांत नाहीं असेंच त्याच्या दृष्टीस पडेल." असें पत्र लिहून, एका मजूरदारास त्यानें मागितल्यापेक्षां आठ आणे अधिक देण्याचें व फार त्वरित रात्रीचा दिवस करून पत्र नेलें तर, आणखी तितकेंच इनाम देण्याचें कबूल करून त्याला त्याच वेळेस बसईस रवाना केला. तो मजूरही पैशाच्या आशेनें दररोज मोठ-

मोठ्या मजला करीत वसईस गेला आणि त्यानें तें पुराणिकाचें पत्र गोपाळरावास दिलें, त्यानें त्याच्या जलदीबद्दल त्याला एक रुपया इनाम दिला.

इकडे नारायणराव पुराणिकबोवांजवळून सकाळीं निघण्याचा बेत ठरवून गेल्यावर तोही निघण्याचे तयारीस लागला. त्यानें आपल्या शाळेचा सर्व चार्ज असिस्टंट जवळ दिला, व कांहीं जरूरीचें काम असल्यामुळें मी आठ दिवसांचे रजेवर निघून गेलों असा वरिष्ठाकडे रिपोर्ट केला. नंतर रात्रीचे तीन वाजले तेव्हां आपल्या वस्त्रांचें बोचकें बांधिलें. आपली बंदूक, दोन पिस्तुलें, एक तरवार, त्यानें तेथें विकत घेतलीं होतीं तीहीं बरोबर घेतलीं, आणि बिऱ्हाडच्या मनुष्यांचा निरोप घेऊन पांच वाजण्याच्या सुमारास पुराणिकास हांक मारावयास आला, त्यानें पांच दहा हांका मारिल्या, तेव्हां एकदां पुराणिकानें देवळांतून खोल स्वरानें हांक दिली, व देवळाचें दार उघडिलें.

नारायणराव--कां पुराणिकबोवा, आतां निघावयाचेंना ? उठा, चला बोचकें बांधा.

पुराणिक—निघावयाचें खरें, पण काल संध्याकाळीं तुह्मी येथून गेल्यावर एक घटकेनें माझ्या पोटांत मनस्वी कळ उठून ऊर्ध्व झाला, त्यामुळें एकसारखा तळमळत पडलों होतों. मजजवळ औषधें होतीं तीं सर्व घेतलीं; पण कांहीं केल्यानें गुण पडेना. आतां एक घटका झाली तेव्हांपासून कांहीं बरें आहे. पण रात्रीपासून एकसारख्या वेदना होत असल्यामुळें जागरण झालें, व जीव अगदीं थकून गेला आहे. त्यामुळें माझ्यानें कसें निघवेल. उद्यां सकाळीं मोठ्या पहाटेस निघण्याचा बेत ठरवावा.

नारायणरावास, एकदां वसईस केव्हां जाईन व त्या नारिणीचें दुष्ट कृत्य समक्ष पाहून तिला योग्य शासन केव्हां

करीन असें झालें होतें, व त्यामुळें त्याला दुसरें कांहीं दिसत नव्हतें, तरी पुराणिकाशिवाय तेथें आपण जाणें निष्फळ समजून निरुपायानें त्याला त्याच्या ह्मणण्यास रुकार द्यावा लागला.

दुसऱ्या दिवशीं संकेताप्रमाणें पुराणीक व नारायणराव हे निघाले. नारायणरावाच्या सर्व इंद्रियांस गोदावरीच्या दुष्ट कृत्यांशिवाय दुसरें कांहीं भासतच नसे. त्याच्या डोळ्यांपुढें गोदावरी व गोपाळराव हीं एके ठिकाणीं बसलीं आहेत व विलास करीत आहेत ह्याशिवाय कांहीं दिसत नसे. कानांनीं गोदावरी व गोपाळराव ह्यांचीं आनंदाचीं बोलणीं, ह्याशिवाय दुसरें कांहीं ऐकू येत नसे, व मनांत गोदावरीच्या बेइमानीपणाचें नीच कृत्य व त्याबद्दल तिला पक्कें शासन करणें ह्याशिवाय कांहीं येत नसे, त्यामुळें त्याचें सर्व लक्ष आपण एकदां वसईस केव्हां जाऊन पोहोंचूं ह्या गोष्टीकडे लागलें होतें. तो एकटाच वाट चालत असता, तर रोज वीस वीस कोशांची मजल करता. परंतु पुराणिकास आश्विन शुद्ध अष्टमीचे दिवशीं मुक्कामास जाऊन पोहोंचावयाचें होतें, त्याकरितां तो त्या बेतानेंच रोज चालत असे व पुढें आतां मी थकलों असें सांगत असे; त्यामुळें नारायणरावासही त्याच्याबरोबर रहावें लागे. ह्याप्रमाणें चालत असतां, अष्टमीच्या दिवशीं संध्याकाळचे चार वाजण्याच्या सुमारास, ते वसईजवळ अर्ध्या कोसावर एक खेडें आहे तेथें येऊन पोहोंचले.

पुराणीक—नारायणराव, तुह्मीं आतां येथेंच थांबा, तुह्मी गांवांत आलां तर तो गोपाळराव कदाचित् तुह्माला पाहील. आणि ती त्याची प्रियकरणी तुमच्या स्नेह्याची बायको आहे, हें जर कदाचित् त्याला ठाऊक असलें, तर तुह्मी आज तिच्या घरीं वस्तीला जाल असें समजून, तो

तिजकडे जाणार असला, तर जाणार नाहीं. याकरितां तुह्मी येथेंच एखाद्या मराठ्याच्या घरीं उतरा. मी असाच गोपाळरावाकडे जातों. त्यानें मला परत कां आलां ह्मणून विचारिलें तर कांहीं कामानिमित्त मुंबईस जावयाचें आहे ह्मणून आलों असें सांगेन. नंतर युक्तीच्या वाटेनें ती आज त्याच्या बंगल्यावर यावयाची आहे, किंवा तो तिच्या घरीं जावयाचा आहे ह्या गोष्टीचा शोध करून, तो तिकडे जाण्यास निघाला कीं, तावडतोब मी इकडे येऊन तुह्मास नेमलेल्या ठिकाणीं घेऊन जाईन. हें पुराणिकाचें बोलणें नारायणरावास सयुक्तिक वाटलें व त्यानें तें कबूल केलें. तेव्हां पुराणीक नारायणरावास तेथेंच ठेवून आपण तसाच निघाला तो गोपाळरावाकडे गेला. तेथें गोपाळराव व रामभाऊ हे ह्याच्याविषयींच गोष्टी सांगत बसले होते. पुराणीक तेथें गेल्यावर नमस्कार चमत्कार या बसा झाल्यावर.

गोपाळराव—पुराणिकबोवा, तुह्मीं तर आपली कामागिरी खूबच छानदार बजाविली. आतां पुढचा परिणाम एकदां सुयंत्र झाला ह्मणजे झालें. त्याच्या मनांत तिला घरांतून हांकून द्यावी असेंच आहेना ?

पुराणीक—हो हो तसेंच आहे. नाहींतर घालवून देण्यापेक्षां तो अधिक तें काय करणार ? कदाचित् तिला घालवून देण्याच्या पूर्वीं थोडी बहुत मारझोड करील, इतकेंच.

रामभाऊ—पण पुराणिकबोवा, आतां त्याची तिची भेट झाली, त्यानें तिला पाहिलें, व ती त्याच्याशीं गोड गोड शब्द बोलूं लागली, ह्मणजे त्याचा तिजवरचा संशय नाहींसा होऊन त्याचा राग जाईल, असें तर नाहींना होणार ? त्याच्या मनांत तिच्या जारकर्माविषयीं पक्कें ठसवून दिलें आहेना ?

पुराणिक—भाऊसाहेब, अनुभवांतीं खात्री होईल. ए-

क वेळ पूर्वेचा सूर्य पश्चिमेस उगवेल, पण त्याचें मन ह्मणून तिजविषयीं आतां निर्मळ व्हावयाचेंच नाहीं. आणखी कांहीं कसर राहिली असली, तर आज प्रत्यक्ष अनुभव दाखवावयाचा आहेच. त्यावरून अगदीं पक्केंच काम होईल. पण आज रात्रीची काय तजवीज केली आहे ? ती प्रत्यक्ष तर नाहींना त्याच्या दृष्टीस पडावयाची ? कारण तसें करितांच येणार नाहीं. तर तिचा ह्मणजे तिच्या स्वरासारखा स्वर त्याच्या कांनीं पाडावयाचा. त्याविषयीं काय तजवीज केली आहे ?

**रामभाऊ**—येथें एक सुंदरी ह्मणून एक नवी रंडी आली आहे. तिचा स्वर अगदीं **गोदावरीच्या** स्वरासारखाच हुबेहुब आहे. तिजकडे आमचें जाणें येणें आहेच. तिला आज **गोपाळरावांच्या** बागेंतील बंगल्यांत आणावयाची; ती व **गोपाळरावजी** अशीं दोघें मधल्या दिवाणखान्यांत माडीवर बसून जें ऐकिलें असतां **नारायणरावाच्या** मनांत ही **गोदावरीच** आहे असें पक्कें बिंबेल, असें त्या दोघांनीं संभाषण चालवावयाचें. तें तुह्मीं त्याला मागच्या जिन्यावर तोंडीं उभा करून त्याजकडून ऐकवावें, ह्मणजे काम झालें. आणखी आज बायकांचा महालक्ष्मी—पूजनाचा दिवस असल्यामुळें, जरी तो **गोदावरीस** घरीं पहावयास गेला, तरी ती तेथें असणार नाहींच. कारण आज तिच्या ओळखीच्या अशा एका बाईकडे मुद्दाम महालक्ष्मी करवून तेथें तिला बोलाविलें आहे, व तिनें तेथून बारा वाजेतपर्यंत घरीं परत जाऊं नये अशी तजवीज त्या बाईस करण्यास सांगितली आहे. कदाचित् ती त्या बाईकडे न गेली तरी आज **नारायणरावाचा** स्नेही एक वकील आहे, त्याच्या घरीं महालक्ष्मी आहे. तेथें तरी ती गेल्याशिवाय राहणार नाहींच; व तेथें ती बारा वाजतपर्यंत राहीलच. मिळून कोणीकडून

तरी आपल्या कार्यसाधनाला कांहीं हरकत येणार नाहीं. कां कशी मसलत आहे ?

**पुराणिक**—विचारावें काय ? बिनतोड युक्ति! आपणावर कांहीं कोणाची कडी चालावयाची नाहीं ! हीं कंबाटें जुळविण्याच्या कामांतील आपण आचार्य आहां असें ह्मटलें पाहिजे ! !

**गोपाळराव**—आजच्या रात्रीं काय तो माझ्या आशेचा सोक्ष मोक्ष व्हावयाचा आहे ! ज्याप्रमाणें त्या नाऱ्याचें मन वळेल, त्याप्रमाणें होईल. काय होईल तें कांहीं समजत नाहीं, त्यामुळें माझें चित्त देखील आज ठिकाणीं नाहीं.

**रामभाऊ**—पुराणिकबोवा, हें पहा काय वेड आहे तें ! अहो काम किती बेतावर आलें आहे ! लग्नाच्या घटका देखील भरत घातल्या आहेत ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं, आणि अशा वेळेस रावसाहेब ह्मणतात, माझें चित्त ठिकाणीं नाहीं ! हें काय भलतेंच बोलणें ! मंगलकार्याच्या वेळेस हें बोलणें शोभत नाहीं. रावसाहेब, उठा आतां फराळ करा. आजच्या रात्रीं कल्पित गोदावरीचें समागम-सुख घ्या, आणि उद्यां रात्रीस खऱ्या गोदावरीचें समागम-सुख! आज ह्या वेळेस हातपाय मोडल्यासारखें करित आहां आणि उद्यां गोदावरी हस्तगत झाली ह्मणजे, संध्याकाळ केव्हां होईल, रात्र केव्हां होईल, आमच्यासारखे स्नेही गप्पा सांगत बसले असतील ते केव्हां उठून जातील असें होईल ! कां पुराणिकबोवा, मी ह्मणतों हें खरें कीं नाहीं ?

**पुराणिक**— ( किंचित् हांसून ) रावसाहेबांना काय वाटत असेल तें खरें !

**रामभाऊ**—पुराणिकबोवा, तुह्मीही आज दमून आलां आहां, तर लवकर पाय धुऊन, संध्या करून फराळ करा, आणि त्या नारायणरावास बंगल्यांत घेऊन येण्याकरितां जा.

मागच्या जिन्यानें वर आणावयाचा बरें कां ? इतक्यांत मी-ही जाऊन त्या कल्पित गोदावरीस तेथें घेऊन येतों.

पुराणिक—बरें आहे, पण भाऊसाहेब दोन आण्याचें कांहीं फराळाचें आणावयाचें होतें. त्या नारायणरावास आज जेवण मिळावयाचें नाहीं; व त्याचें मन त्रस्त झालेलें असल्यामुळें तो खाणारही नाहीं. ह्याकरितां त्याला आग्रह करून कांहीं खावविलें पाहिजे, ह्मणजे त्याला त्या तुमच्या बंगल्याजवळ येण्यास जरा हुशारी येईल. कसा झाला तरी आमचा स्नेही आहे तो !

रामभाऊ—तें खरें आहे ! तुमचा त्यांचा मासलेवाईक स्नेह ह्मणावयाचा ! हे घ्या चार आणे, आणि त्याकडे जातांना वाटेवर घ्या ह्यांची बरफी, आणि द्या त्याला, आणि ह्मणावें गोपाळराव आणि गोदावरी ह्यांचें उद्यां गंधर्व लग्न व्हावयाचें आहे, त्याचा हा साखरपुडा आहे !

असें बोलणें झाल्यावर पुराणिक व गोपाळराव हे फराळ करण्यास गेले, व रामभाऊ त्या वेश्येस आणावयास गेला. ह्यांचा फराळ होत आहे इतक्यांत रामभाऊ त्या वेश्येस घेऊन आला. नंतर तोही फराळ करून तयार झाला. नंतर तो, ती वेश्या व गोपाळराव हीं तिघें बागेंत जाण्यास निघालीं, व पुराणिक नारायणरावाकडे जाण्यास निघाला. रामभाऊ वगैरे त्रिकूट बागेंत जाऊन पोहोंचलें, व ठरल्याप्रमाणें दिवाणखान्यांत जाऊन बसलें. रामभाऊ खिडकीजवळ उभा राहिला. अशाकरतां कीं, नारायणराव व पुराणीक आलेले आपणास दिसावे ह्मणजे ते जिन्यावर येऊन पोहोंचले, ह्मणजे गोपाळराव व ती वेश्या यांस बोलणें सुरू करतां यावें.

इकडे नारायणराव एका मराठ्याच्या घरीं उतरला होता. त्यानें रात्रीस आपणास गांवांत जावें लागेल ह्याकरि-

तां, त्याला कांहीं पैसे देऊन आपलें बोचकें वगैरे ठेवण्यास त्याच्या ओसरीवरची एक खोली मागून घेतली. त्या खोलींत तो क्रुद्ध, सचिंत व दुःखित अशा अंतःकरणानें पुराणिकाची वाट पाहत बसला होता. इतक्यांत मागें सांगितल्याप्रमाणें पुराणिकबोवा कांहीं फराळाचें घेऊन आले.

**पुराणिक**—नारायणराव, तुह्मीं दोन प्रहरपासून कांहीं खाल्लें नाहीं, व चालण्याचे श्रमही झाले आहेत, ह्याकरितां हें आणिलें आहे, हें खाऊन जरासें पाणी प्या. ह्मणजे तुह्माला जरा हुशारी येईल. मग तिकडे जाऊं. मीं मुद्दाम हें तुह्माकरितां आणिलें आहे. तुह्मी उपाशीं असतां मी जेवावयास बसलों, तर मला जेवण देखील गोड लागत नाहीं.

**नारायणराव**—मला भूक नाहीं आणि मला खावेंसें वाटतही नाहीं. आतां तिकडे चला. कोठें जावयाचें ? तिच्या घरीं कीं गोपाळरावाच्या बंगल्यांत ?

**पुराणिक**—आज ती गोपाळरावाच्या बंगल्यांत येणार आहे. तिकडे आपणास जावयाचें. पण अगोदर तुह्मीं कांहीं खाल्लें पाहिजे. नाहींतर तुमचा जीव अगदीं गलबलून जाईल.

**नारायणरावाचे** मनांत खावयाचें नव्हतें, पण पुराणिकाच्या अत्याग्रहास्तव त्याणें थोडकेंसें खाल्लें, आणि पाणी प्याला. आणि ह्मणालाः—चला आतां, ती इतक्यांत आली असेल. आतां काय दृष्टीस पडतें तें पहावें.

**पुराणिक**—दृष्टीस काय पडावयाचें तें दिसतच आहे. पण तिला आणि गोपाळरावाला एकांतीं गोष्टी सांगतांना पाहून तुह्माला राग येऊन तेथें कांहीं दंगा नाहींना करणार ? नाहींतर मग माझ्या फजितीला पार नाहींसा होईल ! असें नकाहो कांहीं करूं ! आपलें मन कसेंही खवळलें तरी तें आवरून धरा.

**नारायणराव**—तेथें दंगा करण्याला मला कां वेड लागलें आहे ? मला आधीं अनावर असा राग येणारच नाहीं आणि आला तरी मी तो शिकस्त करून आवरून धरीन. त्याविषयीं तुह्माला काळजी नको. चला आतां.

ते दोघेजण निघाले, ते कांहीं वेळानें **गोपाळरावाच्या** बंगल्यांत येऊन पोहोंचले. त्यांना **रामभाऊनें** खिडकींतून पाहिलें आणि त्यानें **गोपाळरावास** बोलणें सुरू करण्याविषयीं सूचना केली. इकडे पुराणिकानें **नारायणरावास** मागल्या जिन्यानें वर नेले आणि दारांत उभे राहण्यास सांगितलें. आंत **गोपाळराव** व ती वेश्या ह्यांचें बोलणें सुरू झालें.

**पुराणिक**–(बाहेर **नारायणरावास**) रोज तीं जेव्हां तेथें असतात तेव्हां बहुतकरून ह्या दरवाज्याच्या आंतील खोलींत असतात, व पूर्वी तीं ह्याच खोलींत निजत असत, पण आज खोलीच्या पलीकडील दिवाणखान्यांत आहेत. त्यामुळें त्यांचीं तोंडें दिसणार नाहींतच, पण तीं आनंदांत येऊन गोष्टी सांगत आहेत, त्या ऐकूं येतील. नीट दाराच्या फटीला कान लावून ऐका. खोलींतून दिवाणखान्यांत जाण्याचा दरवाजा उघडाच आहे. तेव्हां त्यांचें बोलणें ऐकूं येण्यास कांहीं हरकत नाहीं. त्या बोलण्यावरूनही आपली खात्री होईलच.

**नारायणराव**—-बरें ह्मणून दाराच्या फटीला कान लावून आंतील बोलणें लक्षपूर्वक ऐकूं लागला.

**गोपाळराव**—( आंत ) सरकार, हा आज रुसवा चालावयाचा तरी किती वेळ ? मघांपासून तुह्मी उभे राहिल्यामुळें आमचे पाय दुखतात ! !

**वेश्या**—दुखूं देत ! माझे पाय दुखले तर दुखतील ! आपले नाहींना दुखत ?

**गोपाळराव**–हें काय बरें असें ? आपल्या रुसण्याचें

कारण तर सांगाल कीं नाहीं. सांगून जर मजकडून आपली कामगिरी झाली नाहीं, तर मग मला लबाड ह्मणा ! पण मला समजल्याशिवाय मीं तरी काय बरें करावें ?

**वेश्या**—त्या दिवसापासून आजपर्यंत आज शालजोडी आणतों, आज खण आणतों, आज लुगडें आणतों, असें चालविलें आहे ! पन्नास वायदे झाले असतील ! गांठ पडली ह्मणजे वायदा करावयाचा ! आतां मी कांहीं वायदा ऐकावयाची नाहीं साफ ! तीं चिरगुटें आणा तेव्हां माझ्या अंगाला हात लावा !

**गोपाळराव**—इतकेंच ना ? उद्यां दोन प्रहरच्या आंत तुझ्या गळ्याची शपथ ह्या तीनही वस्तू आणून देतों. उद्यां तुला त्या वस्तू पोहोंचल्याशिवाय अन्नाला शिवेल त्याला शपथ ! हें घे वचन.

**वेश्या**—वचन कशाला पाहिजे ? मला आपला इतका विश्वास आहे. पण ह्मटलें जर कोणी घरीं आलें आणि शालजोडी कोठें आहे ह्मणून विचारलें तर काय सांगूं ? त्या पुराणिकाला दिली ह्मणून का सांगूं ? आणि आणणार तीं तरी नवींच चिरगुटें आणणार तेव्हां घरीं यावयाचें होईपर्यंत तीं जरा मळून जुनीशीं दिसलीं पाहिजेतना ? ह्मणून मी घाई करितें.

**गोपाळराव**—आतां झालेना पण ? मग आतां लांब लांब कां ? त्या खुर्चीवर नलगे बसावयास. ह्या ठिकाणीं दोन खुर्च्या ठेवून उपयोगीं नाहीं. एकच जराशी मोठी खुर्ची ठेविली ह्मणजे बरें होईल. ये आतां ! आतां मांडीवर बसल्यावर कसा बरें आपला जोडा ठीक दिसतो ? तुझा माझा जोडा ब्रह्मदेवानें नेमिलाच होता. परंतु मध्यें त्या नाऱ्यानें अडथळा आणून कांहीं दिवस जरासा बिघड केला.

**वेश्या**—तें आतां वारंवार काढून मला दुःख देऊं न-

का. त्या वेळेस माझ्या हातून गोष्ट गेली खरी, पण आतां काय त्याचें ?

**गोपाळराव**—सखे, आतां ज्यापेक्षां तूं कृपा करून कोणत्या तरी रीतीनें माझे हेतु पूर्ण केलेस, त्यापेक्षां आतां त्याविषयीं मला कांहीं वाटत नाहीं. तूं लोभांत मात्र अंतर पाडूं नको, असा सतत चालव ह्मणजे झालें.

**वेश्या**—लोभांत अंतर करण्यासाठीं का मी आपलें तनमन आपणास अर्पण केलें आहे तें ? मी अशी चारगटांतील बायको नव्हे. आपलें मन मात्र मजपेक्षां कोणी बरीशी मिळाली ह्मणजे तिजकडे लागून इकडून उडूं नये. बाकी मजकडून तर प्राण गेला तरी अंतर पडणार नाहीं ! मात्र कांहीं दिवस दुर्दैवानें घरीं यायचें झालें तर काय ती पंचाईत ! त्याविषयीं बंदोबस्त झाला पाहिजे !

**गोपाळराव**—तो सगळा बंदोबस्त मीं करून ठेविला आहे. त्याला इकडे येण्याला रजाच कशाला मिळते आहे? तो इकडे येऊन आपल्या नित्य क्रमांत अडथळा येण्याची भीति नको ! आतां तुजपेक्षां दुसरी कोणी बरीशी मला मिळून माझें मन तुजवरून उडेल असें ह्मणतेस, पण आधीं तुजपेक्षां सुंदर अशी स्त्रीच मिळणें कठिण ! आणि मिळेल असें म्हटलें तरी अतःपर तुजवांचून इतर स्त्रीकडे नुस्तें पहावयाचें सुद्धां नाहीं, असा मीं निश्चय केला आहे. पाहिजे तर ह्याविषयीं शपथ वाहण्यालाही मी तयार आहें. ( थोडा वेळ थांबून ) आतां नुकते घड्याळांत साडे नऊ वाजले आहेत. आज तूं फार लवकर आलीस. तूं आलीस तेव्हां साडे आठांचा सुमार झाला होता. आज लवकर कसें यावयास मिळालें? आज तें सासूचें मढें कोठें गेलें आहे वाटतें !

**वेश्या**—गेलें आहे कोठें ? आहे घरांतच ! पण आज गांवांत महालक्ष्मी आहेतना? त्या निमित्तानें मीं आज जेव-

णखाण लवकरच आटपलें. इकडे यावयाचें असलें ह्मणजे जेवण देखील सुचत नाहीं. एकदां केव्हां जाईनसें होतें. आणि इकडे यावयाचें ह्मणजे पोटभर जेवूनही उपयोग नाहीं. कारण येथें मिठाई किंवा फळफळावळ कांहीं तरी खावयाचें असतेंच. मी खात नाहीं, माझें पोट भरलें आहे म्हटलें, तर आपण कांहीं ऐकत नाहीं. ह्मणून थोडकेंच जेवून इकडे यावें लागतें ! आज लवकरच सारी आटपाआटप करून, त्यांना सांगितलें कीं, मला आज एका बाईनें हळदी कुंकू द्यावयास लवकरच बोलाविलें आहे असें सांगून निसटलें. ह्यामुळें आज लवकर आलें.

**गोपाळराव**—पण आज उजाडेपर्यंत रहावयाचें ना? कीं, बारा वाजतां पोंचविलें पाहिजे ?

**वेश्या**—साडे तीन चार वाजतां परत पोंचवावी ह्मणजे झालें. पण आतां गोष्टीच सांगत कां बसावयाचें? विडा नाहीं कां घ्यावयाचा?

**गोपाळराव**—अहा ! नाहीं कोणी म्हटलें लाडके? चला, आतां पलंगावर जाऊं.

हें बोलणें आंत चाललें असतां, नारायणराव दाराबाहेरून ऐकत होता. त्याला आंतील बोलणें बरेंच स्पष्टपणें ऐकू आलें, परंतु गोपाळराव किंवा ती वेश्या ह्यांतून कोणीच त्याच्या दृष्टीस पडलें नाहीं.

गोपाळरावानें आपण त्याच्या दृष्टीस न पडतां आपलें बोलणें मात्र त्याला ऐकू यावें अशीच बसण्याची वगैरे तजवीज केली होती. आधीं नारायणरावाच्या मनांत गोदावरीच्या दुष्ट कृत्यांविषयीं पक्का संशय होताच, त्यामुळें तिजविषयीं त्याचें मन अतिशय दूषित झालेलें होतें आणि त्यांत गोपाळरावानें जी वेश्या बोलण्यास आणिली होती तिचा स्वरही गोदावरीच्या स्वरा सारखाच होता, आणि

तिचे शब्द तरी ह्याला अगदीं स्पष्टपणें ऐकूं आले नव्हते-च, व जे शब्द ऐकूं आले तेही तिनें जसे त्या प्रसंगीं बोलावे तसेच होते. त्यामुळें आंत गोपाळरावाजवळ बोलत असलेली स्त्री गोदावरी नसावी असें त्याच्या मनांत स्वप्नांतही आलें नाहीं. गोदावरी खचीत जारिणी आहे व ती गोपाळरावाशीं जारकर्म करिते याविषयीं त्याची अगदीं बालंबाल खातरी झाली, व त्याचें मन दुःख व क्रोध ह्यांनीं व्याप्त झालें असल्यामुळें, तो वेड्यासारखा तेथेंच उभा राहिला

**पुराणीक**—चला, नारायणराव, तीं आतां निजावयास गेलीं. आतां आपण येथें उभें राहून काय उपयोग ? कदाचित कोणी दार उघडून पाहिलें तर पंचाईत पडेल. आतां कांहीं संशय नाहींना राहिला ?

**नारायणराव**—कांहीं संशय राहिला नाहीं. आतां तुह्मीं गांवांत जावें मी त्या मराठ्याच्या घरीं निजावयास जातों.

**पुराणीक**—आतां पुढें तिची तजवीज काय करणार ?

**नारायणराव**—मी काय करणार ? तिचा नवरा काय तें करील.

**पुराणीक**—पण तिच्या दुष्कृत्याविषयीं तुह्मीच त्याला सांगणार कीं नाहीं ? तेव्हां तो तरी तिचें जें कांहीं करणें तें तुमच्याच विचारानें करील. तेव्हां तुह्मी त्याजकडून काय करवणार ?

**नारायणराव**—तिच्या अपराधाला योग्य असें शासन करवावयाचें.

**पुराणीक**—ह्मणजे काय करावयाचें ? तिचा जीव घ्यावयाचा, कीं तिला हांकून द्यावयाची ?

**नारायणराव**—तुमच्या मतें तिचें काय करावें ?

**पुराणिक**—ह्या कामांत माझा विचार काय उपयोगी!

तुमच्या मित्राची व तिची तुह्माला चांगली माहिती, तेव्हां त्याचा स्वभाव जसा असेल व त्याला तुह्मी जसें मत द्याल, तसें तो करील. कदाचित् तिचें हें कर्म तुह्मीं त्याला सांगितलें, तरीही तो तिला कांहींच बोलणार नाहीं. डोळ्यांवर कातडें ओढून स्वस्थ बसेल. असें बायकांच्या दुष्कृत्यावर पांघरूण घालून स्वस्थ बसणारेही शेंकडों लोक आहेत. बाकी माझें मत जर विचाराल, तर तिचा प्राण घेण्याचा विचार करणें हें फार वाईट ? कारण एक तर स्त्रीहत्येचें पाप ब्रह्महत्येच्या पापापेक्षांही अधिक ! आणि दुसरें तिचा खून केला तर तो छपणेंही कठीणच, तो कसानाकसा तरी उघाडीस येईल. आणि तसें झालें ह्मणजे तुमच्या स्नेह्याच्या जीवासही धोका येण्याचा संभव आहे. ह्याकरितां त्या जारिणीचा सर्वथैव त्याग करावा हेंच योग्य.

नारायणराव--तुमचें बोलणें ठीक आहे. मी त्याचा विचार करीन. आतां दया लोभ ठेवा. तुमची माझी सहज ओळख झाली, व तुह्मीं माझ्या मनाचा हेका पूर्ण करण्याकरितां फार तसदी घेतलीत. त्याबद्दल मी तुमचे फार फार आभार मानितों. आतां हे घ्या ( असें ह्मणून १५ रुपये त्याचे हातांत देतो. )

पुराणिक--छेः छेः हें काय भलतेंच ! मित्राच्या कामासाठीं ह्मटलें, तर त्यांत तसदी ती कसली ? मित्रांनीं एकमेकांच्या कामास झटावें हा त्यांचा धर्मच आहे. तेव्हां मीं ह्यांत अधिक तें काय केलें ? हे घ्या आपले.

नारायणराव--राहूंद्या हो. मीं तुह्माला पानसुपारी दिली असें समजा. ती तुह्मीं स्वीकारावी अशी माझी फार इच्छा आहे. न घ्याल तर मला फार वाईट वाटेल ! आतां यावें. तुमची आमची पुन्हां भेट होणें कठीणच ! कारण तुह्मीं कोणीकडे फिरणार ! मी कोठें असणार !

पुराणिक--दोघांनाही परमेश्वरानें कांहीं दिवस वांचविलें तर होईल कधीं तरी भेट. येतों तर आतां. नमस्कार.

ते एकमेकांची रजा घेऊन दोघे दोहोंकडे गेले. पुराणिक नारायणरावास वाटेस लावून, परत आला, तो गोपाळरावाच्या बंगल्यांत आला, व तेथें त्यांना झालेली सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून रामभाऊ व गोपाळराव यांस फार आनंद झाला, व त्यांनीं आतां गोदावरीस नारायणरावानें टाकून दिल्यावर, व गोपाळरावानें तिला घरांत घातल्यावर काय काय मजा होईल व काय गम्मत होईल ह्याविषयीं कल्पना करून त्याविषयीं गोष्टी सांगण्यांतच बहुतेक राहिलेली रात्र घालविली. ' उद्यां उजाडल्यापासून संध्याकाळपर्यंत रामभाऊनें नारायणरावाच्या घराचे आसपास असावें, आणि गोदावरीला घराबाहेर काढून दिलें कीं, लागलाच तिला धीर देऊन व फार गोड गोड व समाधानाच्या गोष्टी सांगून व तिला पाहिजे त्या प्रकारचें सुख देण्याविषयीं वचन देऊन, तिला गोपाळरावाच्या याच बंगल्यांत घेऊन यावें असा बेत ठरला.

---

## भाग १०.

इकडे नारायणराव पुराणिकाची रजा घेऊन ज्या मराठ्याच्या घरीं उतरला होता, तेथें निजावयास गेला. ह्या वेळीं त्याच्या मनाची स्थिति कशी होती, ह्याविषयीं कल्पना करण्याचें मार्मिक वाचकांकडेच सोंपवितों. त्याला गोदावरीचा प्राण केव्हां घेईन. असें झालें होतें. ' उद्यां बाजारांत विष विकत घेऊन संध्याकाळीं घरीं जावें. ह्मणजे

तिचा आपला फार वेळ सहवास होणार नाहीं. फार वेळ सहवास झाला, तर कदाचित् तिची दया येऊन आपलें मन केलेल्या बेतापासून परावृत्त होईल. किंवा तिचें स्वरूप बोलणें चालणें ह्याच्या योगानें आपला राग शांत होईल. ह्याकरितां अगदीं संध्याकाळीं घरीं गेलें ह्मणजे तिचा आपला समागमच फार वेळ व्हावयाचा नाहीं. आणखी रात्रींचा विषप्रयोग केला ह्मणजे गाज्यावाज्याही फारसा व्हावयाचा नाहीं. विषप्रयोगाशिवाय दुसरे रीतीनें प्राण घेणेंही जरा कठीणच. एकदां ह्या नट मोगरीचें निर्दलन झालें ह्मणजे आपण सुटलों. एकदां आपण तिचें सौंदर्य, चातुर्य व विद्या यांस भुलून लग्न करून फसलों ! आतां इतःपर कितीही सुंदर, शहाणी व सुशिक्षित स्त्री मिळो लग्न ह्मणून करावयाचें नाहीं. कशीही स्त्री असली तरी तिचें कपाळ हेंच ! आतां आमरणांत वैराग्य धारण करून, तीर्थयात्रादि सत्कृत्यें करण्यांत दिवस घालवायाचे असा त्यानें निश्चय केला. त्या रात्रीं त्याला झोंप कशी ती शिवली देखील नाहीं. सकाळीं उठून स्नान वगैरे केलें. कांहीं खाण्यासही तयार केलें, परंतु त्याच्या घशाखालीं घांसच उतरेना. त्याला संध्याकाळ केव्हां होते, असें होऊन गेलें होतें. संध्याकाळचे पांच वाजले, सहा वाजण्याच्या सुमारास त्यानें घरीं जाण्याची तयारी केली. बोज्या घेण्याकरितां एक गडी बरोबर घेतला. दिवे लागतां लागतां गांवांत गेला. बाजारांतून जातांना एका गांधीच्या दुकानावर विष विकत घेतलें; व हळू हळूं दिवे लागल्यावर अर्ध्याघटकेनें घरीं पोंहचला. दरवाजा उघडण्यास गोदावरीच बाहेर आली. दोन अडीच महिन्यांत नारायणरावाचें पत्र नाहीं, व हल्लीं तो घरीं येण्याचा संभव नसतां एकाएकीं तो आला, हें पाहून ती विस्मित झाली. परंतु आपणास

जशी त्याला भेटण्याविषयीं उत्कंठा आहे, तशीच त्याला आपणास भेटण्याविषयीं असल्यामुळें तो मध्येंच घरीं आला असावा असा विचार तिच्या मनांत आला; व त्यामुळें तिला इतका आनंद झाला कीं, तो लिहितां पुरवत नाहीं. त्या आनंदाच्या उकळीबरोबर तिला हर्षवायूच झाला असता, परंतु इतक्यांत नारायणराव आंत येऊन बसल्यावर जेव्हां त्याच्या आंगा तोंडावर दिव्याचा उजेड पडला, आणि तिनें त्याच्या तोंडाकडे पाहिलें, तेव्हां तिच्या मनांतील आनंद अगदीं नाहींसा होऊन तिला फार दुःख झालें.

नारायणरावास पुराणिकाकडून गोदावरीच्या दुराचरणाविषयीं हकीकत समजल्यापासून, त्याला अन्न गोड लागेनासें झालें होतें. रात्रंदिवस त्याच्या मनास एकसारखी तळमळ लागली होती, त्यामुळें तो कृश झाला होता. त्यांत आणखी आज सात आठ दिवस उन्हांतून चालावें लागलें होतें. वेळेवर जेवणही वाटेनें मिळत नसे, व मिळालें तरी ह्याच्यानें बरोबर जेववत नसे. रात्रीं झोंप येत नसे. आणखी गेल्या रात्रीचा प्रकार पाहिल्यापासून तर त्याचें मस्तक अगदीं फिरून गेलें होतें. ह्या सर्व कारणांनीं त्याच्या पहिल्या व हल्लींच्या रूपांत जमीन अस्मानाचा फरक पडला होता. पूर्वीं त्याचा चेहरा मोहरा कसा होता हें सांगण्यांत आलेंच आहे. पूर्वीं त्याचा चेहरा असा होता कीं, त्याजकडे पाहिल्याबरोबर कोणाचेंही मन त्याजकडे लागत असे. परंतु हल्लीं वर सांगितलेल्या कारणांनीं त्याचा रंग फिकट, शरीर कृश झालेलें, डोळे खोल गेलेले, गाल बसलेले, कपाळास आठ्या पडलेल्या, व चेहेऱ्यावर दुःख, क्रोध, त्रास, ह्यांचा पूर्णपणें ठसा उठलेला, असा दिसत होता. त्यामुळें तो एखादा खवीस किंवा ब्रह्मसमंध आहे असा दिसत होता; व त्याची मुद्रा पाहिल्याबरोबर पहाणारास, आनंद होणें तर एकी-

कडेच, पण त्रास व भय हीं वाटत असत. असें तें त्याचें रूप गोदावरीच्या दृष्टीस पडलें तेव्हां तिच्या पोटांत भडभडून आलें व तिला फार दुःख झालें. आतांच जाऊन आपल्या प्रियाच्या गळ्यास लाडिकपणें मिठी मारून, अशी अवस्था कशानें झाली, ह्मणून विचारावें, असें तिच्या मनांत आलें; परंतु तेथें नारायणरावाची आत्या असल्या कारणानें, तिला तसें करितां आलें नाहीं. तिचा कंठ भरून आला; डोळ्यांतून अश्रुधारा चालल्या, आंगास घाम सुटला, शोकानें ओंठ थरथरूं लागले, व पाय कांपूं लागले. त्यामुळें ती उभी होती त्या जाग्यावरून तिला हालवेना. ती तेथेंच बसणार होती, इतक्यांत आत्याबाईनें सांगितलें कीं, त्याला अगोदर कांहीं खावयास दे, त्याला भूक लागली असेल. हें ऐकून ती शुद्धीवर आल्यासारखी होऊन, लागलीच आंत जाऊन ऊन पाणी त्याला पाय धुवावयास दिलें. नारायणराव पाय धुवावयास आला ह्मणजे कांहीं तरी बोलावें, ह्मणून ती तेथेंच उभी राहिली; परंतु तो आलाच नाहीं. तेव्हां ती आंत जाऊन ' पाय धुवावयास पाणी ठेविलें आहे, ' असें ह्मणाली. तेव्हां तो मोठ्या त्रासानें पाय धुवावयास गेला. तेव्हां ती तेथें जाऊन हळूच ह्मणाली—'माझ्या सख्याची अशी कशानें दशा झाली ? सख्या आपली ही दशा पाहून माझे प्राण जाऊं पहात आहेत, गोदावरीच्या ह्या बोलण्यावर नारायणरावानें कांहीं उत्तर दिलें नाहीं. एक लांब श्वास मात्र टाकिला. तेव्हां तिला वाटलें कीं, अजारी असल्यामुळें फार थकून गेले आहेत, ह्मणून बोलले नसतील. असा मनांत विचार करून ती घरांत गेली आणि ताटांत साखरपाऱ्याच्या चार पांच वड्या व एका वाटींत मुरंबा घालून पाट मांडून पुढें तें ताट ठेविलें. तो पाय धुवून आल्यावर गोदावरी ह्मणाली, हें खाल्लें ह्मणजे जरा हुशारी

येईल. नारायणरावानें विचार केला कीं, हिच्याजवळ ए-
व्हांच बिघडून उपयोग नाहीं. कारण आपल्या मनांत ति-
च्या कर्माविषयीं संशय व राग आहे असें तिला दिसलें तर,
आपणास पुढचें कृत्य करण्यास कठीण पडेल. अशा विचा-
रानें व त्याच्या आत्यानेंही आग्रह केल्यावरून त्यानें पुढें
ठेविलेल्यापैकीं कांहीं खाल्लें. त्याची ती दशा पाहून तिला
वेड लागल्यासारखें झालें. परंतु दुसरें घरांत कोणीं जेवण
वगैरे करावयास नाहीं, ह्मणून तिनें मोठ्या कष्टानें सरासरी
एकदां जेवण केलें. तिच्या हांतून काम बरोबर होईना, ती
जेथें तेथें अडे, व जेवणही चांगलें झालें नाहीं. ह्याचें कारण
तिचें मनच अस्वस्थ झालें होतें. पुराणिकानें आपल्याविषयीं
कुकल्पना आपल्या पतीच्या मनांत भरवून दिल्यामुळें त्याचें
मन आपणाविषयीं अतिशय दूषित झालें आहे, हें त्या बि-
चाऱ्या निरपराध गोदावरीच्या गांवींही नसल्यामुळें, तिनें
त्याच्या ठिकाणीं प्रेमाचा फार पसारा दाखवून त्याच्या म-
नांतील अढी दूर करण्याचा प्रयत्न अर्थातच केला नाहीं.
ती खऱ्या व प्रेमळ अंतःकरणास योग्य अशा रीतीनें वागली.
परंतु पुराणिक बोवांच्या विषरूप मंत्रानें त्याचे कान भरलेले
असल्यामुळें—तिच्या सरळ व प्रेमळ मनाच्या योगानें ज्या
गोष्टी झाल्या, व ज्या आनंद दुःख यांच्या अतिशयामुळें
तिच्यानें नीटपणें करवल्या नाहींत.—त्या ह्यानें, तिनें अप्री-
तीमुळें केल्या नाहींत असें मानिलें; व त्याच्या योगानें ति-
ची त्याची दृष्टादृष्ट झाल्यावर जो त्याचा राग वगैरे कमी
व्हावयाचा तो न होतां कांहींसा अधीकच वाढला. तो जे-
वावयास बसला तेव्हां तिनें त्याला भात, भाजी, चटणी, मे-
तकूट, गोड दहीं, लोणचें, पापड, व एके वाटींत मुरंबा व-
गैरे वाढिलें. नारायणरावाच्या मनांत तिचीं पुराणिकानें
सांगितलेलीं दुष्कृत्यें व गेल्या रात्रीं स्वतः ऐकिलेलीं बो-

ळणीं घोळत होतीं. त्यामुळें त्याला तिचे हातचें पाणी दे-
खील घेऊं नये असें वाटत होतें. व ज्या ' मृन्मय पात्राचा
अनेकांनीं उपभोग घेतला, त्याचा नाश करणें अवश्य आ-
हे. ' ह्या न्यायानें हिचा नाश करणें अवश्य होय असा
विचार करून, आतां उशीर लावून उपयोग नाहीं असें
मनांत आणून त्यानें आपल्या कणवठीस ठेविलेली विषाची
पुडी काढून, जेवून उठण्याच्या संधीस, गोदावरी आंचव-
ण्यास जाण्याच्या जागीं दिवा ठेवण्यास गेली अशी संधी
साधून तें मुरंब्याच्या वाटींत कालविलें, आणि ह्मणालाः—
बा विषा, तूं निःपक्षपाती आहेस, कोणावरही दया करीत
नाहींस, तर तुझें सेवन करणाऱ्या जारिणीला त्वरित यमस-
दनास ने. असें ह्मणून उठला, आणि गोदावरीस ह्मणा-
लाः—त्या वाटींत मुरंबा बराच राहिला आहे; माझ्यानें
सगळा खाववला नाहीं; तर तूं तरी तो खा, नाहीं तर फु-
कट जाईल. आंचवणें झाल्यावर तो माडीवर गेला. तेथें तो
एका खिडकीजवळ एका खुर्चीवर बाहेर आकाशाकडे पहा-
त बसला. त्यानें तेथील बिछान्यास किंवा वस्त्रास तीं जार
कर्मानें विटाळलेलीं आहेत. असें समजून स्पर्शही केला नाहीं.

इकडे खालीं गोदावरी जेवावयास बसली तिनें नवऱ्याची
ती अवस्था पाहिल्यापासून तिला खाणें पिणें सुचत नव्हतें;
व ती खाणारही नव्हती. पण फार दिवसांत नवऱ्याचें उष्टें
खाण्यास मिळालें नाहीं, व त्यानें पानावर बहुतेक जेवण टा-
किलेंच होतें तें आपण खावें ह्मणून जेवावयास बसली, आ-
णि सरासरी जेवल्यासें केलें. तिच्या गळ्याखालीं घांसच उ-
तरेना. नवऱ्यानें सांगितलें होतें ह्मणून तो मुरंबा मात्र अगदीं
चाटून पुसून खाल्ला. आणि पानावरून उठली. खरकटीं व-
गैरे तशींच एकीकडे ठेवून उष्टें काढून खालचीं दारें वगैरे
जलदीनें बंद करून, पाण्याचा तांब्या भरून घेऊन मोठ्या

उत्कंठेनें माडीवर गेली, तों मागें सांगितल्याप्रमाणें नारायणराव बसलेला तिच्या दृष्टीस पडला. तेव्हां हिनें हातांतील तांब्या खालीं ठेवून खोलीच्या दरवाज्याला आंतून कडी लावून, मोठ्या प्रेमानें आपल्या प्रिय पतीच्या गळ्यास मिठी मारिली; आणि त्याचें चुंबन केलें; परंतु तिचा गळा भरून आल्यामुळें तिच्यानें कांहीं बोलवलें नाहीं. ती तशीच मिठी मारून राहिली.

नारायणरावाच्या मनांत तिला स्पर्श देखील करावयाचा नव्हता, परंतु ती हुशारीनें वर आली, त्यामुळें तें विष हिला लागू पडलें नाहीं असें त्याला वाटलें. तेव्हां त्यानें असा विचार केला कीं, आज हें विष लागू पडलें नाहीं तर उद्यां दुसरें आणून घातलें पाहिजे. तेव्हां आज आपण हिजवर राग दाखवितां उपयोगी नाहीं. कारण तसें केलें तर उद्यांची मसलत साधणार नाहीं. असा विचार करून, तिनें त्याच्या गळ्यास मिठी मारून त्याचें चुंबन केलें, तरी त्यानें तिला प्रतिबंध केला नाहीं. पण आपण ह्मणून तिच्या आंगाला हात लाविला नाहीं.

वर सांगितल्याप्रमाणें गोदावरीनें नारायणरावाच्या गळ्यास मिठी मारिली असतां, जरी त्याच्या मनांतील तिच्यावरील प्रेम अगदीं नाहींसें झालें होतें, ती त्याला विषवल्लीसारखी वाटत होती, ती केव्हां मरेल ह्याची तो वाट पहात होता व त्यानें तिला विषही चारिलें होतें, तरी त्याला तिचा नाजूक, स्निग्ध, लुसलुशित, व मृदु, असा आंगास स्पर्श झाल्यावर थोड्या वेळानें त्याच्या मनाला किंचित् द्रव आल्याशिवाय राहिला नाहीं. तो तिजकडे पाहूं लागला. तेव्हां तें तिचें आरशासारखें स्वच्छ कपाळ, काळ्याभोर व कमानदार भिवया, व ज्यांवर वियोगामुळें पांडुरकी आलेली, परंतु शोकामुळें आरक्तता आली आहे व ज्यांवर

शोकानें घर्मबिंदु आले आहेत असे नाजूक गाल, शोकभरानें लाल झालेले कान, पिकलेल्या तोंडल्यासारखे ओंठ, व ज्या हातांनीं त्याला मिठी मारिली होती ते गोंडस, नाजूक, व लिबासारखें ज्यांचें गोरेपण आहे असे व एकंदर तिचें रमणीय रूप पाहून व ती आपल्या हृदयावर पडलेली हें मनांत आणून व जिजवर आपण कांहीं दिवसांपूर्वीं प्राणाप्रमाणें प्रीति करीत होतों, हेंही मनांत येऊन जेव्हां आपण आतां तिचा नाश करण्याचा प्रयत्न, तिच्याच दुष्कृत्यांवरून केला आहे हें मनांत आलें तेव्हां त्याच्या डोळ्यांतून खळखळां अश्रु वाहूं लागले. आणि ह्मणाला शिव शिव शिव ! ! ब्रह्मदेवानें असें हें हिचें रम्य स्वरूप निर्माण करून त्या ठिकाणीं असे घाणेरडे दुर्गुण ठेविले, ही केवळ त्याची मोठी चूक आहे ! ! असें ह्मणन त्यानें एक दीर्घ श्वास मोडला.

वर सांगितल्या स्थितींत गोदावरी उभी असतां, तिजवर विषाचा अंमल बसत चालला. तिचें मस्तक जड झालें, तोंडास व जिभेस चुरचूर सुटली, गळा कोरडा पडत चालला, जीभ आंत ओढूं लागली, व एकंदर जिवास अस्वस्थता वाटून तो गलबलूं लागला. तेव्हां ती ह्मणाली:--'सख्या माझें डोकें फिरतें, जीभ आंत ओढते, माझ्यानें उभें राहवत नाहीं!

हें तिचें बोलणें ऐकून नारायणरावास वाटलें कीं, आतां विषाचा अंमल लागू झाला. आतां ही कांहीं खास जगत नाहीं, असें समजून तो ह्मणाला:—

**नारायणराव**—रात्रीच्या जागरणानें तसें होत असेल. उभें राहवत नसेल, तर पड त्या बिछान्यावर !

**गोदावरी**—हें काय सख्या, माझ्यानें तेथपर्यंत जाववत नाहीं. मला बिछान्यावर ठेवावें. माझा आज राग का आला आहे ? छत् ! पण असें कधीं व्हायचें नाहीं. माझ्या

लाडक्याला मजविषयीं राग कसा तो ठाऊक देखील नाहीं. सख्या, ठेवावें मला बिछान्यावर ! !

**नारायणराव**—तूंच जाईनास ? नाहींतर बिछान्यावर नेण्याला, आपल्या सख्याला, **गोपाळरावाला** हाक मार ! तो तुझा सखा, मी कसचा कोठचा कोण ! !

**गोदावरी**—हें काय भलतेंच ! त्या मेल्याचें तळपट होवो, आणि त्याच्या नांवाला किडे पडोत ! मीं मेल्याला आज चार महिन्यांत स्वप्नांत देखील पाहिलें नाहीं. आय आई ! सख्या पोटांत पिळवटतें! जीव घाबरा होतो. सख्या मला धरा. मला हें असें काय होतें ? अग आई ! देवा ! !

**नारायणराव**—अगे दुष्टे, जारिणी, बाजारबसवे, त्या **गोपाळरावाला** आतां शिव्या देतेस! आणि काल रात्रीं त्याच्या बंगल्यांत बरी गेली होतीस त्याच्याशीं क्रीडा करावयास ! त्याच्या जवळ गोड गोड गोष्टी सांगत होतीस, आणि तो जेव्हां ह्मणाला कीं, ‘ तूं मात्र आतां मला कधींही अंतर देऊं नको. ’ तेव्हां तूं ह्मणालीस, ‘ दुर्दैवानें घरीं येणें झालें तर मात्र पंचाईत नाहींतर आपण ह्मणाल तेव्हां मी आपणाजवळच आहें; असें नाहीं ह्मटलेंस ! ह्मटलेंस नाहीं ? ( तिला तशीच बिछान्यावर ठेवितो. )

**गोदावरी**—हाय हाय ! प्राणसख्या ? माझ्या लाडक्या ! माझ्या जिवा ! मला प्राण जाण्यासारख्या वेदना होत आहेत ! आज हें एकाएकी कशानें तें समजत नाहीं! मी कांहीं जगत नाहीं खास ! तरी सख्या असलें भलतेंच आळ मजवर नकाहो घालूं ! त्या **गोपाळरावाचें** नांव घेतलें तरी देखील मला पाप लागेल असें मी समजतें; आणि आपण ह्मणतां तसें कसें होईल ! काल रात्रीं मी वकील भावोजींकडे महालक्ष्मी होती, तेथें त्यांच्या व त्यांच्या बायकोच्या अति आग्रहावरून गेलें होतें. ती देखील दहा वाज-

तां परत घरीं आलें, त्यांचा गडीच कंदील घेऊन पोहोंचवावयास आला होता. सख्या! माझ्याविषयीं आपले मनांत असे भलतेच तर्क कसे येतात? जिवलगा! माझ्या अंगावर हात तरी ठेवाहो! देवा! आज इतके दिवस वियोगानें दुःखित असतां आज भेट झाली, आणि त्याच वेळेस माझे प्राण जाण्याची वेळ आली! आणि त्याच वेळेस माझ्या सख्याच्या मनांत मजविषयीं भलताच संशय कसा आला? आय आई! गळा सोखला! पाणी! सख्या पाई!! ( मूर्छित पडते. )

ती मूर्छित पडली असें पाहून नारायणराव तिच्या जवळ गेला; व ती जिवंत आहे असें दिसल्यावरून तिच्या तोंडांत त्यानें पाणी घातलें व तिच्या डोक्यावर शिंपडून डोळ्यांस लाविलें, व तिला वारा घालूं लागला. त्यावेळेस जरी तो पाषाणहृदय बनलेला होता, तरी तिची ती अवस्था पाहून त्याच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. इतक्यांत गोदावरी किंचित् सावध झाली, व तिनें आडव्यानेंच त्याला मिठीं मारिली व मोठ्या कष्टानें ह्मणाली:—" सख्या, मी आतां लवकरच मरणार! पण तुमच्या हातांत मरतें आहें, एवढ्यानें मला फार आनंद होतो. ह्याच्या पूर्वींच मरतें तर भेटही झाली नसती!

**नारायणराव**—( सद्गदित स्वरानें ) अगे छिनाली, तुला हवी होती कशाला माझी भेट! तो गोपाळराव होता कीं नाहीं जवळ? त्याच्या घरच्या पुराणिकाला, शालजोडी, लुगडें, चोळी देण्याला, व त्याला त्या बंगल्यावर आणण्याला व त्याच्या बागेंतील बंगल्यावर जाऊन त्याच्या बरोबर चैन मारण्याला नाहीं शरम वाटली? आणि आतां प्राण जातो ह्मणून मला हांका मारितेस! तुला बेइमानी जारिणीला नरकवासांत पोंचविण्याकारितां, हें शासन योग्य

समजून मीं दिलें आहें. तूं वेश्येपेक्षांही नीच आहेस, करितां ह्यापेक्षांहीं कांहीं अधिक शिक्षा तुला पाहिजे होती! परंतु तशी शिक्षा नाहीं ह्मणून निरुपायानें ही मृत्यूची शिक्षा तुला दिली. अगे जारिणी, काल रात्रीं प्रत्यक्ष मीं ह्या कानांनीं तुझें व गोपाळरावाचें बोलणें ऐकिलें असतां व तूं त्याच्या बंगल्यावर गेली होतीस ह्याविषयीं मीं आपली पक्की खातरी करून घेतली असतां, तूं आतां मरावयाला टेंकली आहेस तरी खोटें बोलून तें नाकबूल करितेस ! पापिणी अखेरच्या वेळेस तरी खरें बोल !

**गोदावरी**—( अगदीं हळूं ) सख्या, त्या शालजोडीची भानगड झाली, ती मीं पत्रांत लिहिली होती. तिचे रुपये भरून घेतलेले पेटींत आहेत. मी मरतें, पण ह्यावेळेस तरी मला नाहीं नाहीं ते दोष लावूं नका. ईश्वर सर्व पहात आहे! सख्या तुझ्याशिवाय इतर पुरुषाविषयीं भलतीच कल्पना माझ्या स्वप्नांतही आली असली तर ईश्वर मला सहस्रजन्म-न-कांत घा-घाई! स-स क्या जव-या! नाना! सया नाना! ( बोलतनाहींशी होते.)

**नारायणरावाच्या** वरीं पूजा करणारा ब्राह्मण खालीं ओसरीवर निजला होता. त्यानें वर गोदावरी 'आय आई, इत्यादि दुःखाचे उद्गार काढीत होती ते सरासरी ऐकिले. त्यावरून त्यानें नारायणरावाची आत्या घरांत निजली होती तिला हांक मारून तिजकडून दरवाजा उघडविला, व माडीवर काय गडबड आहे तें पाहण्यास नारायणरावाचे खोलीजवळ गेला. त्यानें नारायणरावास हांका मारिल्या; परंतु आंत तो गोदावरीजवळ बसला होता त्यानें ती बोलतनाहींशी झाली व तिचा प्राण जाण्याच्या वेळेस तिच्या हातांपायांस आंचके येऊन ती तडफडूं लागली. हें पाहिलें तेव्हां तोही मूर्छा येऊन पडला; त्यामुळें त्या ब्राह्मणानें दो-

न चार हांका मारिल्या तरी त्यानें हांक दिली नाहीं. तेव्हां ब्राह्मणानें बाहेरून दार मोठ्यानें हालविलें तरी खोलींतून कोणी कांहीं बोललें नाहीं, फक्त गोदावरीच्या अंतकाळच्या एक दोन उचक्या मात्र ऐकूं आल्या, तेव्हां त्यानें बाहेरून दार उचकून उघाडिलें, आणि पाहतो तों दोघेंही जमिनींवर निचेष्ट पडलेलीं त्याच्या दृष्टीस पडलीं. तें पाहून तो घाबरला, त्यानें दोघांसही हाका मारिल्या व हलविलें तरी कोणी शुद्धीवर येत नाहीं असें पाहून तो तसाच धांवत, जवळच एका वैद्याचें घर होतें त्याजकडे गेला, आणि त्या वैद्याला ही सर्व हकीकत सांगितली. तेव्हां तो वैद्यही तसाच जलदीनें नारायरावाकडे आला. त्यानें गोदावरीची नाडी पाहिली, तों तिचे प्राण निघून गेले असें त्याला दिसलें. तेव्हां तिला सावध करण्याचा उपाय करणें व्यर्थ समजून त्यानें नारायणरावाची नाडी पाहिली, तेव्हां त्याला मूर्छा आली आहे असें त्यास समजलें; तेव्हां त्यानें त्याच्या तोंडावर व डोक्यावर पाणी शिंपून, त्याच्या नाकाशीं कांहीं औषधाची पूड धरिली; आणि वारा घालूं लागला; तेव्हां कांहीं वेळानें नारायणराव सावध झाला; आणि वैद्यास पाहून ह्मणालाः—तुह्मी केव्हां आला.

वैद्य—मी आतांच आलों. तुमच्या कडील हे भटजी घाबऱ्या घाबऱ्या बोलवावयास आले. ह्मणून मीही तसाच जलदीनें आलों. हें काय? कुटुंबाला काय झालें? आज सकाळीं मीं त्यांना पाहिलें तेव्हां चांगल्या होत्या. इतक्यांतच हा प्रसंग कसा आला?

नारायणराव—मी मघां घरीं आलों. मला पाहिल्यापासून तिच्या वृत्तींत व चर्येंत बदल पडत चालला असें दिसूं लागलें. व मध्येंच हसल्यासारखें, मध्येंच रडल्यासारखें करी असें चाललें होतें. पण मीं ह्मटलें कीं, हें उगाच

असेल. ह्मणून मीं तिकडे लक्षही दिलें नाहीं. जेवण वगैरे झाल्यावर येथें आली, आणि माझ्या अंगावर पडून एक सारखी आनंदित मुद्रेनें मजकडे पहात होती, तशीच पहात राहिली. हालचाल वगैरे कांहीं करीना. तेंव्हां मीं हातानें हालविली तरी कांहीं नाहीं. तेंव्हां मीं बिछान्यावर ठेविली. इतक्यांत तिनें डोळे फिरविले, आंचके येऊं लागले, व तिचे हातपाय गार पडत चालले. तें पाहून माझ्या मनालाही धक्का बसून मीही चक्कर येऊन पडलें, तो आतां शुद्धीवर आलें. पहा कांहीं उपाय होण्यासारखा असला तर करा.

**वैद्य**—मीं आल्याबरोबर नाडी व श्वासोच्छ्वास पाहिला. आतां उपाय करण्यासारखें कांहीं राहिलें नाहीं. आतां पुढच्या तयारीस लागावें.

वैद्याच्या तोंडचे हे शब्द ऐकून, नारायणरावानें जरी गोदावरीचा प्राण घेतला होता, तरी ती त्याच्या पुढें प्रेत होऊन पडलेली पाहून त्याला दुःख झाल्याशिवाय राहिलें नाहीं. तो मोठ्या दुःखानें तिच्याजवळून उठला. वैद्यानें इतर लोक बोलावून सर्व तयारी केली. उजाडण्याच्या पूर्वींच गोदावरीचा दहनविधि उरकून, आलेले सर्व लोक आपआपल्या घरीं गेले.

## भाग ११ वा.

मागें सांगितल्याप्रमाणें गोदावरी वारली, त्या दिवशीं नारायणरावाचा मित्र वकील हा घरीं नव्हता. तो कोणा एकाच्या तर्फेनें कज्जा चालविण्यास वसई प्रांताच्या माजिस्त्रेटची कचेरी तेथून तीन चार कोशांवर होती त्या ठिकाणीं गेला होता. नारायणराव घरीं आला त्याच्या दुसऱ्या दि-

वशीं तो घरीं आला. तेव्हां त्याला गोदावरीच्या आक स्मिक मरणाचें वर्तमान समजलें. ती त्याला आपल्या सख्या भावाप्रमाणें मानीत असे व तोही तिला आपली बहीण मानीत असे, व त्यांचें तसें प्रेमही होतें; त्यामुळें तिचें मरण ऐकून त्याला फार दुःख झालें, व एकाएकीं कांहीं अजार नसतां ती मेली, व नारायणरावही मध्येंच घरीं आला, ह्या गोष्टीचा त्याला कांहींसा चमत्कार वाटला. तो तसाच नारायणरावाकडे गेला. तों तो दुःख व क्रोध यांनीं भ्रमिष्टासारखा बसलेला होता

**वकील**—नारायणराव, ईश्वरानें तुह्मांला मोठ्या दुःखांत लोटून दिलें! तुमच्या संसाराचा पाया बसतो न बसतो इतक्यांत तो ढांसळून गेला! फारच दुःखाची गोष्ट झाली! काय झालें गोदावरीला एकाएकीं? मी दोन दिवसांपूर्वी त्या पोष्टाच्या शिपायावर फौजदारी खटला होता तो चालविण्यास फिर्यादी तर्फे गेलों होतों. जातांना तिला भेटूनच गेलों. तेव्हां ती चांगली होती. आमची काकू तर सांगते कीं काल सकाळीं देखील ती चांगली होती. आणि एकाएकींच बिचारीवर मृत्यूचा घाला कसा पडला? मीं ऐकिलें कीं, कांहीं हर्षवायूसारखें झालें?—

**नारायणराव**—( दीर्घ श्वास टाकून. ) तसेंच कांहीं खरें!!

**वकील**—अरेरे! फारच वाईट झालें! बिचारी किती गरीब, किती सभ्य! किती मर्यादशील! किती निर्मळ अंतःकरणाची! किती शहाणी! तिचे सद्गुण, तिचें बोलणें, तिचें चालणें, ह्यांत कोठें नांव ठेवण्याला तिळमात्र जागा मिळणार नाहीं! तिच्यासारखी सर्व सुगुणसंपन्न स्त्री विरळाच असेल! तुह्माला ती एक लक्ष्मीच महत्पुण्यानें प्राप्त झाली होती? परंतु ईश्वराच्या मनांत नाहीं तुह्माला ती पचूं द्यावयाची!

बिचारीला ईश्वर सद्गति देवो! ती पतिव्रता व सदाचारिं आहे, तेव्हां तो तिला सद्गतीच देईल. ह्याविषयीं संशय नकोच !

**नारायणराव**—पतिव्रता किंवा जारिणी, सदाचरणी, किंवा दुराचरणी असेल त्याप्रमाणें ईश्वर गति देईल!

**वकील**—मित्रा, गोदावरीच्या पतिव्रत्याविषयीं व सदाचरणाविषयीं शंका आहे काय ? ही शंका घेणें देखील महत्पाप होईल !

**नारायणराव**—ह्मणजे पातिव्रत्य व सदाचरण हे गुण तिच्या अंगीं वसत असून मग शंका घेतली तर पाप लागणार कीं नाहीं ? मुळीं त्या गुणांचा अभावच जर असेल, तर मग शंका घेणें हें पाप कीं पुण्य ?

**वकील**—शिव शिव शिव ! अरे नारायणराव, गोदावरीच्या गुणांविषयीं का तुला ही शंका ? तुला तिच्याविषयीं ही शंका येणें ह्मणजे पूर्वेचा सूर्य पश्चिमेस उगवणें आहे ! तुला कांहीं भ्रम तर झाला नाहींना ? अरे, गोदावरी जर पतिव्रता नाहीं ह्मटलें, तर मग जगांत कोणतीच स्त्री पतिव्रता नाहीं असें ह्मणावें लागेल ! !

**नारायणराव**—अजून देखील जर तिला मी पतिव्रता ह्मणेन, तर अगदीं हलकट वेश्येला सुद्धां मला पतिव्रता ह्मणावें लागेल ! ! ( अश्रु ढाळितो. )

**वकील**—हाय हाय ! हें काय नारायणराव, मला तुमची चर्या कांहीं नीट दिसत नाहीं. मी गोदावरीची गोष्ट काढिल्यापासून तुमची मुद्रा अधिकाधिक बदलत चालली आहे ! आणि आतां तर तुह्माला शोकानें व विशेषेंकरून क्रोधानें अगदीं गिळून टाकिलें आहे असें दिसतें. दांत ओंठ काय चावतां ! अंग काय थरथरतें ! डोळ्यांतून अश्रु काय वहात आहेत ! अहो, जी तुह्माला प्राणापेक्षांही आव-

डती होती, तिच्या मृत्यूविषयीं गोष्टी चालल्या असतां, तुह्मी क्रोधानें संतप्त झाल्यासारखे झालां ! जिच्या सद्गुणांविषयीं तुमची अगदीं बालंबाल खातरी होती, त्यांविषयीं आतां संशय दाखवितां, हें आहे तरी काय ? ह्यांत कांहीं तरी इंगित आहे. नारायणराव, गोदावरी पतिव्रता व सदाचरणी नव्हती असें तुह्माला वाटत आहे काय ? वाटत असल्यास तें गुप्त न ठेवतां, कशावरून तसें वाटतें, तें मला सविस्तर सांगा. मजजवळ तुमचा कांहीं परकेपणा नाहींना? आजपर्यंत तर नव्हता, मग आतां काय असेल तें नकळे. परंतु जर मजविषयीं तुमचा पहिल्याप्रमाणें स्नेहभाव असेल, तर तिजविषयीं तुह्माला काय वाटत आहे तें स्पष्ट मला सांगा.

**नारायणराव**—तुमचा व माझा कांहीं परकेपणा नाहीं; व ज्या अर्थीं आतां सर्व दुराचरणाचें मूळच नाहींसें झालें आहे त्या अर्थीं तुह्माजवळ कोणतीही गोष्ट सांगण्यास कांहीं अडचण नाहीं. मी तुह्माला खरोखर सांगतों कीं, ती उगाच सामान्य नव्हे, तर महाजारिणी निघाली होती. वेश्येपेक्षांही अधिक ! कारण वेश्या ज्या आहेत त्या आपला धंदा उघड सांगून संवरून चालवितात; परंतु ही मजवर आपली प्राणापेक्षांही अधिक प्रीति आहे असें दाखवीत असून जेव्हां जारिणी निघाली तेव्हां हिची कडी वेश्येवर ह्मटली पाहिजे ! शिव शिव शिव ! मित्रा ती जारिणी निघाली तर निघाली, आणि आतां तिच्या त्या घाणेरड्या कर्माचा मला उच्चार करावा लागत आहे.

**वकील**—हें तुह्मी कशावरून ह्मणतां ? कोणाशीं कधीं कुठें तिनें जारकर्म केलें? व ती गोष्ट तुह्मांस कशी समजली व तिजविषयीं तुह्मीं आपली खातरी कोणत्या रीतीनें करून घेतली ?

**नारायणराव**—मीं त्याविषयीं इतर प्रमाणांवरून तर

खातरी करून घेतलीच होती, पण 'चक्षुर्वैसत्यं' ह्या न्यायानें तो प्रकार प्रत्यक्षही पाहिल्या सारखाच ह्मणावयाचा. आणखी हें दुष्कर्म तरी कोणाशीं, तर ज्याचें नांव घेतलें असतां देखील आह्माला स्नान करावें लागेल, व ज्याचें नांव घेतलें तरी मला पाप लागेल असें ती माझ्याजवळ ह्मणत असे, त्या नष्ट गोपाळरावाशीं ! ! ही गोष्ट मनांत आली ह्मणजे विषप्राशन केल्याप्रमाणें अंगाचा दाह होऊन जातो !

**वकील**—तुह्मी आपली खातरी करून घेतली असें ह्मणतां, तरी अद्यापि त्या गोष्टीवर माझा विश्वास बसत नाहीं. माझी तर अशी खातरी आहे कीं, गोदावरी जर पतिव्रता नसेल तर अहिल्या, द्रौपदी इत्यादि पंचमहा पतिव्रता देखील पतिव्रता नव्हत्या असें ह्मणावें लागेल ! ह्याकरितां काय हकीकत असेल ती सविस्तर सांगा.

**नारायणराव**—ऐका तर. प्रथम मी जेव्हां येथून गेलों त्या वेळेस आमचा उभयतांचा एकमेकांस दर चवथे दिवशीं पत्रें पाठवावयाचें असा संकेत ठरला होता. तेथें गेल्यावर त्या ठिकाणीं लवकर पत्रें पोंचत नाहींत वगैरे कळवून तिला मीं आठ दिवसांनीं पत्र पाठविण्याविषयीं लिहिलें. त्याप्रमाणें एक दोन पत्रें मला आलीं. पुढें आज दोन अडीच महिन्यांत पत्राच्या नांवानें शून्य ! मीं पत्रें लिहून लिहून माझा हात देखील दमविला, पण तिजकडून ह्मणून उत्तर नाहीं! तुह्मांकडूनही एक दोन पत्रें आलीं त्यावर कांहीं नाहीं. पण मी तुह्माला त्याविषयीं फारसा दोष देत नाहीं, कारण तुह्माला कामामुळें बनलें नसेल. पण तिला तर कांहीं काम नव्हतेंना ? तिनें तर वेळच्या वेळीं पत्रें पाठवावयाचीं होतीं कीं नाहीं ? पण तिची मजवरची प्रीतिच उडाली, मग पत्र पाठविण्याविषयीं मनांत तरी कशाला येतें ? त्या वेळेपासूनच तिच्या दुराचरणास आरंभ झाला.

हें सांगून नंतर त्यानें आपली व पुराणिकाची भेट कशी झाली, त्याला आपल्या घरांतील वस्तू गोदावरी व गोपाळराव ह्यांनीं कोणकोणत्या व कशा रीतीनें दिल्या, ह्याविषयीं पुराणिकानें सांगितलेली हकीकत, त्या वस्तू आपल्या दृष्टीस कशा पडल्या, पुराणिकाजवळ आपण गोदावरी ही आपली कोण आहे ह्मणून सांगितलें, इत्यादि हकीकत, त्यावरून आपली झालेली खातरी, व आणखी आश्विन शुद्ध अष्टमीचे रात्रीस आपण गोपाळरावाच्या बंगल्यांत ऐकिलेल्या गोष्टी, इत्यादि तिच्या दुराचरणाविषयीं ह्याच्या मनांत जें जें होतें तें सर्व त्या वकिलास सांगितलें. तें सांगत असतांना त्याच्या गळा दाटून आला. शेवटीं ह्मणालाः-मित्रा अजूनही तिच्या जारकर्मविषयीं संशय राहिला आहे काय?

वकिलानें ही हकीकत ऐकिली तेव्हां त्याचें मन दुःख व क्रोध यांनीं अगदीं खवळून गेलें. कांहीं वेळ त्याच्यानें कांहीं बोलवलें देखील नाहीं. नारायणरावानें सांगितलेल्या हकीकतीवरून गोदावरीच्या मरणाला हाच कारण झाला असावा, असा त्यास पक्का संशय आला. मग कांहीं वेळानें ह्मणालाः—

मग अशी तुमची खात्री झाल्यावर तुह्मीं तिचें काय केलें?

**नारायणराव**—( आवेशानें ) तिचें काय केलें हें सांगावयास नकोच ! अहो जी अशा प्रकारची क्रियानष्ट, बेइमानी, विश्वासघातकी, जारिणी-कीं जिच्या स्पर्शानें पृथ्वीला देखील विटाळ व्हावा—ती स्त्री या जगतांतून नाहींशी करून तिच्या कृतकर्मांचें प्रायश्चित्त भोगण्यास रवरव नरकांत पाठविणेंच योग्य !

**वकील**—एकून या संशयावरून तुह्मीं तिचा शेवट केला असें दिसतें. हर हर! परमेश्वरा ! काय तुझ्या घरीं अन्याय हा ! अरे जी निःसीम पतिव्रतांमध्यें अग्रगण्य, तिचा महा-

जारिणी ह्मणून शेवट व्हावा काय? हाय हाय ! महापतिव्रते ! गोदावरी ! तुला असा वृथा दोष येऊन या रीतीनें मरण यावें काय? नारायणराव, तुह्मीं तरी या कामांत कांहीं विचार करून वागावयाचें होतें. अरे तूं जो एवढा विचारी व शांत स्वभावाचा, अशी लहानपणापासून तुझी प्रसिद्धि होती तो स्वभाव तुझा गेला कुठें? आणि तूं त्या दुष्टांच्या कपट--युक्तींनीं कसा फसलास? तिजवर जो तुह्मीं दोष ठेविला तो अगदीं खोटा आहे. तें सगळें अवडंबर गोपाळराव व रामभाऊ यांनीं बनावट केलें आहे. मी काल येथील पोष्टांतील लखोटे वांटणाऱ्या शिपायावर एकानें फिर्याद केली होती, त्याच्या तर्फे वकील होऊन माजिस्त्रेटच्या कोर्टांत गेलों होतों. तेव्हां त्या शिपायाच्या घराचा पोलिसानें झाडा घेतला. त्यांत कितीएक पत्रें सांपडलीं त्यांत मजकडून व गोदावरीकडून तुह्माला पाठविलेलीं, व तुह्मांकडून आह्मांला आलेलीं अशीं आठ दहा पत्रें व त्यांबरोबर इतर लोकांचींही कितीएक पत्रें मिळालीं. त्यांतून जीं तुमच्या आमच्या संबंधाचीं होतीं तीं मीं मागून घेतलीं. तीं त्या शिपायानें रामभाऊच्या सांगण्यावरून पोष्टांतून काढून घेतलीं होतीं. असें त्या शिपायानेंही जबानींत लिहून दिलें.परंतु त्याच्या एकट्याच्या सांगण्याशिवाय दुसरा कांहीं रामभाऊनें त्यास पत्रें काढून घेण्याविषयीं सांगितल्याबद्दल पुरावा मिळाला नाहीं, त्यामुळें त्या दुष्टावर खटला करतां आला नाहीं. तीं पत्रें मी घरीं जाऊन घेऊन येतों. तीं तुह्मीं पाहिलींत ह्मणजे गोदावरीविषयीं त्या दुष्टांनीं जें तुह्मास भुरळ पाडिलें आहे, त्याचा समूळ नाश होईल.आतां त्याचा कांहीं उपयोग नाहीं, कारण अनर्थ व्हावयाचा तो होऊन गेलाच आहे. परंतु गोदावरीच्या निरपराधीपणाविषयीं तुमची खात्री होईल. व त्या दुष्टांचें कपटही तुह्माला कळून

येईल. असें सांगून तो आपल्या घरीं गेला, आणि तीं सर्व पत्रें घेऊन आला, व नारायणरावापुढें ठेवून त्याला तीं वाचून पाहण्यास सांगितलें. त्या वकिलाच्या बोलण्यावरून नारायणरावाच्या मनांतील गोदावरीच्या दुष्कृत्यांविषयीं जो दृढग्रह झाला होता, तो कांहींसा सईल होत चालला होता. परंतु त्या गोदावरीच्या पत्रांतून जेव्हां तो एकेक पत्र घेऊन वाचूं लागला, तेव्हां त्या पत्रांतील आपल्या प्रियेचें अक्षर, आंतील मजकूर लाडक्या, गोड व प्रेमपूरित शब्दांनीं लिहिलेला, जेव्हां त्याच्या दृष्टीस पडला, तेव्हां त्याच्या मनांतील ग्रह वितळत चालला. वाचतां वाचतां ज्या पत्रांत गोदावरीनें, शालजोडी, लुगडें व चोळी सांडल्याची हकीकत लिहिली होती, तें पत्र त्याच्या हातांत आलें, व तो तें वाचूं लागला. तें पत्र जसेंच्या तसेंच नाहीं, परंतु त्यांतील सर्व मतलब आमच्या वाचकांस समजावा ह्मणून तें पत्र जसें आमच्या समजण्यांत आलें तसें खालीं दिलें आहेः——

जिवलग प्राणप्रिय नारायणराव मुक्काम पेठ यांचे सेवेसीं

आपली लाडकी वियोगानें दुःखित झालेली दासी मी आपणास पत्राच्या चार ओळी, वेड्यावांकड्या मला जशा सुचल्या तशा लिहिल्या आहेत. यांकडे प्रेमपूर्वक लक्ष द्यावें. सख्या! आपण तिकडे गेल्यावर आपलीं दोन पत्रें मला पोंचलीं त्यांवर आपणांकडून पत्र आलें नाहीं. पोष्टाचा शिपाई आज पत्र घेऊन येईल, उद्यां घेऊन येईल, ह्मणून मी रोज त्याच्या येण्याच्या वेळेवर दरवाज्याकडे डोळे लावून बसतें. त्याची येण्याची वेळ टळत चालली ह्मणजे माझ्या डोळ्यांची धार सुरू होते. ती कांहीं केल्या थांबत नाहीं, त्याच्या योगानें माझी दृष्टीही निस्तेज झाली. तींत पाणी राहिलें नाहीं. आपल्या पत्राकरितां परमेश्वराची प्रार्थना करितां करितां माझा कंठशोष होतो! आपण चार घटका

दृष्टीस पडलां नाहीं, तर माझी काय स्थिति होत असे हें माहीतच आहे, मग आज दोन महिन्यांत भेट तर नाहींच. पण पत्र देखील नाहीं! तेव्हां माझी काय अवस्था झाली असेल हें आपणच लक्षांत आणावें! मी अज्ञान असल्यामुळें तें लिहून कळवितां येत नाहीं. माझें मन आपणाजवळच आहे, तेव्हां त्याची कशी अवस्था आहे त्याची आपण परीक्षा करावी. मीच तिकडे निघून आलें असतें, पण आपली आज्ञा नाहीं. त्यामुळें येण्याची पंचाईत. नाहींतर आपणाजवळ येण्यास मध्यें वाटेचे कितीही अडथळे व संकटें असलीं, तरी त्यांना मीं जुमानिलें नसतें. तशीच माझ्या सख्याला भेटण्यास आलें असतें, तर कृपा करून मला तिकडे येण्याची परवानगी द्यावी. तसें नाहीं. तर आपण रजा घेऊन घरीं यावें, मग आपण बरोबरच तिकडे जाऊं! येण्यास रजाही मिळत नसेल, व मलाही तिकडे येण्याची परवानगी देण्यास सवड नसेल, तर अशी सर्वकाळ आपणां उभयतांस दुःखांत ठेवणारी चाकरी काय करावयाची आहे? तिला लाथ मारावी, ईश्वरकृपेनें दुसरी कोठें तरी मिळेल. नाहींतर घरीं राहूनही गरिबीच्या रीतीनें आपला निर्वाह होईल. सख्याचें पत्र कां येत नाहीं, ह्याविषयीं शेकडों वेळां विचार करितें; पण कारण कांहीं लक्षांत येत नाहीं. मजवरची प्रीति कमी झाली असेल, दुसऱ्या ठिकाणीं जडली असेल, माझी आठवण नाहींशी झाली असेल, ह्या गोष्टी मनांतही येत नाहींत. कारण माझ्या प्रियाचें मन मला पुरतेपणीं ठाऊक आहे. पत्रें पोंचत नाहींत, ह्मणावें. तर एक नाहीं पोंचणार, दोन नाहींत पोंचणार पण आजपर्यंत दहा बारा पत्रें मजकडून गेलीं, त्यांतील एकही कसें पोंचलें नसेल? एकाच मजकुराचीं अशीं एकामागून एक मी दोन दोन पत्रें लिहितें. अशा करितां कीं, पहिलें पोंचलें नसलें

तर दुसरें तरी पोंचेल. वकील भावोजींच्या पत्रांचेंही उत्तर नाहीं. पत्रें पोंचून उत्तर पाठविणार नाहीं असेंही वाटत नाहीं. अशा एकमेकींच्या विरुद्ध गोष्टी मनांत येऊन मनाचा घोंटाळा होऊन जातो. कांहीं सुचत नाहींसें होतें. अन्नही गोडं लागत नाहीं! आणखी त्यांत ते मेले पोटजळे मधून मधून त्रास देतात. एक ढोंगी लबाड बाई आपणांकडून आल्याचें सोंग घेऊन आली होती. तिची हकीकत पूर्वींच्या दोन पत्रांत लिहिली आहे. त्यावर आणखी असें झालें कीं, येथील खालच्या आळींत रहाणारी रखमाबाई ह्मणून आहे ती आमच्या घरीं कधीं कधीं येत असते. तिच्या भाचेसुनेचें गर्भाधान होतें, त्या दिवशीं त्या मुलीला नेसण्यास चांगलेंसें चिरगूट नाहीं ह्मणून ती बाई काकुळतीस येऊन मजजवळ तेवढ्या गर्भाधानाच्या वेळेपुरतें नेसण्यास माझें लुगडें मागवयास आली. त्याबरोबर चोळी व शालजोडीही तिनें मागितली. मीं पहिल्यानें तिला नाहीं देत ह्मणून सांगितलें. पण ती बाई त्या चिरगुटांकरितां फारच गयावयां करून विनवण्या करूं लागली. त्या वेळेस आपण देखील नाहीं ह्मटलें नसतें. मलाही तिची फार दया आली, ह्मणून एक दिवसाच्या बोलीनें तिला घरांतील जुनी शालजोडी, लुगडें व चोळी हीं दिलीं. दुसरे दिवशीं ती बाई तीं चिरगुटें सांडलीं ह्मणून सांगावयास आली. तेव्हां मला मीं तीं चिरगुटें तिला कोठून दिलीं असें झालें! मग मीं तीं माझीं मला भरून दे असें तिला सांगितलें. व आपल्या सामानाच्या यादींत किंमत पाहून तिला सांगितली. ती तिनें दुसरे दिवशीं आणून दिली. तीन वस्त्रां मिळूनएकंदर बहात्तर रुपये घेतले आहेत. आपल्या परवानगीवांचून मीं ही खटपट केली, ही माझी मोठी चूक आहे. गरिबाची दया करण्यास गेलें तें असें लचांड झालें. ह्याविषयीं ह्या गरीब अज्ञान दा-

सीला माफी असावी. पुन्हां अशा खटपटींत पडावयाची नाहीं. आतां फार लिहून आपणास तसदी देत नाहीं. सख्या! पत्राचें उत्तर पाठवावें ह्मणून आतां किती वेळां लिहूं? मी जर आपली खरोखर लाडकी असेन, तर हें पत्र पोंचल्याबरोबर ह्याचें उत्तर पाठवाल ! पहिलीं आपलीं दोन पत्रें आलीं, त्यांचे रोज मुके घेतां घेतां तीं जीर्ण झालीं ! आतां ज्यास्त लिहवत नाहीं. आतां आपली आज्ञा घेऊन पत्र पुरें करितें लोभ आहेच हे विज्ञापना.

आपली लाडकी वियोग-
दुःखिता **गोदावरी.**

वकिलाच्या खातरीच्या सांगण्यावरून व **गोदावरीचीं** इतर पत्रें वाचून नारायणरावाची तिच्या निरपराधीपणाविषयीं खातरी होत चाललीच होती. परंतु वर सांगितलेलें पत्र जेव्हां त्यानें वाचिलें, आणि त्याला शालजोडी वगैरे वस्त्रांची हकीकत कळली, तेव्हां त्याचें मन अगदीं विव्हळ होऊन गेलें. नेत्रांतून अश्रुधारा चालल्या. शेवटीं हातांतील पत्रही खालीं पडलें, व तो एकदम जमिनीवर पडला. तेव्हां त्या वकिलानें त्याच्या डोळ्यांस पाणी लावून व वारा घालून त्यास सावध केलें. नंतर नारायणरावाजवळ जीं **गोदावरीचीं** पत्रें पडलीं होतीं त्यांतून त्या कुंटण बाईचा ज्यांत मजकूर होता तें त्यानें त्यास वाचून दाखविलें. कारण नारायणरावाच्यानें पत्र वाचवेना. अशी त्याची अवस्था झाली आणि ह्मणालाः—

एकूण माझी प्रिया निरपराधी, निष्कलंक व पतिव्रता असतां दुष्टांनीं कुभांड रचून मजकडून तिचा नाश करविला ! ईश्वरा काय तुझ्या घरीं न्याय हा ! केवढा मी पापी ! केवढा अविचारी व घोरकर्मी! प्रिये, माझे अश्रु वर पडण्यास तुझें प्रेत देखील आतां राहिलें नाहीं ! हाय हाय !

**वकील**—अजूनही तिच्या निष्कलंकपणाविषयीं तुमची खातरी करून द्यावयाची आहे. परवां रात्रीं, गोपाळरावाच्या बंगल्यांत तिचें बोलणें तुह्मीं ऐकिलें असें ह्मणतां, परंतु त्या रात्रीं गोदावरी दहा अकरा वाजतपर्यंत आमच्या घरीं महालक्ष्मी असल्यामुळें तेथें होती, व मग तिला आमच्या गड्यानें घरीं पोंचविलें असें समजतें. तर त्या दिवशीं त्या बंगल्यांत कोण आली होती ह्याविषयीं मी शोध करितों. पोष्टाचा शिपाई ज्याला परवां तुरुंगाची शिक्षा झाली, त्यानें तुमचीं पत्रें पोष्टांतून काढून घेतलीं हें तर तुह्मांला समजलेंच आहे. आणखी त्या रखमाबाईनें शालजोडी वगैरे वस्त्रांचें काय केलें ह्याविषयींही शोध लाविला पाहिजे. आतां शोध करण्याचा फारसा उपयोग नाहीं, अनर्थ व्हावयाचा तो होऊन गेलाच आहे; व तो जन्मभर आपणास दुःख शोकांत घालण्यास कारण झाला आहेचः परंतु तिच्या निरपराधीपणाविषयीं तुमच्या मनांत पूर्णपणें बिंबावें ह्मणून हे शोध करावयाचे.

असें बोलणें झाल्यावर तो वकील आपल्या घरीं गेला. त्या दिवशीं संध्याकाळीं त्यानें गोदावरीच्या पत्रांत लिहिलेल्या रखमाबाईचा शोध केला. नंतर एक पोलीसचा शिपाई बरोबर घेऊन संध्याकाळचे वेळेस त्या बाईचे घरीं गेला. आणि ती एकटीच घरांत आहे असें पाहून, जमदग्नीचा अवतार आणून तिला ह्मणालाः—

अवदसाबाई ! त्या नारायणराव मास्तरची बायको गोदावरी, तिच्या जवळून तुह्मीं कांहीं दिवसांपूर्वी, शालजोडी, लुगडें व चोळी अशीं तिचीं वस्त्रें, आपल्या भाचेसुनेस गर्भाधानाच्या दिवशीं नेसावयास ह्मणून आणिलीं होतीं, तीं तुह्माजवळून हरवलीं असा खोटा बहाणा करून त्यांची किंमत तुह्मीं भरून दिली हें खरें; परंतु तीं वस्त्रें ह-

रवलीं ह्मणून जें तुह्मीं सांगितलें तें अगदीं खोटें सांगितलें, अशी मीं आपली पक्की खातरी करून घेतली आहे; व त्याबद्दल तुह्मावर ठकबाजीची फिर्याद केली आहे. तुह्मास लवकरच बिनभाड्याच्या घरांत पोंचविण्याचा विचार आहे. तुह्माला पकडण्याकरितां हा पोलीसाचा शिपाई बरोबर आणिलाच आहे. जर त्या वस्त्रांच्या भानगडींतील खरी हकीकत काय आहे ती सांगाल तर आह्माला आपली फिर्याद काढून घेण्याची तजवीज करतां येईल. नाहीं तर आतांच मुसक्या बांधावयास सांगतों, सांगू कीं सांगतेस काय तें खरें?

हें त्या वकिलाचें बोलणें ऐकून व त्याचा तो क्रोधाचा आवेश व बरोबर असलेला शिपाई पाहून ती बाई घाबरली; आणि तिनें सर्व खरी हकीकत त्याजपाशीं सांगितली आणि शेवटीं ह्मणाली:—

आतां मीं खरें खरें सांगितलें आहे. मजकडून हा मोठा अन्याय झाला खरा. मी मोठी पापीण आहें. क्षमा करणें आपणासारख्या थोरांचें काम आहे.

**वकील**—बरें आहे; पण हीच हकीकत आमच्या एका मित्राची कांहीं एका गोष्टीविषयीं खात्री होण्याकरितां, तुला त्याजकडे येऊन तेथें सांगितली पाहिजे. तर तूं सुटशील; नाहींतर तुझ्या कपाळीं तुरुंग आहेच !

ती बाई वकिलाच्या ह्मणण्यास कबूल झाली. तेव्हां तो तिला बरोबर घेऊन नारायणरावाकडे गेला. तेथें त्या बाईनें त्या वस्त्रांची सर्व खरी हकीकत नारायणरावादेखतां सांगितली ती ऐकून त्याला त्या बाईचा इतका राग आला कीं, तिच्या कपाळावर घालण्यासाठीं कांहीं मिळावें ह्मणून तो इकडे तिकडे पाहूं लागला. परंतु ही त्याची चर्या पाहून वकिलानें तिला तेथून काढून दिलें. दुसरे दिवशीं त्या वकिलानें गोपाळरावाच्या बागेंतील एका चाकराची भेट घेऊन

त्याला अष्टमीचे दिवशीं रात्रीं गोपाळरावाच्या बंगल्यांत कोणती वेश्या आणिली होती तें विचारिलें. गोपाळरावाच्या बंगल्यावर वेश्या येणें हें कांहीं चोरून लपून होत नसे. त्यामुळें त्यांत कांहीं गुप्त नाहीं असें समजून त्या चाकरानें त्या वेश्येचें बिऱ्हाड त्याला दाखविलें. तोच चाकर ती बागेंत आली होती त्याच्या दुसऱ्या दिवशीं तिला तिच्यां बिऱ्हाडीं पोंचवावयास गेला होता. त्या वेश्येचें बिऱ्हाड समजल्यावर तो वकील त्याच दिवशीं रात्रीं सात साडेसात वाजण्याचे सुमारास तिजकडे गेला, व त्या रात्रींचे पांच रुपये देण्याचें कबूल करून तिला नारायणरावाचे घरीं आणिलें. ती वेश्या त्या शहरांत नवीनच आलेली होती. त्यामुळें नारायणरावाचें घर तिला ठाऊक नव्हतें व कोणाची फारशी ओळखही नव्हती, त्यामुळें नारायणरावाचा, गोपाळरावाचा व ह्या वकिलाचा संबंध काय वगैरे तिला कांहीं माहीत नव्हतें, व ती गरीबही होती त्यामुळें ती वकिलानें बलाविल्यावरून नारायणरावाचे घरीं गेली. वकिलानें नारायणरावास एका लहानशा खोलींत बसावयास सांगून तिच्या जवळच्या मोठ्या खोलींत तिला घेऊन आपण बसला. तिजबरोबर त्यानें बऱ्याच गोड गोष्टी चालवून आपण श्रीमंत आहों, वेश्यांच्या घरीं आपण रात्रीस राहावयास जात नाहीं, त्यांनाच अधिक उणे पैसे देऊन आपल्या घरीं आणितों आपल्या मनांत एखादें चांगलेंसें पांखरूं मिळाल्यास ठेवावयाचें आहे, तीस चाळीस रुपये दरमहा द्यावयास पडले तरी चिंता नाहीं, तें पांखरूं मात्र विश्वासू असलें पाहिजे, असें त्या बोलण्यांत तिला कळविलें. त्यामुळें तिलाही वाटलें कीं, ह्यानें आपणास ठेविलें तर तीस चाळीस रुपये दरमहा मिळतील. ह्या विचारानें तिच्या तोंडास पाणी सुटलें, व तीही ह्याचें मन खुष करण्यावि-

षयीं व आपण विश्वासू आहों हें त्याच्या मनांत भरविण्याविषयीं प्रयत्न करूं लागली. ती संधी साधूनः—

**वकील**— तुह्मीं लोक विश्वासानें वागूं ह्मणून पहिल्यानें कबूल करतां; परंतु एखाद्यानें तुह्मांस ठेविलें असलें, आणि तो तुमच्या करितां जरी आपला जीव तोडीत असला, तरी तुह्मांला दुसरा कोणी जरासा भपकेदार व मोठमोठ्या थापा देणारा, त्या रामभाऊ किंवा गोपाळरावासारखा भेटला ह्मणजे मग त्या पहिल्यानें ठेविलेल्या पुरुषाकडे तुह्मीं ढुंकून देखील पहात नाहीं. अशी तुमची चाल असते, ह्मणून तुह्मांवर विश्वास ठेवण्यास मन जरा मागें सरतें.

**वेश्या**—सरकार ‘ सच घोडे बारा टक्के ’ असें नका समजू. मनुष्यें तिथून सगळीं सारखींच, असें नसतें. कोणी पोटजळीनें तुमच्याशीं लबाडी केली असेल, त्यावरून असें ह्मणतां, पण लबाडीचीं कामें तीं कमअसलांनींच करावीं. आमच्या सारख्यांचीं तीं कामें नव्हत. आह्मीं ज्याला एकदां वचन दिलें, त्याच्याशीं प्राण गेला तरी नाहीं लबाडी करणार ! पण तें माझें मींच सांगून काय उपयोग ? ‘ सोनें पाहवें कसून आणि माणूस पहावें वसून ’ तेव्हां खातरी होते. मी हजार वहाणांत पाय घालणारी नव्हे !

**वकील**—पण तुह्माला गोपाळरावानें नादीं लाविलें आहेना ? त्याजकडे तुमचें जाणें येणें देखील आहे !

**वेश्या**—सरकार, येणें जाणें कशाचें, आणि नाद कशाचा ! मी येथें पहिल्यानें आलें तेव्हां येथें माझी कोणाची ओळख नव्हती; तेव्हां ते मजकडे जाऊं येऊं लागले; त्यांची ओळख पडली, तेव्हां एक दोनदां त्याच्या बंगल्यावर गेले होतें. पण एकदां आपल्या सारख्यांनीं पदरांत घेतल्यावर तिकडे मी ढुंकून पहाणार नाहीं !

**वकील**—तें खरें पण तुह्मी अष्टमीच्या रात्रीं त्याच्या

बंगल्यांत गेलां होतां, तेव्हां तर तिथें तुह्मी खूबच गंमत केली ! ती थोडीशी मला समजली आहे, पण सगळी नाहीं समजली. खरें त्या रात्रीं काय गंमत चालली होती ?

वेश्येनें त्याचें बोलणें ऐकून मनांत विचार केला कीं, याला त्या रात्रीची हकीकत थोडी बहुत समजलेली आहेच, तेव्हां आतां आपण जर ह्याला खरी हकीकत न सांगतां कांहीं जुळवाजुळव करून बनावून सांगितली तर ती याला खरी वाटणार नाहीं, आणि तसें झालें ह्मणजे ह्याचा आपणावर विश्वास बसणार नाहीं, आणि मग आपल्यांना ह्याचा आश्रा मिळणार असला तर तोही नाहींसा होईल. ह्याकरितां ह्याजवळ खरी हकीकत सांगावी. आणि ती न सांगण्याला तींत कांहीं गुप्तही नाहींच, अशा विचारानें ती ह्मणाली:—

कसली कपाळाची गंमत! तो नादी मनुष्य! त्यांनी आदल्या दिवशीं कोठेंसें नाटक पाहिलें होतें. त्यांतली सोंगें जीं बोलणीं बोललीं त्यांतलीं कांहीं त्यांना आवडलीं होतीं. तींच येथें मी आणि ते अशीं दोघेंजणें बोललों ! वेड सगळें !

**वकील**—तीं नाटकांतील बोलणीं तुह्मीं ऐकिलेलीं होतीं काय?

**वेश्या**—छत् ! मी कशाला नाटकाला गेलें होतें ? त्या वेळेस त्या **रामभाऊनें** मला बोलायाला शिकविलें तसें मी बोललें.

**वकील**—पण त्या बोलण्यांत तात्पर्य काय होतें ? तुह्मीं कोणत्या सोंगाचें बोलणें बोललां ? आणि **गोपाळराव** कोणत्या सोंगाचें बोलला ?

**वेश्या**—सोंग कशाचें आणि काय कशाचें ? एक सुंदर व तरुणी बायको होती. तिचें आणि एका पुरुषाचें सूत होतें. त्यानें तिचीं कांहीं चिरगुटें कोणाला दिलीं होतीं तीं तिला आणून देण्याचें त्यानें कबूल केलें होतें. तीं त्यानें कबुलीप्रमाणें लवकर आणून दिलीं नाहींत; ह्मणून

ती त्याजवर रुसून बसली होती व तो तिची समजावणी करीत होता, इतकेंच. त्यांत तिचें बोलणें मी बोललें व त्याचें ते बोलले.

**वकील**—पण तिच्या नवऱ्याचें, तिचें, किंवा तिच्या याराचें नांव काय तें तुह्माला नाहीं समजलें ?

**वेश्या**—तिचें आणि तिच्या याराचें नांव नाहीं समजलें, पण तिच्या नवऱ्याला तिचा यार नाऱ्या नाऱ्या ह्मणत असे यावरून तिच्या नवऱ्याचें नांव नारायण असेल. तो कुठें बाहेर गांवीं चाकरीवर होता. त्या बायकोचें आणि तिच्या याराचें पहिल्यानें लग्न होणार होतें; तें त्या तिच्या नवऱ्यानें मोडून आपण तिजबरोबर लग्न लाविलें. अशी सगळी गोष्ट होती.

**वकील**--असें नाटक करण्याचा त्यांचा दुसरा कांहीं हेतु तुह्माला माहीत आहे काय ?

**वेश्या**—या शिवाय मला कांहीं माहीत नाहीं. सोरट लोक ते ! कांहीं तरी केलें झालें ! अजून मला एक पैसा देखील दिला नाहीं ! व आज दोन तीन दिवसांत मला तोंडही दाखविलें नाहीं ! माझे पैसे बुडवितात कीं काय ह्याची मला धास्ती पडली आहे !

वकिलाला तिच्या तोंडांतून एवढा वेळ ती बोलली तेवढेंच बोलणें नारायणरावाला ऐकावयाचें होतें. तें झाल्यावर त्यानें आपलें कपाळ फार दुखूं लागलें असें निमित्य करून तिला ह्मणालाः—

जमनाजी, आज तुह्माला येथें येण्याची तसदी दिली खरी, व आजची रात्र तुह्मांबरोबर गमतींत घालवावी असें मनांत होतें, परंतु माझें डोकें फार दुखूं लागलें आणि ओकारीही होईल असें वाटतें. ह्याकरितां आज तुह्मीं आपले बिऱ्हाडीं जावें. दुसऱ्या एकाद्या वेळेस योग जमून येईल.

आजच्या तसदीबद्दल हे घ्या. असें ह्मणून पांच रुपये तिच्या हातावर दिले. ती वेश्याही त्या पैशांनीं खुष झाली. परंतु उगीच हिरमुसलें तोंड करून ह्मणाली:—

आपल्या सारख्यांची घटकाभर चाकरी करावी अशी माझी फार इच्छा होती, पण तें नाहीं जमून आलें! असो; ओळख विसरूं नका. गरिबाकडे कधीं पायधूळ झाडून घटकाभर चाकरी घ्या. असें ह्मणून ती वेश्या निघून गेली, व तो वकील नारायणरावाचे खोलींत गेला.

त्या दिवशीं तो वकील मागें सांगितलेल्या खटपटींत असतां नारायणराव घरीं एकटाच होता. त्यानें, गोदावरीनें त्याला पाठविलेलीं सर्व पत्रें वाचिलीं; व त्यानें रखमाबाईपासून शालजोडी वगैरे वस्त्रांची हकीकतही ऐकिली होती; त्यावरून गोदावरीच्या निरपराधीपणाविषयीं अगदीं खातरी होऊन गेली. त्यामुळें—ती वेळपर्यंत जें त्याचें अंतःकरण तिच्या दुष्कृत्यांविषयीं व बेइमानीपणाविषयीं त्रासानें भरलेलें होतें—तें, निर्मळ झालें व त्यांतून त्रास व कुकल्पना निघून गेल्यामुळें तें रिकामें झालें. तेव्हां अर्थातच गोदावरी पूर्ण पतिव्रता व पवित्र असतां आपण अविचार करून क्रूरपणानें तिचा प्राण घेतला, ह्या विचाराच्या योगानें झालेलें जें मोठें दुःख तें त्यांत शिरलें, व त्यानें त्याच्या अंतःकरणांतील रिकामी झालेली सर्व जागा व्यापून टाकिली, इतकेंच नाहीं, तर त्याच्या डोकीवरही त्या दुःखाचा फार मोठा भार झाला. त्याच्या योगानें तो तळतळूं लागला. इतक्यांत तो बसला होता तिच्याजवळच्या खोलींत त्या वकिलानें ती वेश्या आणून तिच्याकडून गोपाळरावाच्या बंगल्यांतील अष्टमी रात्रींची हकीकत बाहेर काढिली. ती नारायणरावाच्या कानीं पडल्याबरोबर त्याच्या मनांतील दुःख कमी होऊन त्या ठिकाणीं—गोपाळराव

आदिकरून अधमाधमांनीं आपल्या अत्यंत निर्दोष प्राणप्रियेविषयीं खोट्या गोष्टी आपल्या मनांत भरवून तिचा नाश करण्याविषयीं आपणास उद्युक्त केलें—ह्या दुष्ट कृत्यापासून आलेला क्रोध शिरला. त्यानें त्याचें अंतःकरण व्यापून टाकिलें व तो फार संतप्त झाला. इतक्यांत वर सांगितल्याप्रमाणें वकील त्याच्या खोलींत गेला तों नारायणराव वीरासन घालून बसला आहे, क्रोधानें त्याच्या मस्तकाच्या शिरा फुगून चढून गेल्या आहेत, मुद्रा उग्र झाली आहे व डोळे लाल होऊन जणूं काय त्यांतून आतां ठिणग्याच निघतील असे झाले आहेत व श्वासोश्वास मोठ्यानें करीत आहे, असा त्याच्या दृष्टीस पडला. तो वकील त्याच्यापुढें जाऊन उभा राहिला, तरी तो कांहीं बोललाच नाहीं. तेव्हां वकिल, ह्याला अतिशय संताप आला आहे, असें समजला. त्यानें लागलीच तेथील फडताळांतून गुलाबपाण्यची कुपी काढून तें पाणी त्याच्या डोक्यावर व तोंडावर शिंपून वारा घालूं लागला, आणि त्याच्या अंगावर हात ठेवून ह्मणालाः—

**नारायणराव**, हें काय अशी तुमची अवस्था झाली? जरा शांत व्हा; नाहीं तर अति क्रोधानें पित्तवित्त भडकावयाचें.

**नारायणराव** त्या थंड उपचारानें जरा शांत झाला आणि ह्मणालाः—-

मित्रा, आतां पित्त भडकलें आणि डोकें फिरलें तरी कांहीं चिंता नाहीं. आणि आतां तें भडकल्याशिवाय रहाणारच नाहीं. कारण शांति, समाधान, आनंद हीं ज्या अमृतवल्लीपासून मला प्राप्त व्हावयाचीं, तिचा पाळांमुळांसुद्धां नाश झाला ! ज्या झऱ्यापासून सुखाचा ओघ मजकडे व्हावयाचा, तो झराच कोरडा पडला ! ज्या रम्य स्थानीं मीं वास करावयाचा, तें स्थानच रखरखीत ओसाड अरण्यप्र-

माणें झालें ! आपल्या कांतीनें माझ्या नेत्रांस आनंद देणारी चंद्रिका, मंजुळ स्वरानें कर्णास तोषित करणारी कोकिला, सुगंधानें घ्राण देवतेस तृप्त करणारी सुगंधवल्ली, व स्पर्शानें स्पर्शेंद्रियास व मनास आनंद समुद्रांत बुडविणारी नवनीत-कोमलांगी, व आपल्या चातुर्ययुक्त भाषणानें माझें अंतःकरण हरण करणारी केवळ वाग्देवताच मला अंतरली ! एवंच माझ्या कोणत्याही इंद्रियास सुखाचें साधन ह्मणून राहिलें नांहीं ! तेव्हां आतां सर्व प्रकारें दुःखित जो हा प्राणी त्याला देहाची काय आस्था करावयाची आहे ? आणखी ह्या सर्व सुखांच्या मुळाचा नाश तरी ह्याच देहानें केला, तेव्हां असा हा देह रहाण्यापेक्षां त्याचा सत्यनाश व्हावा हेंच योग्य आहे !

**वकील**—पण इतकें हें होण्यास ते दुष्ट मानकापे कसाब कारण होत ! कोण गुलामांची विषयवासना ही ! आणि ती तृप्त करण्यासाठीं काय हीं दुष्ट कृत्यें ! ह्या नीचांनीं आपल्या विषयवासना तृप्त करून घेण्याकरतां किती लोकांच्या संसारांची धूळधाण करून टाकिली आहे ! किती बायकांस प्रथम नादीं लावून घराबाहेर काढून शेवटीं भिक्षा मागावयास लाविलें आहे ! किती स्त्रियांच्या नवऱ्यांचे, ते आपल्या नीच कृत्यास प्रतिबंधक ह्मणून, प्राण घेतले आहेत ! व अनेक प्रकारच्या किती कपटयुक्ति केल्या आहेत, त्यांचा कांहीं अंत नाहीं !

**नारायणराव**—मित्रा, कोणाचींही पापकर्में, जोंपर्यंत त्याला त्या कामांबद्दल योग्य शिक्षा देणारा मिळाला नाहीं तोंपर्यंत एकसारखीं चालतात. आणि कोणाच्या दुष्ट कृत्यांपासून ज्यांचा तोटा होतो, त्यांपैकीं पुष्कळजण त्या दुष्ट कृत्य करणाऱ्याला योग्य शासन देण्यास तयारच होत नाहींत व त्यांचीं नीच कर्में गुप्त रीतीनें चालत अस-

त्यामुळें, तीं सरकारचे नजरेसही बहुतकरून येत नाहींत, आणि आलीं तरी सर्वकाळ त्या अपराध्यांस योग्य शासन मिळतेंच असें—अनेक कारणांवरून—होत नाहीं. व ज्यांचें नुकसान त्यांच्या नीच कृत्यांपासून होतें, तेही अनेक कारणांवरून त्यांना उलट शासन करण्यास धजत नाहींत. त्यामुळें दुष्टांचीं दुष्ट-कर्में फार दिवस किंबहुना त्यांच्या जन्मपर्यंतही निष्प्रतिबंध चालतात. कदाचित् ईश्वरेच्छेनें त्यांना कोणी त्यांच्या दुष्कृत्यांचा योग्य मोबदला देणारा भेटला तर मग ठीकच होतें, तसेंच ह्या पाषाणहृदय अधमाधमांचें झालें आहे. आजपर्यंत त्यांना त्यांच्या कृत्यांबद्दल योग्य बक्षीस देणारा मिळाला नाहीं, त्यामुळें त्यांचीं नीच कर्में निष्प्रतिबंध चालत गेलीं, तशीं चालत गेलीं तेव्हां त्यांनाही तशीं कृत्यें करण्यास अधिक अवसान येत चाललें. परंतु आतां त्यांच्या कृत्यांची व त्या बरोबर त्यांची समाप्ति होण्याची वेळ जवळच आली आहे. मित्रा माझी निःसीम पतिव्रता प्राणप्रिया, तिच्यावर पापवासना धरून शेवटीं तिच्या नाशास हे कारण झाले आहेत, व तो त्या पतिव्रतेचा नाश माझ्याहातून झाला आहे. त्यापासून जें महा पाप मला लागलें, त्याच्या शांत्यर्थ मला यज्ञ केला पाहिजे. त्या यज्ञांत आपल्या क्रोधाग्नीचें कुंड पेटवून त्यांत ह्या दुष्ट बोकडांच्या आहुती द्यावयाच्या; आणि शेवटीं पूर्णाहुती स्वतःच्या देहाची द्यावयाची. कारण हा देहही स्त्रीहत्याराच आहे! त्याकरितां—

**वकील**-मित्रा, हें भलतेंच—

**नारायणराव**-मित्रा, तूं कृपा करून मध्येंच माझी समजूत घालण्यास लागूं नको. माझ्या प्राणसखीच्या पापोपशांत्यर्थ ह्या दुष्टांचे एक वेळ बळी देणें ह्मणजे कांहींच नाहीं. सहस्र वेळां ह्यांचें बळी दिले पाहिजेत होते, पण

तसें करतां येत नाहीं. तसें करणें ह्मटलें ह्मणजे त्यांना हजार हजार देह पाहिजेत होते, पण त्यांना तर एकेकच देह आहे ! त्यामुळें इलाज नाहीं ! त्याप्रमाणेंच आपल्या देहाच्याही सहस्त्र वेळां आहुती केल्या पाहिजेत होत्या. पण तसें होणेंही शक्य नाहीं. मित्रा, तुला ह्मणून आतां माझी एवढीच विनंति आहे कीं जर लहानपणापासून तुझा माझा अकृत्रिम स्नेह असेल, जर मला योग्य कामीं सल्ला व मदत देण्याविषयीं तुझ्या अंतःकरणांत खरा कळवळा असेल, माझ्या प्राणप्रियेच्या पातिव्रत्याविषयीं व पवित्रतेविषयीं जर तुझी पूर्ण खातरी असेल, आणि तिचा अगदीं निष्कारण छळ व नाश करण्याला गोपाळरावप्रभृति दुष्टवृंद कारण झाला असें तुला वाटत असेल, त्या नीचांच्या कर्मास योग्य प्रायश्चित्त मिळावें असें तुझी मनदेवता तुला सांगत असेल, व मीं सर्वकाळ दुःख, शोक व संताप ह्यांनीं झुरून मरावें असें तुला वाटत नसेल, तर कृपा करून माझ्या ह्या बेताच्या विरुद्ध माझें मन वळविण्याचा प्रयत्न करूं नको; हें तुझ्या ह्या हतभागी मित्राचें तुजजवळ हात जोडून मागणें आहे !

**वकील**—( कंठ दाटून येऊन ह्मणतो. ) मित्रा, तूं ह्मणतोस त्याप्रमाणें मला वाटतें कीं नाहीं, ह्याविषयीं तुझी खातरी असेलच. कारण आपलीं मनें एकमेकांविषयीं कशीं आहेत हें आपणास फार दिवसांपासून ठाऊक आहे, व गोदावरीचा छळ व नाश विनाकारण झाला, याविषयीं तुझी खातरी करून देण्यास मी किती झटलों हेंही तुला ठाऊक आहेच. मग त्या दुष्टांचा नाश व्हावा असें मला कसें वाटणार नाहीं ? परंतु तूं त्यांचा नाश करण्याविषयीं एकाएकीं उडी घालण्याचा विचार करीत आहेस तो मात्र मला मान्य नाहीं. कारण त्या विचारानें माझा जिवलग मित्र

जो तूं त्या तुझाही नाश होणार मग तें दुःख मीं कसें सहन करावें ? ह्याकरितां तो विचार योग्य नाहीं असें मी ह्मणतों. त्यांचा नाश करण्यास अन्य उपायांची योजना करतां येईल.

**नारायणराव**–मित्रा, त्या दुष्टांचा अन्य उपायांनीं नाश होणें आधीं शक्य नाहीं, आणि कदाचित् शक्य आहे असें मानिलें, तरी ते उपाय करण्याच्या कामांतच आपणावर एखादें कचाट येण्याचा संभव आहे. बरें कचाट न येतां निर्विघ्नपणें त्यांच्या नाशाचे बेत शेवटास जातील असें कदाचित् मानलें, तरी तशा रीतीनें भागूबाईसारखें चोरून लपून त्यांचा नाश करणें हें मला तर बिलकुल प्रशस्त वाटत नाहीं. आणखी तशा उपायांनीं त्यांचा समूळ नाश होणें कठिण. आणि आपल्यांना तर सगळ्या खलवृंदाचा नाश होणें जरूर आहे. ह्याकरितां मी पुन्हां तुझी विनंति करितों कीं, ह्या प्रकरणीं तूं कांहीं अधिक बोलूं नको. माझें मन कांहीं ठरविलेल्या विचारांकडून मागें फिरावयाचें नाहीं. कदाचित् आपणांमध्यें मात्र वाईटपणा येईल. याकरितां तूं माझा बेत किंवा मन फिरविण्याचा प्रयत्न करूं नको. ही गोष्ट फुटली तर त्यांत माझा सर्वस्वी नाश आहे हें तुला माहीत आहेच.

**वकील**–ही गोष्ट जर फुटली तर त्यांत तुझा नाश आहे हें मला ठाऊक आहे, व ही गोष्ट मजकडून फुटेल कीं नाहीं ह्याविषयींही तुझी खातरी आहेच. मी जो तुला ह्मणतों, तो मी ह्मणत नाहीं, तर तुजविषयीं जो माझा स्नेह तो मजकडून असें बोलवितो. त्याला मी काय करूं ? मित्रा, तूं ह्मणतोस त्याप्रमाणें जर तूं त्यांचा नाश केलास, तर तुझाही नाहींका त्यांत सर्वस्वी नाश होणार ? आणि मी जो तुझ्या बेताच्या आड येतों, तो त्या दुष्टांचा नाश न

व्हावा ह्मणून येतों काय ? अरे, त्यांचा नाश झाला आणि कुलक्षयही झाला तरी त्यांत माझें कांहीं गेलें नाहीं ! परंतु तो इतरांकडून इतर उपायांनीं होईल तर ठीक आहे. परंतु तुजकडून झाला, तर त्याबरोबर तुझाही नाश होईल, हें मनांत येऊन आंतडीं तुटतात ! (अश्रु गाळितो)

नारायणराव—मित्रा, तुझा माझ्या ठिकाणीं अतिशय स्नेह आहे, त्यामुळें तुला असें होतें. परंतु विचार कर, ह्मणजे तुला समजेल कीं, मला आतां ह्या जगांत प्राण धारण करणें फार कठिण आहे. कारण माझ्या प्रियेचें लावण्य, तिचें चातुर्य, तिची मजवरची अप्रतिम प्रीति, मीं तिचा विनाकारण केलेला नाश, आपला निरपराधीपणा स्थापित करण्याविषयींची काकळूत वाणी, व मजवर प्राणोत्क्रमणाच्या वेळेसही पूर्ण प्रीति दाखविणारीं बोलणीं, हीं माझ्यापुढें सर्वकाळ मूर्तिमंत उभीं राहतात ! व त्यांच्या योगानें माझें शरीर जसें मंदाग्नीनें जळावें तसें शोकाग्नीनें जळत आहे ! व त्याच्या योगानें मला दुःसह यातना होत आहेत. त्या यातना सोसून माझें जीवित रहाणार कसें ? आणि मला ह्या सर्व यातना देण्यास जे नष्ट कारण झाले, ते जिवंत असून चैन मारीत आहेत, हें दृष्टीस पडलें ह्मणजे तें सहन होणें किती कठिण आहे ! ह्याचा तूंच विचार कर, आणि अशा यातना सोसून झुरझुरून मरण्यापेक्षां एकदम त्या दुष्टांचा नाश करून मरून जाणें हें किती इष्ट आहे हेंही मनांत आण !

ह्याप्रमाणें तो वकील व नारायणराव ह्यांचें वारंवार बोलणें होत असे. त्यांत प्रत्येक वेळेस तो वकील त्याच्या बेतांचा निषेध करी व हाही त्याची समजूत घालण्याचा प्रयत्न करी, परंतु नारायणरावाचा बेत ह्मणून कांहीं फिरला नाहीं. त्याला त्या दुष्टांचा नाश करणें, याशिवाय कांहीं

दिसेना. असें चाललें असतां एके दिवशीं शाळाखात्याचा तपासनीस त्याच्या दारावरून जातांना त्याच्या दृष्टीस पडला. तेव्हां त्याला तो तपासनीसही आपल्या प्रियेच्या नाशास परंपरेनें कारण झाला आहे हें मनांत येऊन अधिकच आवेश आला, व गोपाळरावाबरोबर याचेंही पारिपत्य करतां येईल, तर फार चांगलें होईल असें त्यास वाटलें. त्यावरून त्यानें विचार केला कीं, आपण आतां जरा बाहेर फिरूं लागावें, व त्या दुष्टांचा नाश करण्याची संधि पहावी. तो बाहेर हिंडूं फिरूं लागला, तेव्हां एक दोन दिवसांनीं त्याला असें समजलें कीं, येत्या शनिवारीं गोपाळरावाच्या बागेंतील बंगल्यांत वेश्येच्या गाण्याचा बेत आहे. तो बेत ऐकून त्याला आनंद झाला. कारण त्या गाण्यास फार मंडळी न जमतां फक्त दुष्ट मंडळ मात्र असावयाचें, हें त्यास ठाऊक होतें. त्याचा तपासनिसही तेथें होता, तेव्हां तोही त्या गाण्यास येईल असा त्यानें अदमास केला. असे सर्व दुष्ट एके ठिकाणीं मिळाल्यावर त्यांचा नाश एकदम करतां येईल, हें त्याच्या मनांत येऊन त्याला फार आनंद झाला. तो त्या दिवसाकरितां तयारी करूं लागला. त्यानें आपली बंदूक, पिस्तुलें, तरवार व कटार हीं साफसूफ केलीं आणि आपल्यामागें आपला वारस किंवा भाऊबंद कोणी नाहीं, याकरितां आपली सर्व मालमत्ता आपला मित्र वकील यास मिळावी व त्यानें आपल्या आत्याचें आमरणांत पालन करावें असा एक मृत्युपत्रासारखा कागद करून ठेविला. नंतर शनिवार आला त्या दिवशीं संध्याकाळीं नारायणरावानें आपला मित्र वकील ह्याची शेवटची भेट घेतली. त्या वेळेस त्याच्या मित्राचें दुःख काय सांगावयाचें आहे ? त्याला ‘ दे माय धरणी ठाय ’ झालें. आपला बाळपणापासून जीवश्चकंठश्च मित्र, तो तरुण, चतुर, होतक-

रू, विद्वान, आणि धडधडीत प्राण देण्याकरितां रजा घेऊन जातो ! अशा वेळेस त्याच्या मित्रास किती दुःख होईल ह्याची कल्पना करणें आह्मीं आपल्या वाचकांवरच सोंपवितों. कारण तें वर्णन करण्यास आमची लेखणी असमर्थ आहे.

याप्रमाणें परम दुःखानें मित्राचा निरोप घेतल्यावर रात्रींचें जेवण वगैरे आटोपलें. त्याच्या मनाच्या स्थितीचा विचार केला असतां त्याचें लक्ष्य जेवणाकडे कितीसें असेल हें दिसतच आहे ! असो जेवण आटोपल्यावर तो आपल्या माडीवरील खोलींत गेला. त्यानें धोतराची कांस मारून वरती काळी विजार घातली. कंबरेस कांच्या बांधिला. त्यांत आपलीं पिस्तुलें दोन, गोळीबार भरून खोवून दिलीं, व त्यांतच कटार खोविली. अंगांत सदरा व त्यावर एक तंग कबज्या घालून वरती घट्ट काळा अंगरखा घातला; कंबरेस आपली तरवार लटकावून दिली; डोकीस बैंगणी रंगाचा फेटा होता तो बांधिला आणि खांद्यावर आपली दुबारी बंदूक बार भरलेली घेतली. बरोबर दारूगोळ्यांची पिशवीही घेतली. असा सर्व बंदोबस्त थाट करून, सरासरी बारा वाजण्याच्या सुमारास, आपल्या सर्व आवडत्या वस्तूंची व घराची रजा घेऊन ही स्वारी बाहेर निघाली, आणि पटकन् आडरस्त्याला वळून गोपाळरावाच्या बागेचा मार्ग धरिती झाली. आतां या स्वारीस अशीच चालत लावून आपण जरा गोपाळराव मंडळीकडे वळूं. कारण त्यांची बऱ्याच वेळांत विचारपूस केली नाहीं.

---

## भाग १२ वा.

पूर्वी सांगितलेंच आहे कीं, गोदावरीस नारायणरावानें घालवून दिल्याबरोबर आपण तिचा अंगीकार करावयाचा,

असा गोपाळराव व रामभाऊ ह्यांचा बेत ठरला. त्याप्रमाणें दुसरे दिवशीं सकाळीं रामभाऊ सात वाजण्याच्या सुमारास उठला, आणि शौच मुखमार्जन करून नारायणरावाच्या घराच्या आसपास कोठें तरी बसावें ह्मणून तेथें आला. त्याचा हेतु असा होता कीं, नारायणराव घरीं आल्याबरोबर जरी त्यानें गोदावरीस घराबाहेर काढून दिलें, तरी लागलेंच आपणास तिला भेटतां यावें. तो सकाळपासून बारा वाजतपर्यंत तेथें कोणाकडे तरी बसलेला होता. तरी नारायणराव घरीं आला नाहीं. तेव्हां तो जेवावयास गेला आणि पुन्हां परत येऊन सकाळच्या ठिकाणीं त्याच्या वाटेकडे डोळे लावून बसला, परंतु सूर्यास्त झाला तरी तो आला नाहीं. तेव्हां तो कांहींसा खिन्न होऊन गोपाळरावाकडे परत गेला, आणि त्याला अद्यापि नारायणराव घरीं आला नाहीं हें कळविलें तें ऐकून गोपाळराव पुराणिकाकडे पाहूं लागला.

पुराणिक—तो बहुतकरून रात्रीचाच गांवांत येईल. कारण एक तर तो रजेशिवाय आला आहे, आणि दुसरें त्याला वाटेल कीं, जर आपण दिवसाचे गांवांत गेलों, तर आपण आल्याविषयीं आपण घरीं पोंचण्याच्या पूर्वींच आपल्या बायकोस कोणी तरी जाऊन खबर देईल, आणि तेणेंकरून ती सावध होऊन तिच्या जारकर्माविषयीं आपल्या नजरेस येण्यासारख्या कांहीं गोष्टी असल्या तर ती त्या छपवील. या मसलतीनें तो रात्रीस कोणाला फारसें कळूं नये अशा बेतानें घरीं येईल. रात्रीं घरीं आला तरी तेव्हांच तिला घालवून देणार नाहीं. आणि तेव्हांच घालवून दिलें तरी ती उजाडल्याशिवाय बाहेर निघून जाणार कुठें? ह्याकरितां मोठ्या सकाळीं मात्र भाऊसाहेबांनीं जपलें पाहिजे.

असा बेत ठरल्यावर त्या रात्रीं रामभाऊला,—आपण आजपर्यंत ज्या एवढ्या खटपटी व कंबाटें केलीं, त्यांचें उ-

ह्यां सार्थक्य व्हावयाचें, व गोदावरी आपणास मिळावयाची, या आशेनें—चांगलीशी झोंप देखील आली नाहीं. सकाळीं पांच वाजतां तो उठला आणि चूळ भरून टाकून तसाच नारायणरावाचे घराजवळ आला. तेथें येईपर्यंत तो गोदावरीच्या प्राप्तीच्या आशेनें मनांत मांडे खातच होता ! त्याच्या मनांत आतां ती रस्त्यावर आली ह्मणजे तिच्या जवळ जाऊन कसें बोलावें, ती रडत असली तर तिची समंजूत कशी करावी, तिला गोपाळरावाकडे नेल्यावर आपलें सूत्र कसें जुळवावें, नारायणरावानें त्या सुंदरीस घरांतून घालवून देते वेळेस मारझोड केली असली तर, तिच्याकडून त्याजवर फिर्याद कशी करवावी इत्यादि गोष्टींचे विचार त्याच्या मनांत घोळत होते. तो नारायणरावाचे घराचे आसपास रस्त्यावर इकडे तिकडे फिरत होता, तेथें एक सोनाराचें दुकान होतें. तो सोनारही दुकानावर उगाच बसला होता, त्यास रामभाऊ सहज हाक मारून ह्मणालाः—

कां शेट आज उजाडलें नाहीं तोंच दुकान मांडून बसलां ? कांहीं कामाची घाई आहे वाटतें ?

**सोनार**—छेहो कामाची घाईबिई कांहीं नाहीं. आज बारा वाजतां उठलों आहें. त्या बिचाऱ्या नारायणरावमास्तरची बायको मेली. तिच्या नाकांत कानांत पायांत घालावयास तें नथीचें सुंकलें, कळे, वेढीं करून दिलीं. तेव्हांपासून जागाच आहें, झोंप आलीच नाहीं.

**रामभाऊ**—अरे कोणत्या नारायणरावाची ? ह्या नारायणरावमास्तरची ? तिला मरण्याला काय झालें ? ती काल तर चांगली होती !

**सोनार**—काल रात्रीं नारायणराव घरीं आला तेव्हां तिला हर्षवायु कीं काय झालें ह्मणतात. वाईट झालें बिचाऱ्याचें !

**रामभाऊ**—मग तिला नेली देखील कां इतक्यांत ?

**सोनार**—हो रात्रीसच नेली. जाळून परत देखील आले.

हें वर्तमान ऐकून रामभाऊचें मन आश्चर्य, दुःख, व निराशा यांनीं गोंधळून गेलें. त्याला कांहीं सुचेनासें झालें. तो तसाच वेड्यासारखा होऊन गोपाळरावाकडे चालला. तो मनांत ह्मणालाः—आतां गोपाळरावाला सांगावें तरी काय? त्याचे पंच प्राण गोदावरीकडे लागलेले आहेत. आजपर्यंत निरनिराळ्या प्रकारांनीं मीं त्याची समजूत केली. पण आतां समजूत करण्याचें मूळच नाहींसें झालें ! मी आतां तिला घेऊन येईन या आशेनें तो माझी वाट पहात बसला असेल ! आतां मी त्याला तोंड तरी कसें दाखवूं ? असें मनांत बोलत चालला असतां गोपाळरावाकडे जाऊन पोंचला. गोपाळराव तर रामभाऊ गोदावरीला घेऊन केव्हां येतो ह्याची वाट पहात बसला होता. इतक्यांत तो तोंड उतरलेला असा जेव्हां येऊन तेथें बसला तेव्हांः—

**गोपाळराव**—रामभाऊ, अरे तूं एकटाच कसा आलास ? ती सुंदरी कोठें आहे ? तिला बरोबर आणण्यास कांहीं अडचण दिसली, कीं मला एकदम आश्चर्यांत घालण्यासाठीं तिला कोठें ठेवून आलास ? कीं ती आमचेकडे येण्याला अजूनही कबूल होत नाहीं ? किंवा त्या नाऱ्याला तिच्याविषयीं इतकें समजलें असतांही, तिला पाहिल्याबरोबर मोहित होऊन त्यानें तिचा अंगीकार केला ? रामभाऊ, बोलत कां नाहींस ? माझें मन अगदीं उतावळें होऊन गेलें. आज रात्रीं तिची माझी भेट व्हावयाची ह्मणून मीं आज माळ्याला, पलंगावर घालण्यास फुलांच्या माळा, शिवाय हार, गजरे, तुरे वगैरे तयार करून ठेवण्यास सांगून पाठविलें आहे. तिची आपली पहिली भेट अशा थाटानें झाली पाहिजे. रामभाऊ, सांग काय तें ! ती कोठें आहे ?

**रामभाऊ**--( दुःखानें दीर्घ श्वास टाकून ) रावसाहेब ! सांगण्यासारखें कांहीं राहिलें नाहीं ! गोदावरीला, आपणास लवकरच पुष्पशय्या मिळणार हें समजलें नाहीं त्यामुळें तिनें महानिद्रेंत चितारूप शय्येवर शयन केलें ! !

**गोपाळराव**-ह्मणजे ! ती मेली कीं काय ? अरे असें कसें होईल ? काल संध्याकाळींच तिला आपण पाहिलें ना ? तेव्हां तर चांगली गुलाबाच्या कळीसारखी टवटवीत होती ! इतक्यांत काय झालें तिला ? कीं त्या नाऱ्यानें खून केला ? कीं तूं हें खोटेंच सांगतोस ?

**रामभाऊ**--खोटें नाहीं रावसाहेब ! मी भलतेंच आपणापाशीं खोटें कसें सांगेन ? रात्रीं नारायणराव घरीं आला, तेव्हां हर्षवायु होऊन ती मेली असें ह्मणतात. मी आतां सर्व चौकशी करून आलों.

गोदावरीच्या मरणाचें वर्तमान ऐकून गोपाळरावास तिच्या प्राप्तीची जी इतके दिवस मोठी आशा होती तिचा समूळ नाश झाल्यामुळें, त्याला फार दुःख झालें. तो त्या दुःखानें जमिनीवर मूर्छित पडला. रामभाऊ व पुराणिक ह्यांनीं त्यास सावध केलें, व पुराणिक त्याला समाधानाच्या गोष्टी सांगूं लागला. तो ह्मणाला, ‘ अहो आपले प्रयत्न हे सर्वकाळ सिद्धीसच जातात असें नाहीं. कधीं फसतातही, परंतु धैर्यवानानें धैर्य सोडूं नये. ह्यांत काय आहे ? जगामध्यें काय तीच एक सुंदरी होती ? अशा शेंकडों पडल्या आहेत ! आपल्यानाही सर्व गोष्टी अनुकूल आहेत. प्रयत्न केला असतां तिच्या सातसवाई पांखरूं मिळूं शकेल. “ शीर सलामत तर पगड्या पंच्यायशी ” ! अशा प्रकारानें त्यानें त्याची समजूत केली. परंतु गोदावरीच्या ठिकाणीं त्याचें मन फार वेधलेलें होतें, व ती आपणास मिळेल, अशी त्याला फार आशा होती, आणि ती

एकाएकीं समूळ नाहींशी झाली त्यामुळें तो डोकींत राख घालून वैराग्य घेण्याच्या बेतांत आला होता. परंतु रामभाऊ व पुराणिक ह्यांनीं त्यास नाना प्रकारच्या गोष्टी वारंवार सांगून, त्याचें मन कांहींसें ताळ्यावर आणिलें. रामभाऊनेंही एक दोन दिवसांत त्या गांवांत एक नवीनच सुंदर तरुणी, गाणारी वेश्या आली होती, तिची त्याच्याजवळ मोठी तारीफ करून, व तिलाही त्याचें मन आपलें सर्व कसब खर्च करून, खुष करण्याविषयीं सांगून तिला त्याजकडे नेण्याचें सुरू केलें. शिवाय दुसऱ्याही कांहीं गमतीच्या व चैनीच्या गोष्टी सुरू करून त्याचें मन ताळ्यावर आणिलें. ह्या गोष्टी चालू असतांच तो शाळाखात्याचा तपासनीस तेथें आला. गोपाळराव व रामभाऊ ह्यांचा त्याला पूर्वींचाच अनुभव होता, त्यामुळें त्याच्या तोंडाला पाणी सुटलेलेंच होतें. त्याला गोदावरीचें वर्तमान कांहीं माहीत नव्हतेंच. आणखी त्यानें ह्यांच्या ह्मणण्याप्रमाणें नारायणरावाची बदलीही केली होतीच. त्यामुळें ह्यांची आपण कामगिरी बजाविली असें समजून तो आपल्या मनांत खुष होताच. त्यामुळें तो गोपाळरावाकडेच उतरावयास गेला. व त्या वेळीं चाललेल्या चैनींत तोही गढून गेला. असें चाललें असतां एक दिवस शनिवार आला. तेव्हां त्या दिवशीं रामभाऊनें गोपाळरावाकडून त्याच्या बागेंतील बंगल्यांत रात्रीं खाण्यापिण्याचा व वेश्येच्या गाण्याचा बेत करविला. त्या बेतास येणारी मंडळीही बेताचीच होती. कारण, तेथें खाण्यापिण्याचा कांहीं विधिनिषेध नव्हता. याकरितां फक्त तेथील मामलेदार, तो तपासनीस, तो पुराणिक, रामभाऊ व यजमान गोपाळराव इतकी काय ती मंडळी होती. शिवाय एक स्वयंपाकी ब्राह्मण, व दोन सुंदर गाणाऱ्या वेश्या होत्या. त्या वे-

ह्यांचे साजिंदे त्यांनीं बरोबर आणिले होते, ते उगाच अडचण होतील ह्मणून त्यांस, मंडळीनें त्यांचा तबला व सारंगी तेथें ठेवून घेऊन परत लावून दिले.

जमलेल्या मंडळींपैकीं कोणासही मद्यमांसाचा निर्बंध नव्हताच. तेव्हां तशा प्रकारचाच जेवणाचा बेत केलेला होता. जेवण झाल्यावर वारुणीपान सुरू झालें. यथेच्छ पान झाल्यावर सर्वजण रंगांत आले. नंतर गाणें सुरू झालें. रामभाऊ तबला वाजवूं लागला व तो तपासनीस सारंगी वाजवूं लागला. त्या वेश्या गाऊं लागल्या, परंतु हे सर्व मद्यपानानें तर्र झालेले असल्यामुळें, त्या गात असतां, मध्येंच ' ओहो! भले भिमाजी! भले आवडाजी! वः! शाबी! ' इत्यादि शब्द मोठमोठ्यानें बोलून गोंधळ करीत! कोणी तिची पाठ थोपटी! कोणी तिच्या खांद्यावर हात ठेवून बसे! कोणी तिच्या बरोबर गाऊं लागे! कोणी तबला घेऊन नाचूं लागे! कोणी सारंगी घेऊन गाऊं लागे! त्या वेश्यांसही दारू पाजिली होती. ह्यामुळें त्याही रंगांत आल्या होत्या! त्यामुळें त्या दिवाणखान्यांत नाचणें, उडणें, ओरडणें, गाणें, पराकाष्टेचे बीभत्स शब्द मोठ्यानें बोलणें, ओढाताण करणें, मिठ्या मारणें, चुंबन घेणें, इत्यादि धूमाकुळाचा झपाटा चालला होता! मध्यें मध्यें चहा, काफी, सुरा, यांचें पान सुरू होतेंच! लज्जेनें तर त्या सर्वांच्या मनांतून काळेंच केलें होतें! आतां मृत्युलोकांत आपली ही एकमेकांची शेवटची भेट, पुन्हां आपण नरकवासांत मात्र एकत्र होऊं ह्याकरितां ह्या लोकांतील एकदां शेवटची चैन करून घ्यावी, कांहीं कसर ठेवूं नये, ह्या विचारानेंच जणूं काय त्या मंडळीनें आपल्या मूर्खपणाची व बीभत्स करमणुकीची कमाल करून सोडिली होती!! असा रंग ऊर्फ धांगडधिंगा चालला असतां मागें सांगितल्याप्रमाणें क्रोधानें संतप्त झालेला

नारायणराव—जणूं काय त्या मंडळींतील लोकांच्या दुष्ट कृत्यामुळें, त्यांस प्राप्त होणारा जो नरकवास, त्यांत पोंचविणारा साक्षात् काळच त्या बागेच्या दरवाज्यापाशीं एक दीड वाजण्याच्या सुमारास प्राप्त झाला.

बागेच्या दरवाजाच्या शेजारींच आंतल्या बाजूस एक लहानसें घर होतें. त्यांत त्या बागेचा माळी, त्या तपासनिसाचा एक शिपाई, एक मामलेदाराचा शिपाई व आणखी एक गडी असे चारजण निजले होते. ते सगळेजण आपल्या धन्याप्रमाणेंच दारू पिऊन उल्लू झाले होते, व त्या घरांत पडून राहिले होते. त्यांस बागेचा दरवाजा लावण्याचें भान न राहिल्यामुळें, तो उघडाच राहिला होता. नारायणराव त्या दरवाज्यांतून आंत येऊन, बंगल्याच्या माडीवर जावयाच्या जिन्याच्या तोंडीं येऊन पोंचला; तरी त्याला कोणी पाहिलें नाहीं व हटकिलेंही नाहीं. जिन्याचा दरवाजाही उघडाच होता त्यांतून तो आंत गेला आणि त्यादरवाज्यास आंतून कडी लाविली. नंतर जिन्याच्या कांहीं पायऱ्या चढून वर गेला, आणि तेथें वर कोण कोण व किती मंडळी आहे, ह्याचा अजमाम काढण्याकरितां कानोसा घेत उभा राहिला. वरील मंडळी मोठमोठ्यानें बोलतच होती, त्यामुळें त्यांच्या शब्दांवरून वर कोण कोण आहेत, तें त्यानें ओळखिलें. तेव्हां तो आपल्याशींच ह्मणाला. हे जे मोठमोठ्यानें बोलत आहेत हे तर सर्व आपले शत्रूच आहेत. त्यांशिवाय आणखी कोणी वर असतील, तर ते मात्र निरपराधी ह्मणावयाचे! निरपराधी ह्मणजे तरी त्यांनीं माझा अपराध केला नाहीं इतकेंच! बाकी गोपाळराव व रामभाऊ ह्यांच्या दोस्तीची मंडळी ह्मटली ह्मणजे त्या दोघां दुष्टांचीच प्रतिमा समजावयाची! तेव्हां तेही नीच अधमाधम अतएव वध्यच होत! अस्तु. वर कितीही मंडळी असो, आपण गोदावरीच्या

नाशास कारण झालेल्या नराधमांचे बळी तर त्या स्वर्गस्थ पतिव्रतेस देणार ! मग त्या सपाट्यांत इतरांचें काय होईल तें होवो ! आपणाजवळ सहाजणांस बक्षीस देण्यापुरते तर बार भरलेले आहेत. दहा पंधरा बारांची सामग्री जवळ शिलक आहे. शिवाय आपली तरवार व कट्यार ह्या आहेतच! ठीक आहे. आतां ह्या दुष्टांनीं जीं जीं दुष्कर्में केलीं आहेत, त्यांचें त्यांना स्मरण देऊन, नंतर त्यांचे प्राण घ्यावे. परंतु आपण त्यांच्या दुष्कृत्यांचा पाडा वाचूं लागलों ह्मणजे ते कदाचित् तेथून पळून जातील, ह्याकरितां प्रथम आपल्या तरवारीनें सर्वांच्या पायावर-त्यांस पळून जातां येणार नाहीं असे वार करावे. त्यांतूनही कदाचित् कोणी पळून जाऊं लागलाच, तर आपली बंदूक व पिस्तुलें तयार आहेतच! असो, आतां विलंब लावून उपयोग नाहीं. प्राणसखे! मी आतां तुला देवी ह्मणतों! हे देवी!हा मी तुझा दास तुझ्या नाशास कारण झालेल्या दुष्टांचे बळी देण्यास तयार झालों आहें, तर त्या कामांत मला साह्य होऊन, ही दासाची सेवा ग्रहण कर. असें ह्मणून आपली तरवार उपसून पटकन् जिन्याच्या पायऱ्या चढून विद्युल्लतेप्रमाणें वर गेला. वर काय! पूर्वी सांगितल्याप्रमाणें मंडळी मद्यपानानें तर्र झाली असल्यामुळें नारायणरावाकडे कोणाचें लक्षही गेलें नाहीं! इतक्यांत त्यानें आपली बंदूक भिंतीजवळ उभी ठेवून ज्याप्रमाणें व्याघ्र बकऱ्यांच्या समुदायांत उडी घालतो त्याप्रमाणें 'प्राणसखीकी जै' असें ह्मणून त्या दुष्ट समुदयांत उडी घातली. आणि ते चकित होणार इतक्यांत यानें पानाला चुना लावला नाहीं इतक्या वेळांत, गोपाळराव, रामभाऊ, मामलेदार, तपासनीस, ह्यांच्या एकेका पायास मोठमोठा वार करून त्यांना खालीं पाडिलें. जेवण करणारा ब्राह्मण तेथें होता त्यास व त्या वेश्यांस मात्र जखमी

केलें नाहीं, तथापि त्यांना आपल्या पिस्तुलाचा एकेक ठोसा मारून खालीं पाडिलें. पुराणिकही तेथें एका तक्यावर पडला होता त्याला एक लाथ मारून त्याची तंगडी धरून ओढीत दालनाच्या मध्यभागीं आणिलें. त्या जखमी झालेल्यांनीं व इतरांनीं मोठ्यानें मेलोंरे मेलों ! खून खून खून ! इत्यादि प्रकारानें ओरडून मोठा कल्होळ केला. तेव्हां नारायणराव जमिनीवर जोरानें पाय आपटून ह्मणाला:—

नीचांनो! तुमचा काळ तर आलाच आहे ! परंतु चुप रहाल तर कांहीं वेळ तरी जगाल ! नाहींतर ह्या तरवारीनें आतांच तुमचीं डोकीं उडवितों पहा ! ( आचाऱ्यास ) अरे ए बंड्या! उगाच बोंब मारूं नको चुप रहा ! नाहींतर तुझीही तुझ्या यजमानासारखी अवस्था करीन! रांडांनो! चुप रहा नाहींतर देतों खिडकींतून खालीं फेंकून! सगळेजण चुप रहा, आणि मी बोलतों तें ऐका. नाहींतर तुह्मीं स्वर्गास पोंचत इतक्या मोठ्यानें जरी आरोळ्या मारिल्या, तरी या नारायणरावाच्या हातून तुह्मांला सोडविण्यास कोणी येणार नाहीं! आणि आला तरी त्याची तुमच्यासारखीच अवस्था होईल! हें पक्कें समजा, आणि चुप रहा?

**नारायणरावानें** त्यांना चुप रहाण्यास सांगितलें तरी, त्यांना मोठमोठ्या जखमा लागून प्राणांत वेदना होत होत्या, त्यांतून रक्त वाहत होतें; त्यामुळें त्यांच्यानें चुप कसें रहावेल? तरी उगीच राहिलें तर कांहीं तरी जीव जगण्याची आशा, नाहींतर हा आतांच डोकें उडवील असें समजून, त्यांनीं आरोळ्या मारणें बंद केलें. व तसेच कण्हत कुंथत हात जोडून गयावयां करून दीनवाण्या स्वरानें ह्मणाले:—

**नारायणराव**, आतां आमच्यानें कांहीं फार बोलवत नाहीं, आमचे प्राण व्याकुळ होत आहेत. आह्मीं तुमचे मोठमोठे अपराध केले आहेत. ते सर्व आह्मांला क्षमा करा.

आह्मी तुह्मांला शरण आलों आहों. आह्मांला झाली ही शिक्षा बस आहे. अतःपर जन्मपर्यंत तुमच्या वाटेस जाणार नाहीं. आह्मी चुकलों! चुकलों! चुकलों!

**नारायणराव**--दुष्टांनो! आतां माझ्या सपाऱ्यांत सांपडलां आहां, ह्मणून गयावयां करीत आहां! परंतु तुह्मीं प्रत्येकानें जे अन्याय व जीं पापकर्में केलीं आहेत, त्यांना योग्य शासन ह्मटलें ह्मणजे, तुमचे एकदां हालहाल करून प्राण घ्यावे, पुन्हां तुह्माला अमृतसंजीवनी देऊन जिवंत करावे, पुन्हा हालहाल करून प्राण घ्यावे, असें सहस्त्र वेळां केलें पाहिजे होतें ! पण काय करावें मजजवळ अमृतवल्ली नाहीं ! असती तर तिचा उपयोग करण्यास ह्या प्रसंगासारखा दुसरा प्रसंग कधीं मिळाला नसता ! ( पुराणिकास लाथ मारून ) कुत्र्या ! तुला ती शालजोडी, लुगडें, चोळी कशी मिळाली होती ? माझ्या प्रियेजवळून ह्या गोपाळरावानें दिली होती नाहीं ? आणि गेल्या अष्टमीच्या रात्रीं ह्याच बंगल्यांत माझी प्राणप्रिया आलेली मला दाखवावयास तूंच आणिलें होतेंस नव्हे ? नीचा ! बोलत कां नाहींस ?

**पुराणिक**—महाराज ! सर्व खऱ्या गोष्टी आपणास माहीत झाल्या आहेत. आतां मी काय बोलूं ? मी सर्वस्वी महा पापी अधम आहें. परंतु आपल्याला शरण आलों आहें ! व आपलें मस्तक तुमच्या पायांवर वाहिलें आहे. त्याचें रक्षण करणें किंवा तोडून टाकणें आपणाकडे आहे आपण दयाळू आहां ! योग्य दिसेल तें करा !

**नारायणराव**—चांडाळा ! आतां शरण येण्याची वेळ राहिली नाहीं ! तुझ्या कर्मांचें प्रायश्चित्त भोगण्यास तुला नरकांत पाठविण्याशिवाय दुसरा मार्गच नाहीं !

इकडे नारायणरावाचें हें कृत्य चाललें आहे इतक्यांत, बागेच्या दाराजवळच्या घरांत निजलेल्या असामींपैकीं जे

अंमळ शुद्धीवर होता तो बंगल्यांतील आरडाओरड ऐकून जागा झाला; आणि त्यानें इतरांस मारून मुटकून उठविलें, आणि बंगल्यांत काय गर्दी आहे तिचा शोध करण्यासाठीं बंगल्याच्या दारापाशीं आला. परंतु जिन्याचा दरवाजा बंद असल्यामुळें त्याला वर जातां येईना. तेव्हां त्यानें व त्याच्या सोबत्यांनीं, रावसाहेब, रावसाहेब, वर काय दंगा आहे, ह्मणून हाका मारण्याचा सपाटा चालविला. त्या हाका ऐकून माडीवरील जखम्यांस धीर आला आणि त्यांनीं 'अरे खून खून ! धांवा धांवारे धांवा, आमचे हा दुष्ट प्राण घेत आहे,' अशा आरोळ्या केल्या. परंतु त्या खालच्या लोकांस वर येण्यास वाटच सांपडेना व धैर्यही होईना. वर गेलों तर कदाचित् आपल्या प्राणावरही बेतेल, अशी त्यांस भीति वाटत होती ! अशा भीतीनें ते विचार करीत उभे राहिले असतां त्यांतील एक माडीच्या खिडकींतून आंत जाण्याकरितां भिंतीच्या खुंट्यांना व खिडक्यांना धरून वर चढला आणि खिडकींतून आंत डोकें घालतो इतक्यांत नारायणरावानें त्याला पाहिलें. तेव्हां त्यानें लागलाच आपल्या पिस्तुलाचा एक ठोसा त्याच्या डोक्यांत अशा जोरानें मारिला कीं, त्याबरोबर तो गडी घेरी येऊन खालीं जमिनीवर पडला, व देवा देवा ! बये बये ! मेलों मेलों ! ह्मणून ओरडूं लागला. तेव्हां त्याचे दुसरे सोबती भ्याले, आणि ते खून खून ! धांवा धांवारे धांवा ? अशा आरोळ्या मारीत गांवाकडे गेले. नारायणरावानें ते ओरडत गेले, तें ऐकिलें तेव्हां आंता उशीर लावून उपयोग नाहीं, असा विचार करून मोठ्यानें ओरडून ह्मणाला, प्राणप्रिये ! स्वर्गनिवासिनी गोदावरी ? मला तुझा प्राण घेण्याविषयीं उद्युक्त करणारा हा पहिला नराधम बोकड ! ह्याचा तुला पहिला बळी देतों ! असें बोलून पुराणिकाची शेंडी धरून 'जै

प्राणसखी ! असें ह्मणून, त्याचें डोकें उडविलें ! नंतर रामभाऊचा पाय धरून त्याला ओढून पुढें आणिलें, आणि ह्मणाला, गुलामा ! मांगा ! ह्या कपटावडंबर नाटकांतील सूत्रधार तूं आहेस ! कपटपटो ! नाहीं नाहीं ते कावे करून व नाहीं नाहीं तीं कुभांडें रचून, माझ्या प्रियेचा नाश केलास ! नीचा ! त्या पोष्टांतील शिपायास लांच देऊन आमचीं पत्रें पोष्टांतून काढविण्यास बरें वाटलें नाहींरे ! अरे तुझ्या घाणेरड्या कृत्यांचा किती पाढा वाचूं ! तुझा प्राण घेणें ह्मणजे, सहस्त्र महायात्रा केल्याचें पुण्य संपादन करणें होय! हे महा पतिव्रते साध्वी देवी! हा तुझा मुख्य छळ करणारा! ह्याचा दुसरा बळी देतों ! असें बोलून त्याच्या पोटांत त्यानें तरवार खुपसली आणि सर्वांगावर वार करून त्याला छिन्नविच्छिन्न करून टाकिलें. नंतर कां गोपाळरावजी! आतां आपली पाळी! आपले स्नेही गेले नरकवासांत! ते तुमची वाट पाहत आहेत! आतां तुमचा बळी देऊन, तूं आजपर्यंत शेंकडों गरीब कुटुंबांस अन्नासाठीं तडफडावयास लावून त्यांस देशोधडीस लाविलेंस ! शेंकडोंजगांवर खोटीं कुभांडें रचून त्यांच्या अब्रूचा नाश केलास ! शेंकडोंजणांच्या स्त्रिया भ्रष्ट करून त्यांच्या संसाराचा बिघाड केलास ! आपल्या दुष्ट वासना तृप्त करण्यासाठीं कितीएकांचे प्राण घेतलेस! ह्या सर्व अन्यायांचें व ह्या सर्व अन्यायांपेक्षां माझी निस्सीम पतिव्रता जी प्राणप्रिया तिजवर वांकडी नजर ठेवून तिचा सर्वस्वी नाश करण्यास तूं कारण झालास! हा मोठा अन्याय! याचें तुला प्रायश्चित्त देऊन गांजलेल्या लोकांस तुझ्या त्रासांतून मोकळें करण्याकरितां व त्या स्वर्गनिवासिनी देवीस संतुष्ट करण्याकरितां तुझा बळी देतों ! प्रिये ! हा मुख्य तुजवर पापवासना ठेवणारा बरें ! याचा एकदम प्राण घेणें योग्य नाहीं. तो याला दहा वीस वर्षें यातना देऊन घे-

तला पाहिजे होता ! पण आतां तसें करण्यास अवकाश व सवड नाहीं. ह्याकरितां आतांच असें केलें पाहिजे! असें बोलून त्यानें त्याच्या छातींत तरवार खुपसली व सर्व शरीरावर सपासप वार करून तें अगदीं छिन्नविच्छिन्न करून टाकिलें. नंतर तो त्या तपासनिसाकडे वळून ह्मणाला, कां रावसाहेब! आपण आमचे वरिष्ठ तेव्हां आपल्या जवळ अदबीनें वागलें पाहिजे, नाहीं काय ?

**तपासनीस**—नारायणराव, मी तुमचा सर्वस्वी अपराधी आहें ! मला तुमची विनंति करण्यास तोंड राहिलें नाहीं असा मी तुमचा अपराधी आहें ! परंतु आतां शरण आलों आहें ! झाली ही शिक्षा पुरे आहे आतां माफ करा! मला कृत कर्माचा पूर्ण पश्चात्ताप झाला आहे !

**नारायणराव**—नीचा! आतां पश्चात्ताप होण्याची वेळ नव्हे ! ती मागेंच निघून गेली ! आपल्या हाताखालच्या गरीब पोठार्थी लोकांस विनाकारण छळतांना, त्यांना अन्न अन्न करण्यास लावितांना, त्यांच्या बायकांवर पापवासना धरितांना, आणि त्यांच्याविषयीं अगदीं खोटे रिपोर्ट करितांना नाहीं शरम वाटली? आणि बोकडा! तूंच तूंच तो गुदस्तां ह्या गोपाळरावाच्या घरची मेजवानी खाऊन उन्मत्त होऊन विनाकारण मला दुरुत्तरें बोलत होतास ! ह्याच ह्याच तोंडानें बोलला होतास नाहीं ? ( तोंडांत मारितो ) माझी शाळा गुदस्ता वाईट होती नाहीं ? दुष्टा ! सर्वस्वी माझ्या नाशास व दुःखास तूंच कारण झाला आहेस ! ह्याच हातानें मजविषयीं खोटा रिपोर्ट केलास, नव्हे ! या हाताला पहिल्यानें प्रायश्चित्त दिलें पाहिजे ! ( त्याचा उजवा हात तोडतो. ) नीचा आतां धर नरकपुरीचा रस्ता ! असें ह्मणून त्यानें त्याचें डोकें तोडून टाकिलें.

**नारायणरावाचें** हें घोर कर्म चाललें असतां बागांत

निजलेले गडी पूर्वी सांगितल्याप्रमाणें आरडाओरड करीत गांवांत गेले होते. त्यांची ओरड ऐकून पुष्कळ लोक आरडाओरड करीत बागांत येत होते. त्याजबरोबर पोलीसचेही लोक आले होते,त्यांचा गलबा नारायणरावानें ऐकिला. तेव्हां आतां विलंब कामाचा नाहीं असा विचार करून त्या मामलेदारास ह्मणाला, गुलामा लांचखाऊ ! लांच खाऊन शेंकडों गरीब लोकांस तूं फार त्रास दिला होतास ! शेंकडों गरीब लोकांस तूं तुरुंगांत पाठविलेंस ! शेंकडोंजणांवर खोटे खटले चालवून त्यांस खर्चाखालीं आणून भिकेस लाविलेंस ! आतां तूं तरी कशाला जिवंत राहतोस ? जा आपल्या गंडळीबरोबर नरकवासांत ! असें ह्मणून दोन चार घावांनीं त्याचीही समाप्ति केली.इतक्यांत बाहेरील लोकांची गर्दी बागेच्या दरवाज्यांत आली त्यांचा गलबा ह्यानें ऐकिला. तेव्हां लागलीच आपली जोड गोळीची बंदूक हातांत घेतली आणि ह्मणाला:—' हे देवी, हे प्राणप्रिये, महा पतिव्रते, स्वर्गवासिनी गोदावरी ! तुझा म्यां दुष्टानें कसाबाप्रमाणें, तुला दोषी समजून वध केला, परंतु तूं आपल्या पावित्र्याच्या व पुण्याच्या योगानें स्वर्गास जाऊन, आनंदानें राहिली आहेस ! तुझा छळ करणारे व मला तुझा प्राण घेण्याविषयीं उद्युक्त करणारे नीच, कर्मभ्रष्ट बोकड, ह्यांच्या तुझ्या वधाच्या पापोपशांत्यर्थ केलेल्या दुष्टमेध नांवाच्या यज्ञांत माझ्या क्रोधाग्नीच्या कुंडांत-आहुति दिल्याच आहेत. आतां शेवटीं, हा महापापी, घोरकर्मी, स्त्रीहत्यारा, जगांतील सर्व प्राण्यांत अत्यंत दुःखी, आपल्या जीवितास कंटाळलेला व तुझा प्राण घेणारा अतएव वध्य असा मी, आपल्या प्राणाची पूर्णाहुति देत आहें, ही घे, आणि शांत हो. ह्या पाप्याच्या सर्व अपराधांची क्षमा कर. असें ह्मणून तो जमिनीवर बसला, आणि आपल्या

बंदुकीच्या दोन्ही नळ्यांचीं तोंडें आपल्या छातीवर लावून आपले दोन्ही पाय लांब करून त्याच्या आंगठ्यांनीं त्या बंदुकीच्या दोन्ही चांपाचे घोडे एकदम खटकन् दाबिले !! त्याबरोबर दोदिनीं अवाज होऊन, त्या बंदुकींतील दोन्ही मोठमोठ्या गोळ्या त्याच्या छातींतून पार निघून गेल्या व त्यानें गोदावरी गोदावरी ! ह्मणत प्राण सोडिला !!!

बाहेरच्या मंडळीचा घोळका बंगल्याजवळ येऊन पोंचला. त्यांनीं आंतून दार उघडावें ह्मणून पुष्कळ हाका मीरिल्या. परंतु आंत जिवंत असलेल्या त्या वेश्या, व तो सैंपाकाचा ब्राह्मण, हीं मूर्छित पडलीं असल्यामुळें कोणी दार उघडिलें नाहीं. तेव्हां कितीएक धीराच्या लोकांनीं जिन्याचें दार उखाळिलें. तेव्हां पुष्कळ लोक वर आले. तों दिवाणखान्यांत रक्तमांसाचा बाजार त्यांच्या दृष्टीस पडला ! तो भयंकर देखावा पाहून कितीएकजण मूर्छा येऊन पडले. कोणी त्या वेश्यांस व आचाऱ्यास सावध केलें. त्यांनीं झालेली बहुतेक हकीकत सांगितली. इतकें होई तोंपर्यंत सकाळचे सात वाजले. ही ह्या भयंकर कृत्याची बातमी सर्व गांवभर पसरली. तेव्हां गांवांतिल लहान मोठे शेंकडों लोक त्या ठिकाणीं आले. त्यांत मरणारांचे आप्त, इष्टमित्र, वगैरे आले होते.

जमलेल्या मंडळींत नारायणरावाचा मित्र वकील हाही होता. त्यानें सर्व मंडळीस गोदावरीच्या पातिव्रत्याची तशीच नारायणरावाच्या सद्वर्तनाची हकीकत सांगितली. सांगतांना त्याच्या डोळ्यांतून घळघळा अश्रु वाहात होते, व तोंडांतून पुरता शब्दही उमटेना. गोपाळराव, रामभाऊ आणि पुराणिक यांच्या दुष्टपणामुळें नारायणराव आणि गोदावरी यांची अशी दशा पाहून या मनुष्यरूपी राक्षसांच्या नाशाबद्दल इतर लोकांस तर काय पण त्याच्या आ-

ह्मवर्गासही वाईट वाटलें नाहीं. त्यांस झालेली शिक्षा यथायोग्य झाली असें सर्वजण बोलूं लागले. नारायणराव आणि गोदावरी यांच्या घाताबद्दल सर्वत्र दुःखित होऊन अश्रु ढाळित व या अनुपम जोडप्यास या लोकीं नाहीं तर नाहीं पण स्वर्गी तरी अखंड सौख्य मिळो ह्मणून ईश्वराची. प्रार्थना करीत चालते झाले.



तारीख १० माहे एप्रेल सन १८९० ई०